







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

# नवी क्षितिजे

किंमत ५ रुपये

वर्ष-५
अंक-१८

क्रांतिकारी चळवळीतून लेखकाचे भवितव्य

डॉ. चंद्रकान्त बांदिवडेकर

नवकला–एक प्रदीर्घ प्रतीक (२)

संकलन – विश्वास पाटील

अनुक्रमणिका

वर्ष पाचवे
अंक १८ वा
एप्रिल ते जून ७२



संपादक
नाना जोशी
विश्वास पाटील

रचना
पामार्ट
मुंबई २८

पत्र व्यवहाराचा पत्ता
विश्वास पाटील
पुष्प कुंज, पालखी वाडी
१३, काशीनाथ धुरु रोड मुंबई २८

मुद्रक व प्रकाशक
शुभांगी जोशी
३२९ वि. प. रोड मुंबई ४

वार्षिक वर्गणी
रु. १२-५०

या अंकाची
किंमत रु. ६

मालक : सौ. शुभांगी जोशी
३२९, वि. प. रोड, मुंबई ४

मुद्रण स्थळ :
विमा मुद्रक आणि प्रकाशक लि.,
सातारा, यांचा विमा छापखाना.

# अनुक्रमणिका







# संपादकीय :

नवी क्षितिजेचा १९७३ सालचा हा दुसरा अंक. या अंकात " क्रांतिकारी चळवळींतून लेखकांचे भवितव्य " हा डॉ. चन्द्रकांत बांदिवडेकर यानी अत्यंत परिश्रमपूर्वक तयार केलेला लेख आम्ही देत आहोत. " क्रांती झाली पाहिजे, क्रांती झाली पाहिजे " असे आम्ही सर्वजण नेहमी घोकीत असतो. त्या क्रांतीची अंगे तपासायला हा लेख आपणास उपयोगी ठरावा. निदान आपल्या विचारास चालना द्यावयास तरी तो खचितच उपयोगी पडेल.

दुसरा लेख " नव-कला एक प्रदीर्घ प्रतीक " हा नवकलेच्या गर्भित आशयासंबंधी असून तो चालू लेखमालेतील दुसरा लेखांक आहे. नवकले-संबंधी अनेक उलटसुलट मते आपण ऐकतो. पण खरे काय याचा निर्णय आपणास करता येत नाही. तसा निर्णय करता येण्यासाठी जी आवश्यक तात्विक बैठक लागते ती देण्याचा प्रयत्न या लेखात करण्यात आला आहे.

कलेच्या मानसशास्त्रात उत्तम कलाभिव्यक्तीचे काही ठळक विशेष सांगितलेले असतात. त्यातील एक विशेष जीवनावरोवरचे समायोजन शिक-विण्याच्या कलेच्या गुणधर्मासंबंधी असतो. जीवन गतिमान आहे. हीच गति-मानता कलेतही प्रकटत असते. आणि त्या कलेचा आस्वाद घेताना आमचे मन तिला सरावत असते. कलेचा दुसरा विशेष हा कला ज्या प्रकारे भावी मानसिक धारणातील बदल आगाऊ सूचित करते त्यासंबंधी असतो. कोठलिही कला जशी जीवनसमायोजक असते तशीच भावी काळाच्या प्रेरणा आगावू दाखविणारीही असते. तिसरा विशेष हा या दोन विशेषांचीच एकत्रित आवृत्ती होय. उत्तम कला ही डोक्याने किंवा तार्किक बुद्धीने निर्माण न केली जाता नेहमी हृदयाकडून, कलावंताच्या मनाच्या आंतर्गाभ्यातून—जेथे व्यक्तिगत अनुभवांचा, प्रांत संपून व्यक्तिकातीत समूहमनाचा प्रांत सुरू होतो, जेथे त्या कलावंताच्या संस्कृतीच्या आणि राष्ट्राच्या आशाअपेक्षा, आवडीनावडी, ध्येयेस्वप्ने आणि चालना व प्रेरणा यांचे अनादी आकृतिबंध सुप्तपणे कार्य करीत असतात तेथून निर्माण होते असे म्हणतात. म्हणून कलाभिव्यक्तित या सगळ्या इच्छा-शिवाचे—Will चे प्रतिबिंब आढळावे. नवकलेच्या बाबतीत या तीन विशेषांचे महत्व काय हे सांगण्याचा प्रयत्न या लेखमालेत केला आहे. ही लेखमाला पुढच्या अंकात पूर्ण होत आहे.

—संपादक

अनुक्रमणिका

# क्रांतिकारी चळवळीतून लेखकांचे भवितव्य

• डॉ. चन्द्रकांत वांदिवडेकर

**प्रस्तावना**

[ हा लेख लिओपोल्ड लावेडझ यांच्या एका लेखावरून तयार करण्यात आलेला आहे. लावेडझ यांचा मूळ लेख Survey या नियतकालिकाच्या १९७२ मधील विंटर अंकात प्रसिद्ध झाला आहे. आम्ही छापलेला लेख जरी मूळ इंग्रजी लेखावरून तयार केलेला असला तरी ते मुळावरहुकूम भाषांतर नाही. मूळ लेखातील सर्व मुद्दे कायम ठेवून आम्ही आमचा लेख तयार केला. कित्येक ठिकाणी विवेचनाच्या सुस्पष्टतेसाठी मुळातल्या माहितीत व प्रतिपादनात आम्ही भरही घातली आहे. आता लेखात चर्चा करण्यात आलेल्या विषयासंबंधी —

जेव्हा जेव्हा क्रांतीसारख्या चळवळी होतात तेव्हा तेव्हा लेखक, कवी वगैरे साहित्यिक लोक त्या चळवळींमध्ये मनापासून भाग घेतात. तेव्हा या प्रकारे क्रांतीसारख्या फार मोठ्या आंदोलनात भाग घेणाऱ्या या लोकांच्या आयुष्याचे क्रांतीनंतर प्रस्थापित होणाऱ्या क्रांतीसरकारच्या राजवटीत काय होते हा एक विचारणीय असा प्रश्न असतो. लावेडझ ह्यांनी या सबंध लेखात याच प्रश्नाची चर्चा केली आहे. ते म्हणतात की लेखक, कवी वगैरे साहित्यिक लोक मूलतः बुद्धिजीवी असल्याने त्याना कोठलिही प्रस्थापित समाजव्यवस्था मनापासून समाधान देत नाही. त्यांची प्रगल्भ कल्पनाशक्ती नेहमीच त्याना आहे त्यातील दोष काढावयास व त्या उणीव असलेल्या व्यवस्थेच्या तुलनेत पर्यायी सुंदर व्यवस्था कल्पनेत पाहावयास उद्युक्त करीत असते. हा पर्याय हा एक युटोपिया, भावी काळासंबंधीची एक आदर्श परिकल्पना असतो. साहित्यिक या भावी काळासंबंधीच्या या सुंदर पर्यायाने मोहून जाऊन तो पर्याय आणू म्हणणाऱ्या प्रस्थापित समाजातल्या राजकीय चळवळचांशी हातमिळवणी करतात. त्याना अनेक प्रकारची मदत करतात. त्यांच्या भूमिकेचा, त्यांच्या कार्यक्रमाचा प्रचार करतात. स्वतःकडून जितकी होईल तितकी मदत त्याना करतात. ही मदत करण्यात त्यांचा हेतू हा असतो की क्रांती यशस्वी झाल्यावर

माणसाचे स्वातंत्र्य आजच्यापेक्षा विस्तारित होणार आहे. माणसामाणसात अधिक प्रमाणात समता व बंधुत्व निर्माण होणार आहे, जग आता विद्रूप आणि कुरूप आहे. क्रांतीनंतर ते स्वर्गीय सुंदर बनणार आहे! आता साहित्यिकांच्या भविष्याविषयीच्या या सुंदर चित्राचे क्रांतीसरकारच्या राजवटीत काय होते ? लावेडझ यांचा निष्कर्ष असा की लोकांच्या सुखाचे, समतेचे व बंधुत्वाचे क्रांती-नंतरच्या क्रांतीसरकारी राजवटीत काय होत असेल ते होवो पण साहित्यिकांच्या भविष्याविषयीच्या सुंदर स्वप्नाचे मात्र पूर्ण वाटोळे होते. त्यांचे स्वातंत्र्य विस्तारीत न होता ते संकोचित पावते. त्यांच्या साहित्यिक हालचालींवर नव्या मर्यादा व शासकीय बंधने येतात. क्रांतीकारी सरकारच्या दृष्टीने हे आचरण योग्यच असते. एकतर बुद्धिवादी लोकांची राजकीय गरज आता संपलेली असते. त्यांच्याकडून कोठलेही काम आता करून घ्यायचे नसते. उलट बुद्धिवादी म्हणून सदा असंतुष्ट असणाऱ्या लोकांची नवीन प्रस्थापित व्यवस्थेला एक भीतीच असते. जुन्या राजवटीत त्यानी जे केलें तेच म्हणजे प्रस्थापित राजवटी-विरुद्धच्या चळवळीला पाठिंबा दिला तेच ते आताही करतील ही धास्ती त्यांच्या मनात असल्याने ते त्यांच्याशी व्यवस्थित वागू शकत नाहीत.

आपल्या या निष्कर्षांच्या पुष्ट्यर्थ लावेडझ यांनी फ्रेंच राज्यक्रांती, रशियन राज्यक्रांती, चिनी राज्यक्रांती व क्यूबाची राज्यक्रांती या राज्य-क्रांत्यांचा व त्यात भाग घेतला होता त्या लेखकांच्या क्रांतीनंतरच्या राजवटी-तील आयुष्याचा व स्थितीचा अभ्यास दिला आहे. अनेक प्रकारचा पुरावा सादर करून त्यानी असे दाखवून दिले आहे की लेखक वगैरे साहित्यिक बुद्धिजीवी वर्गाचे क्रांतीसरकारच्या राजवटीतील भविष्य सुखदायक व निर्धास्त नसते. त्यांतील काहीना विजनवासात जावे लागते, काहीना क्रांतीसरकारच्या सैनिकांच्या बंदूकींच्या गोळयाना तोंड द्यावे लागते तर काहीना बंदी-शिबिरात मृत्यूच्या गोष्टी उचलीत दिवस काढावे लागतात.

अर्थात लेखकांचा क्रांतीच्या आंदोलनातील भाग व त्यानंतरचे त्यांच्या आयुष्याचे धिंडवडे हाच जरी लेखाचा प्रधान विषय असला तरी त्याच्या अनुषंगाने इतर कितीतरी मुद्यांची चर्चा त्यात आली आहे. ते मुद्दे थोडक्यात असे :–

१) क्रांत्यांचे इतके तीव्र आकर्षण बुद्धिजीवी वर्गाला वाटते त्या आकर्ष-णाचे मर्म कशात साठविलेले आहे ?

२) क्रांती यशस्वी झाल्यानंतर जी क्रांतीसरकारे येतात त्या क्रांती-सरकारांच्या राजवटीत त्यांचे भागधेय कोणत्या प्रकारचे असते ?



अनुक्रमणिका



३) क्रांती प्रत्यक्षात येण्यापूर्वी व क्रांती चालू असताना त्यांना क्रांतीसंबंधी ज्या आशा व अपेक्षा वाळगलेल्या असतात व जी भये मनाली रंगविलेली असतात त्या आशाअपेक्षांचे व भयांचे क्रांतीच्या पश्चात काय होते ?

४) क्रांतीच्या अनुभवांचा त्यांच्या लेखक म्हणून असणाऱ्या आयुष्यावर व दृष्टिकोनावर कोणता परिणाम होतो ?

५) क्रांतीविषयक संकल्पनेत काळाबरोबर कोणकोणते बदल घडून आले आहेत ?

६) क्रांतीचा घोषित हेतू अखिल मानवजातीचा उद्धार व एकजूट घडवून आणणे हा असतो. पण प्रत्येक देशातील क्रांती त्या देशाच्या नागरिकाना कट्टर राष्ट्रवादी बनविते. यामुळे समता आणि विश्वबंधुत्व या क्रांतीच्या मूलभूत घोषित धोरणाचा बट्ट्याबोळ कसा होतो ?

७) प्रत्यक्ष क्रांतीच्या चळवळीचा व नंतर येणाऱ्या क्रांतीसरकारच्या राजवटीचा अनुभव घेणे आणि क्रांतीच्या राजवटीशी प्रत्यक्ष संपर्क येऊ न देता तत्संबंधी अवास्तव सुखी कल्पनाचित्रे रचणे या दोन गोष्टी कशा मूलतः भिन्न आहेत व ज्यानी क्रांतीसरकारांच्या राजवटींचा साक्षात अनुभव घेतला आहे त्यानाच कसे या प्रकारच्या घटनांविषयी बोलण्याचा हक्क आहे याचेही दिग्दर्शन या लेखात आहे.

८) अनेक देशात आजवर राज्यक्रांत्या घडून आल्या असून तेथील बुद्धिजीवी वर्गाला त्या क्रांत्यांचा भ्रमनिरास करणारा अनुभव आलेला आहे. इतिहासात फ्रेंच राज्यक्रांतीपासून अनेकवार हा अनुभव आला असतानाही बुद्धिजीवी वर्गाच्या पिढ्यांवर पिढ्या क्रांतीच्या कल्पितावर विश्वास आणि निष्ठा ठेवावयास का प्रवृत्त होत असतात ? या विश्वासाचे आणि निष्ठेचे रहस्य कशात आहे ? एकदा वाईट अनुभव जिच्यामुळे आला त्या प्रक्रियेत भाग घ्यावासा वाटावा असे आकर्षक क्रांतीच्या चळवळीत व तत्त्वज्ञानात काय आहे ? कोणत्या कारणामुळे स्वतःला बुद्धिजीवी म्हणवून घेणारी ही लेखक मंडळी परत परत क्रांतीच्या कल्पिताच्या आकर्षणाला बळी पडतात ? क्रांतीचे कल्पित इतके सामर्थ्यवान कशामुळे बनते ?

९) प्रारंभी क्रांती व ज्या आदर्श सुखस्वप्नाच्या आकर्षणाने ती क्रांतीची कारवाई करू पाहिली जाते ते आदर्श सुखस्वप्न या दोन स्वतंत्र घटना असतात. म्हणजे सुखस्वप्न प्रत्यक्षात आणण्यासाठी क्रांतीची कारवाई केली जावयाची असते. अलीकडे क्रांती म्हणजेच आदर्श सुखस्वप्न व त्या सुखस्वप्नाचा लाभ अशी भूमिका तयार झाली आहे. ही भूमिका कशी तयार झाली ?



अनुक्रमणिका

१०) लावेडन्न जरी मुखस्वप्नांच्या संकल्पनांवर कोरडे ओढत असले तरी मुखस्वप्ने ( युटोपिया ) रचलीच जाऊ नयेत असे मात्र ते म्हणत नाहीत. त्यांचे म्हणणे असे आहे की वस्तुस्थितीचे भान ठेवून हे आराखडे रचले जावेत. नाहीतर त्यांच्यातून भयानक भस्मासूर निर्माण होतील व मनुष्याच्या संपूर्ण स्वातंत्र्याचा स्वाहाकार करतील.

११) या सर्व विवेचनाच्या केंद्रभागी जो विषय आहे तो राजकीय कल्पिताचा ( मिथ्स-myths ) विषय होय. कल्पितांच्या विषयाची चर्चा या ठिकाणी आडवळणानेच फक्त येऊ शकली आहे. आधुनिक राजकीय जमान्याच्या दृष्टीने हीही चर्चा अतिशय महत्त्वाची आहे. कारण राजकीय कल्पिते व त्याने भारावून जाऊन अनन्वित कृत्ये करावयास व अडाणीपणाने वागावयास तयार होणारी जनता हे खास विसाव्या शतकाचे वैशिष्टय आहे. या लेखानंतरचा लेख कल्पितांच्या संबंधात आहे. जिज्ञासूंनी तो अवश्य वाचावा.

—संपादक ]

## क्रांतीच्या आंदोलनात लेखकांची नियती आणि स्थिती

" महान समाजवादी ऑक्टोबर क्रांतीने जागतिक वाङ्मयावर निर्णायक परिणाम केला आहे...." सोव्हिएट अकॅडमी ऑफ सायन्सिसने प्रकाशित केलेल्या **क्रांती** या विषयावरच्या ग्रंथाची सुरुवात वरीलप्रमाणे आहे. अकॅडमी ऑफ सायन्सिसच्या या दाव्यावर ट्रॉट्स्कीच्या **' साहित्य आणि क्रांती '** या पुस्तकातील भविष्यवाणीचा प्रभाव दिसतो. ' साहित्य आणि क्रांती'त ' ट्रॉटस्की म्हणतो की, " या युगाची कला संपूर्णपणे क्रांतीच्या प्रभावाखाली आकार घेणार आहे. " ट्रॉट्स्कीची ही भविष्यवाणी १९२४ ची. त्यात क्रांतिकारी कलेची लक्षणे त्याने दिली आहेत. त्याच्या मते " भविष्यकाळासंबंधी अमर्याद आशा आणि भविष्यावरची महान श्रद्धा " हे या कलेचे महान लक्षण. पुढे पुस्तकाचा समारोप करतानाही तो म्हणतो की " आता येणारा मानव अमाप सामर्थ्यशाली, अधिक शहाणा आणि अधिक बुद्धिमान व चतुर असेल... यापुढचा सामान्य दर्जाचाही इसम ॲरिस्टॉटल, गटे किंवा मार्क्स यांच्या पातळीला आलेला असेल. ही सामान्य स्तरातील मनुष्ये. याच्याही वर अधिक उच्च दर्जाची मनुष्ये निर्माण होणार आहेत. "



अनुक्रमणिका



हें लिहिले गेल्यानंतर जगातील अनेक देशांमध्ये क्रांती घडून आली आहे. त्यामुळे क्रांती झाली की त्या क्रांतीमुळे त्या त्या देशातील कला व साहित्य यांच्यात मूलभूत बदल घडून येतात असे जे ट्रॉटस्की म्हणतो ते ताडून पाहण्याच्या अनेक संधी उपलब्ध झाल्या आहेत. परंतु अद्याप काही ट्रॉटस्कीचे क्रांतीनंतरच्या मनुष्याच्या उन्नतीसंबंधीचे भाकित खरे झालेले दिसून आलेले नाही. ट्रॉटस्की म्हणतो त्या सर्वसाधारण पातळीपासून तर मनुष्ये अद्याप कितीतरी योजने दूर आहेतच आणि सर्वसामान्य मनुष्यानी ॲरिस्टॉटल व गटे यांची उंची गाठण्याची गोष्ट सोडाच परंतु क्रांत्युत्तर काळातला सामान्य मनुष्य केवळ ब्रेझनेव्ह यांच्या पॉलिटब्यूरोतील सामान्य व सन्मान्य सभासदांच्याही बरोबरीला येऊन पोचू शकलेला नाही. अर्थात या गोष्टीला आमच्या मते फारसे महत्त्व आहे असे नाही. त्याच्याहीविना क्रांतीशी संबंध आल्यानंतर साहित्याचे काय होते हे पाहता येण्याची इतर कितीतरी संधी उपलब्ध आहे. त्यासाठी ट्रॉटस्कीच्या भाकितावर अवलंबून राहावयास नको. ट्रॉटस्की म्हणतो त्या प्रकारची मनुष्याची उन्नत्ती क्रांत्युत्तर देशात झाली नसेल. पण ट्रॉटस्की म्हणतो तशा क्रांती अनेक देशात घडल्या आहेत आणि तेथे साहित्याचा संबंध क्रांतीशी आला आहे. तेव्हा क्रांतीशी संबंध आलेल्या साहित्याची तुलना त्याच देशातील क्रांतीपूर्व साहित्याशी वा इतर बिनक्रांतीवाल्या देशातील साहित्याशी केल्यास क्रांतीशी संबंध आलेल्या साहित्याचा नंतरचा मुखवटा कसा असतो हे आपणास कळून येऊ शकेल. एवढेच नव्हे तर याच गोष्टींचा अधिक सूक्ष्म व सखोल अभ्यास आपण केल्यास आमच्या युगाची प्रकृती कोणती आहे याचेही निदान आपणास करता येईल. कदाचित मानवाच्या एकूण प्रकृतीविषयी व मनाच्या सवयीविषयीही अधिक सूक्ष्म ज्ञान आपणास प्राप्त होईल. तत्संबंधी एखादे ' नवे सत्य ' आपणास गवसेल.

क्रांती व साहित्य किंवा हवे तर क्रांती व साहित्यिक असेही म्हणा पण या दोन वस्तू परस्परांच्या सहवासात आल्या की काय घडते हे निरिक्षण करण्यासारखे आहे. क्रांती व साहित्यिक जवळ आले की त्या घटनेचा साहित्यिकांच्या जीवनावर परिणाम कोणता घडतो ? त्यांच्या जीवनात कसल्या प्रकारचा बदल घडून येतो ? हा येथील पहिला प्रश्न. दुसरा प्रश्न अर्थातच लेखकमंडळीना क्रांती या विषयाचे जे अवर्णनीय आकर्षण नेहमी वाटत आले आहे त्याचा उगम कशात असतो हा आहे.

क्रांतीनंतर त्या क्रांतीत भाग घेणारे लेखक कोठे असतात ? त्यांच्या आयुष्याचे काय होते ? ते काय करतात किंवा करू शकतात ? अभिव्यक्तीचे,



अनुक्रमणिका

आपले विचार प्रकट करण्याचे त्यांचे स्वातंत्र्य पूर्वीच्याहून अधिक वाढते काय ? त्यांच्या आशाआकांक्षा, त्यांच्या इच्छा व निदिध्यास यांचे पुढे काय होते ? ते खरे होतात काय ? क्रांतिकाळात त्यांनी जो क्रांतीचा अनुभव मिळविलेला असतो त्याचा त्यांच्या एकूण जीवनदृष्टीवर होणारा परिणाम काय आहे ? हा परिणाम निकोप आहे काय कि त्याच्यामुळे त्यांचे मन विकृत व कटू बनते ? या अनुभवाच्या पोटी निपजणारे साहित्य कसे असते ? त्यात क्रांतीविषयीची कोणती धारणा प्रकट होते ? आणि शेवटी या परिणामापोटी खुद्द क्रांतीचीच संकल्पना बदलते किंवा कसे ? असे हे प्रश्नांचे स्वरूप आहे. क्रांती व साहित्य किंवा क्रांतीचा साहित्यावरील प्रभाव या एका विषयामध्ये इतके असंख्य प्रश्न अंतर्भूत आहेत. आज अनेकाना क्रांती या शब्दाचे आकर्षण आणि भुलावण पडलेली दिसत आहे. तेव्हा क्रांतीची ही ओढ कशातून निर्माण झाली आहे हे ऐतिहासिक दृष्टिकोनातून समजून घ्यायचे असेल व या ओढीचा सांस्कृतिक अर्थ जाणून घ्यायचा असेल आणि पुढे त्यातून जे काही निष्पन्न होणार आहे त्याचा आगावू अंदाज बांधायचा असेल तर या सर्व प्रश्नांची उत्तरे प्रामाणिकपणे शोधावी लागतील. त्यासाठी निरनिराळ्या क्रांत्यांचा तुलनात्मक अभ्यास करावा लागेल. कारण जर काही उत्तर मिळाले तर ते याच अभ्यासातून मिळू शकेल. या सगळ्या प्रश्नांमध्ये जो एक फार मोठा प्रश्न गुंतलेला आहे तो असा की राजकारणातील प्रज्ञावंत आणि विचारवंतांची भूमिका कोठली ? लेखकवर्गाचा क्रांतिकारी चळवळीतील भाग व त्यांची त्यातील गुंतवणूक हा या प्रश्नाचा उपप्रश्न. हे युग उजाडेस्तवर प्रज्ञावंत आणि विचारवंत यांचा राजकारणातला भाग राजे–महाराजे व राजपुरुष यांच्या शिक्षक–सल्लागाराचे व उपदेशकाचे काम करणे एवढाच असे. राजकारणावर प्रभाव पाडण्याच्या दृष्टीने हा भाग किती निरुपयोगी असे हे दाखविणारी वाटेल तेवढी उदाहरणे इतिहासातून काढून दाखविता येतील. ॲरिस्टॉटल, इब्न खाल्दुन, माखिआवेल्ली आणि सर टॉमस मोर ही यातील काही प्रसिद्ध नावे. त्यांनी आपल्या शिष्यांवर व पर्यायाने तत्कालीन राजकारणावर किती प्रभाव पाडला हे इतिहासज्ञातच आहे. आपल्या प्रज्ञेचा काहीच परिणाम राजकारणावर पडत नाही हे पाहून सर टॉमस मोर यांना तर यूटोपिया किंवा आदर्श राज्यपद्धती या नावाचा व विषयाचा ग्रंथ लिहायची स्फूर्ती झाली. या स्फूर्तीचे मूळ पाहण्यासारखे आहे. खुद्द टॉमस मोरनीच ते स्पष्ट केले आहे. इरॅझ्मस् (१४६६–१५३६) नामक डच मानवतावाद्याला त्यांनी जे एक खाजगी पत्र लिहिले आहे त्यात ते स्पष्टच लिहितात की,







"आदर्श समाजाचे जे कल्पनाचित्र माझ्या मनाशी मी रंगवीत होतो त्या कल्पनाचित्रात माझ्या स्वतःकडे जी भूमिका मी घेतली होती ती त्या रामराज्याच्या राज्यप्रमुखाची होती." म्हणजे या आदर्श रामराज्याची जी कल्पना मांडली जात होती त्या कल्पनेला दोन वेगवेगळ्या दिशांनी चालना पुरविली गेली होती.

तो काळ म्हणजे आधुनिक युगाचा प्रारंभ होता आणि अशा त्या काळात मानवजातीची कल्पना धार्मिक परंपरेतून नुकतीच कुठे बाहेर पडू लागली होती व प्राचीन स्वर्गलोक भूतलावर आणण्याच्या गोष्टी करू लागली होती. या इच्छेमागील प्रेरणा पाहणे मोठे मनोरंजक ठरेल. आदर्श राज्यस्थापनेमागील एक प्रेरणा ही तत्कालीन व्यवस्थेविषयीच्या नावडीतून, मनाच्या एका निराशेतून निर्माण झाली होती. दुसरी प्रेरणा योजनाबद्ध, शिस्तशीर व आदर्शवादी अशी एक नवी व्यवस्था स्थापन करावी या पोटतिडिकीची होती. आदर्श राज्यकल्पनेमागील प्रेरणा ही अशी दुहेरी आहे. त्यात चालू स्थितीविषयी दुःख व निराशा आणि नव्या, उत्तम, योजनाशीर व्यवस्थेचे आकर्षण असे दोन्ही भाग आहेत. याच काळातला जॉन मिल्टन हा विख्यात कवी, Paradise Lost चा कर्ता. त्याने क्रांतीत भाग घेतला होता पण क्रांत्युत्तर परिणामांनी त्याची मोठी निराशा केली होती. तर क्रांतीचे पश्चात परिणाम पाहून हा महाकवी बिलकूल निराश बनला होता. तो लिहितो की "स्वर्गामध्ये चाकर होण्यापेक्षा नरकात धनी बनणे चांगले." अर्थात हे तर कबूलच केले पाहिजे की बुद्धिवादी लोकांचा वर्ग समाजामध्ये उदयास आला व त्यानेच आदर्शवादी रामराज्याच्या कल्पना आणि क्रांतीमुळे ते राज्य प्रस्थापित होणार आहे हा विचार यांचे एकत्रीकरण केले. पूर्वी आदर्श रामराज्याच्या कल्पना होत्या. नव्हत्या असे नाही. पण त्या धार्मिक किंवा पौराणिक स्वरूपाच्या कल्पना असत. उदा., पतितोद्धाराची किंवा मोक्षाची कल्पना. येशूच्या सहस्र वर्षीच्या सुखी व पावन राज्याची कल्पना या आदर्श राज्याच्या कल्पना पूर्वीही होत्या. पण आता त्या कल्पनांचे धर्मातीत सामाजिक कल्पनात रूपांतर झाले; धार्मिक व पौराणिक स्वरूप जाऊन त्यांचे सामाजिकीकरण झाले. तात्पर्य, पौराणिक व धार्मिक आदर्श राज्य कल्पनांच्या जागी क्रांतिमय बदलातून येऊ शकणाऱ्या परिपूर्ण व सर्वांगसुंदर समाजाची कल्पना आली. मनुष्याने केलेल्या क्रांतिमय प्रयत्नातून प्रत्यक्ष भूतलावर येऊ शकणाऱ्या ज्या या सर्वांगसुंदर धर्मातीत समाजाच्या कल्पना विचारवंतांनी मांडल्या आहेत त्यांचे जर पृथक्करण तुम्ही केले तर एक गंमतीदार गोष्ट तुम्हाला आढळेल. ती ही की हे

आदर्श कल्पलोक मृत्यूनंतर किंवा स्वर्गासारख्या काल्पनिक ठिकाणी निर्माण होणार नसून ते या भूतलावर निर्माण होणार आहेत आणि तरीही त्यांची रचना व लक्षणे पूर्वीच्या काळातील धार्मिक व पौराणिक आदर्श लोकांसारखीच आहे. पूर्वीच्या धार्मिक स्वरूपातील नि आता धर्मातीत बनलेल्या या " स्वर्ग-नगरीचे द्वार " उघडणार आहे तेव्हा इतिहासही नवे वळण घेणार आहे. कारण न्याय व समता या दोन सूत्रांवर मानवसमाजाची, मनुष्या–मनुष्यातील परस्पर संबंधांची फेर आखणी तेथे होणार आहे.

भूतलावर आणल्या जाणाऱ्या या नव–कल्पलोकाची लक्षणे तुम्ही पाहिलीत तर हे कल्पलोक आणि पौराणिक व धार्मिक वाङ्मयात ज्यांचे वर्णन येते ते स्वर्ग लोक यात कमालीचे साम्य आढळेल. दोघांच्याही बाबतीत सांसारिक दुःखातून सुटका आहे आणि ही सुटका ज्या ठिकाणी होणार आहे तो एक बंदिस्त व पृथक् असा प्रदेश आहे. बंदिस्त व पृथक् प्रदेश आणि सर्व तापापासून सुटका करणारा मोक्ष या दोन लक्षणांवाचून कोठल्याही आदर्श रामराज्याची जणू पूर्तीच होत नसावी. मग तो कल्पलोक मृत्यूनंतर गवसणाऱ्या स्वर्गाच्या स्वरूपातील असो अथवा याच भूतलावर शासनाकडून केल्या जाणाऱ्या नवयोजनेतून जन्मणारा असो. भूतलावर हा जो नवा स्वर्ग आणण्यात येणार असतो त्याच्या अगणित योजना इतिहासात आपणास गवसतील. त्या योजनांचे असंख्य कायाकल्प नि आराखडे आपणास पाहावयास सापडतील. पण या योजनात इतकी रूपांतरे घडून गेली असली तरी मोक्ष आणि बंदिस्त क्षेत्रफळ हे दोन्ही घटक आजतागायत कायमच आहेत. त्यामुळे कधीकधी असे वाटू लागते की संसारतापापासून सुटका आणि अगदी आपल्याकरिताच राखून ठेविलेले असे बंदिस्त व पृथक् क्षेत्र ही मानवी मनाचीच शाश्वत गरज असावी. एवढे निश्चित की या दोन घटकांचा संबंध बदलत्या सामाजिक गरजांऐवजी मानवी मनाच्या विशिष्ट रचनेशी अधिक असावा. अर्थात याचा अर्थ बाह्य लौकिक परिस्थितीशी त्यांचा काहीच संबंध नसतो असे नाही. एकूण ऐतिहासिक परिस्थिती, समाजात त्या काळात कार्य करीत असणारे वर्ग व सामाजिक स्तर यांच्याशीही या कल्पलोकाच्या योजनांचा संबंध असतो. समाज, समाजा-तील निरनिराळे वर्ग, ऐतिहासिक व भौतिक परिस्थिती या सर्वांशी या कल्पनांचा संबंध असतो व हे सर्व घटक त्या योजनांवर आपला परिणाम घडवितात.

असो. लक्षात ठेवायचे ते हे की केवळ मानवी मनाची ओढ एवढ्याच एका कारणासाठी अशा प्रकारच्या कल्पलोकाच्या कल्पना मांडल्या जात

नसतात. त्याला भौतिक परिस्थितीही कारणीभूत असते. कारण या प्रकारच्या कल्पनांचे खरे आकर्षण समाजामधील निरनिराळ्या कोटींनाच अधिक असते. समाजात जे वेगवेगळे गट अथवा वर्ग असतात त्यांनाच यांचा सर्वाधिक ओढा वाटत असतो. हे वर्ग वा या सामाजिक कोटीच या कल्पनांच्या प्रचारात रस घेत असतात. बुद्धिवादी आणि बुद्धिमंतांचा वर्ग ही अशापैकी एक सामाजिक कोटी. अर्थात या वर्गाची ठाम लक्षणे सांगता येण्यासारखी नाहीत. देशकाल-परिस्थितीनुसार ही लक्षणे बदलतात. वेगवेगळ्या काळाच्या व देशाच्या संदर्भात बुद्धिजीवींचा अर्थही वेगवेगळा केला जातो. तरीही बुद्धिजीवी ही सामाजिक व बौद्धिक कोटी अनेक अर्थांनी उपयुक्त असून ती टाकून देता येणारी नाही. कारण बुद्धिजीवी ही संकल्पना संदिग्ध आहे म्हणून जर आपण ती टाकून दिली तर सामाजिक किंवा राजकीय या प्रकारच्या चर्चाच आपणास चांगल्या प्रकारे चालविता येणार नाहीत. अर्थात बौद्धिक व सामाजिक चर्चेसाठी उपयोगी पडणारी बुद्धिजीवी ही काही एकच कोटी नव्हे. इतरही अनेक कोटी आहेत की ज्यांच्यावाचून पदोपदी आपले नडेल. उदा., समूहवाद, रोमँटिकवाद वगैरे. असो. महत्त्वाची गोष्ट ही की बुद्धिजीवी ही कोटी अतिशय संदिग्ध व धूसर असली तरी पुढील चर्चेत ती वापरण्यावाचून आपणास गत्यंतर नाही.

काळ आणि देश यांच्यानुसार बुद्धिजीवींच्या प्रकृतीत भेद होतो. ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे व ती तुम्हीही मान्य कराल. परंतु त्यापेक्षा महत्त्वाची गोष्ट ही आहे की बुद्धिजीवी वर्गाच्या प्रकृतीतील भेदाप्रमाणे क्रांतीच्या प्रक्रियेकडे पाहण्याची लोकांची दृष्टीही बदलत असते. बुद्धिजीवी हा क्रांतीच्या कल्पनेच्या बाबतीत फार मोठा प्रभावी घटक आहे. उदा., रशियातील बुद्धिजीवी वर्ग व त्या वर्गाने केलेला क्रांतीच्या संकल्पनेवरचा परिणाम. रशियन बुद्धिजीवी वर्ग अनेक स्थित्यंतरातून गेला आहे व त्या स्थित्यंतरांचा परिणाम क्रांतीविषयक लोकांच्या धारणेवर घडून आला आहे. अगदी प्रारंभी रशियातील बुद्धिजीवी वर्गावर रशियन क्रांतीदलाच्या सर्व सरकारी मालमत्ता, रेल्वे वगैरे जनतेच्या मालकीची असावी असे म्हणणाऱ्या समूहवादी[१] ( व शून्यवादीही ) विचारसरणीचा प्रभाव होता. हा वर्ग बहुतांशी शून्यवादी म्हणजे आक्रमक-विध्वंसक वृत्तीच्या लोकांनी भरलेला होता. पुढे या वर्गात वकील, डॉक्टर

१. Populist–समूहवादी; १८७०–८० मधील रशियातील एक राजकीय चळवळ.



अनुक्रमणिका



आदि शिक्षित व व्यावसायिक लोकांची भरती झाली. लगेच बुद्धिजीवीवर्गाची क्रांतीविषयक विचारसरणीही पालटली. त्यांची मूल्येही बदलली. त्यात थोडा मवाळपणा आला. प्रारंभीची मूल्ये केवळ राजकीय-सामाजिक स्वरूपाची होती. ती जाऊन त्याऐवजी सांस्कृतिक-सौंदर्यवादी मूल्ये आली. हा काळ पहिल्या महायुद्धापूर्वीचा. या कालखंडाला रशियन वाङ्मयाचा रजत कालखंड म्हणतात. या कालखंडातील काही लेखक अद्यापही क्रांतीचा पुरस्कार करीत होते. पण एकूण लेखकमंडळीतील त्यांची संख्या अत्यल्प होती आणि त्यांच्यामुळे या वर्गातली फूटच स्पष्ट होत होती. नवलाची गोष्ट म्हणजे क्रांतीचा वादळ-पक्षी असे ज्याला संबोधत तो मॅक्झिम गॉर्की हा झुंजार लेखक या नव्या मूल्यांशी निष्ठावान होता. क्रांती आणि क्रांत्योत्तर एकूण शासन याविषयी गॉर्की इतका भ्रमनिरासित झाला होता की लेनिनच्या या आजन्म मित्राने '**असमयोचित विचार**' नावाने आपले जे फुटकळ विचार लिहून ठेविले आहेत त्यात बोल्शेविक क्रांतीतील दहशतवादावर, दडपशाहीवर आणि एकूण प्रतिषेध व निर्बंधयंत्रणेवर कोरडे ओढले आहेत. वास्तविक इतका दीर्घकाळ या लोकांनी क्रांतीची वाट पाहिली होती की क्रांतीमुळे त्यांनी हुरळून जावयास हवे होते. तसे झाले नाही. यावरूनच लेखकमंडळींना वाटणारे क्रांतीचे क्रांतिपूर्व आकर्षण आणि नंतर वस्तुस्थितीचा अनुभव घेतल्यावर होणारी त्यांच्या मनाची अवस्था या ठिकाणी स्पष्टपणे पाहता येते.

बुद्धिजीवीवर्गाचे घटक अनेक असतात. त्यात साहित्यिक आणि वकील, डॉक्टर वगैरे व्यावसायिक असतात. रशियन क्रांतीमध्ये साहित्यिक आणि हे व्यावसायिक उतरले होते. परंतु त्याच्याहीपूर्वी फ्रेंच राज्यक्रांतीच्याही अगोदर बुद्धिजीवी वर्गातील लोकांनी राजकारणात भाग घेतल्याची नोंद आहे. उदा., फ्रान्समधील फ्रेंच ज्ञानकोशासारख्या कामात ज्यांनी भाग घेतला होता अथवा ज्यांची विद्वत्ता तशा प्रकारची होती त्या पंडितांनी व फरान्समध्ये ज्यांना Physiocrats हे नाव होते ते,–' कर वगैरे फक्त शेतजमिनीवर बसविला जावा, सर्वांना व्यवसायाचे आणि सरकारच्या परवानगीवाचून संपत्तीची परस्पर देयाणघेवाण करण्याचे स्वातंत्र्य लोकांना असावे असे म्हणणारे विचारवंत यांनी राजकारणात भाग घ्यावयास केव्हाच सुरुवात केलेली होती. त्या दृष्टीने सामाजिक विचारांचे हे दोघेही अग्रदूतच होते. मात्र सामाजिक सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत म्हणून राजकारणाचा आश्रय त्यांनी केला असला तरी ते क्रांतीचे पुरस्कर्ते नव्हते वा क्रांतिवादीही नव्हते. त्यांची भूमिका सुधारणावाद्यांची होती.







लेखकमंडळींमधील क्रांतिवादाचा पहिला पुरस्कर्ता व अग्रदूत रूसो. 'लोक हेच खरे सार्वभौम' हे अमूर्त तत्त्व मांडणारा आणि राजाची हत्या करण्याचाही हक्क लोकांना आहे असे मानणारा असा हा क्रांतिवादी लेखक. आज ज्या प्रकारच्या लोकांना "दुराग्रस्त बुद्धिवादी" हे विशेषण आपण लावतो त्या प्रकारच्या लोकांचा तो आद्य नमुना. त्याचे क्रांतीविषयीचे स्वैर–कल्पनावादी विचार आणि क्रांतिवादी आकांक्षांची नंतरची तत्त्वप्रणालित्मक बौद्धिक समर्थने यात फार साधर्म्य आढळते. ही बौद्धिक समर्थने राजकीय लेखकमंडळींनी रचली होती आणि नंतरच्या प्रत्येक साहित्यिक पिढीला या प्रणालीने आकर्षित केलेले आहे. (अर्थात प्रत्येक पिढीने तिच्या गरजेप्रमाणे आणि युगधर्माप्रमाणे त्यातील तपशीलात बदल केला होता. आपणाला हवी तशी ती समर्थने सुधारली होती.) रूसोच्या तत्त्वज्ञानात काय नाही? आजच्या क्रांतिकारकांना आकर्षित करणारा, समाज व संस्कृती यांनी मानवजातीवर लादलेल्या दुराव्याचा कल्पनाबंधही रूसोमध्ये आहे! – नैसर्गिक मानव नागर बनला आणि नागरी संस्कृतीत रुळला की त्याचे जन्मजात सद्‌गुण गमावले जातात व आपले खरे सुख नि समाधान तो घालवून बसतो इति रूसो. आधुनिक परिभाषेत, संस्कृतीत विकास घडून आला की मनुष्य तितक्या प्रमाणात स्वतःच्या खऱ्या स्वरूपास पारखा होत असतो! स्टर्नर आणि मारक्यूज हे क्रांतिवादी विचारवीर रूसोचे सरळ रेषेतले वारस आहेत. एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकातील रशियन समूहवादी क्रांतिकारक-मंडळी किंवा मार्क्सवादी मंडळी यांचे क्रांतीच्या नेतृत्वाविषयीचे, क्रांतीचे नेतृत्व उच्चवर्गीयांनी करावयाचे आहे हे आवडते मतही रूसोमध्ये जसेच्या तसे पाहावयास सापडते. बहुजनसमाजाचे नेतृत्व अर्थात इतर कोण करू शकणार असते? जनतेचा लोंढा स्वतःच स्वतःचे नेतृत्व तर करू शकणार नाही. तेव्हा हे काम अर्थातच समाजातील बुद्धिमान श्रेष्ठवर्गावर पडते. 'अंध बहुजनसमाजाला स्वतःची इच्छा कोणती व आपले खरे हित कशात आहे हेच जिथे मुळातच कळू शकत नाही तिथे स्वतःसाठी कायदा निर्माण करण्याचे कार्य तो समाज कसा बरे करू शकेल?' हे कार्य कायदेपंडितच करू जाणे. 'या कामासाठी यंत्रे बनविणारा यंत्रज्ञच हवा असतो.' या वाक्यांच्या फेकी-बरोबर वाचकांच्या मनःचक्षूंसमोर एव्हाना फ्रेंच राजकारणाच्या रंगभूमीवर दडपशाहीने व सक्तीने जनतेला मुक्त बनवायचा इरादा बाळगणारा आणि नोत्रदाम नामक मेरी मातेच्या मंदिरात मेरी मातेचे उच्चाटण करून तिच्या जागी बुद्धिदेवतेचा पुतळा उभारायचा चंग बांधणारा रॉबेस्पियर वकील दिसू लागला असेल नाही? दिसू लागलाच पाहिजे.

बुद्धिजीवी वर्गाला आदर्श कल्पलोकासारख्या कल्पनांवाचून जगताच येत नाही. काल्पनिक रामराज्याची कल्पना लढविल्यावाचून त्याना विद्यमान परिस्थितीशी व वस्तुस्थितीशी जमवूनच घेता येत नाही. तेव्हा बुद्धिजीवी वर्गही या कल्पनेची एक अत्यावश्यक अट आहे. या प्रकारच्या तत्त्वज्ञानांचा हा एक विशेषच होय. दुसरा विशेष म्हणजे हा एक कोठला तरी स्वतंत्र भूखंड आहे अशा प्रकारची सूचना त्या कल्पनात असते; रूसोने ज्या कल्पलोकाची सूचना केली आहे त्यात हा विशेष आहे. रूसोचा 'उमदा रानमानव' हा अशा प्रकारच्या पृथक् भूखंडात राहात असे. ( टॉमस मोर यांच्या युटोपिया या ग्रंथात युटोपियाचे एक स्वतंत्र भूखंड हे लक्षण आढळत नाही. ) रूसोच्या 'उमद्या रानमानवाच्या' अस्तित्वाबद्दल फ्रेंच विश्वकोशाच्या विद्वान मंडळीत काही शंका होत्या. पण त्या त्यांच्या पुरत्याच. इतर बुद्धिमान मंडळी, त्यात लेखक, कवी हेही आले, 'उमद्या रानमानवाचे' अस्तित्व गृहितच धरूनच ललली होती. एवढेच नव्हे तर हा भूखंड कोठे असावा यासंबंधीचे तर्कही मांडावयास त्यानी सुरुवात केली होती. त्यांच्यापैकी अनेकानी बूगॅनव्हिय[1] या एका अनोळखी व परदेशी प्रदेशाला तो मान दिला होता. अर्थात आदर्श कल्पलोकाचा शोध रूसोचे समकालीन जितक्या शास्त्रीय विश्वासाने घेत होते तितक्याच शास्त्रीय विश्वासाने अशा प्रकारच्या आदर्शकल्पलोकाचा शोध आजची आमची बुद्धिमान मंडळीही घेत असतात. तेव्हा आदर्श, सर्वांगपरिपूर्ण अशा काल्पनिक आदर्श भूखंडाचा बुद्धिमान मंडळींचा शोध इतकी शतके उलटून गेली तरी यत्किंचितही कमी झालेला नाही. खरे ज्ञानी व शास्त्रसंपन्न अशा ठिकाणांच्या वस्तुनिष्ठ अस्तित्वाविषयी जरी साशंक असले तरी शिक्षिताना हे ठिकाण आजही रूसोच्या काळातल्या इतकेच सत्य आणि वस्तुनिष्ठ वाटत आहे यात काडीमात्र शंका नाही. अर्थात रूसोच्या काळात ज्याप्रमाणे परक्या, रानटी, अनोळखी व सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेल्या अशा ठिकाणी या आदर्श कल्पलोकाचा शोध घेतला जात असे तसा तो आता घेतला जात नाही. अलीकडचे आमचे बुद्धिजीवी सच्चे श्रद्धाधारक हे ठिकाण कोण मॉस्कोच्या ठिकाणी तर कोण हवानाच्या ठिकाणी शोधीत असतात. सांगायची गोष्ट ही की एखादी वस्तू प्रत्यक्षात अस्तित्वात असल्याची ठाम माहिती आपणास असावी

---

१. बूगॅनव्हिय – लुई अन्त्वान द बूगॅनव्हिय. पहिला फ्रेंच जगपर्यटक. ( १७२९–१८११ ) त्याच्या नावावरून बूगॅनव्हिय हा शब्द. एक अद्‌भुत भूप्रदेश.

व शास्त्रीय भरवशाने तिचा शोध आपण घ्यावा त्याप्रकारे या हालचाली सुरू असतात. असो.

प्रबोधनकाळातील विश्वकोशवाले बुद्धिमंत शिक्षणविषयक विचारात उदारमतवादी असले, राजकीय धारणेत मवाळ असले आणि राजकारणातील बुद्धिवादाच्या उपयुक्ततेविषयी आणि स्थानाविषयी भोळसट असले तरी खऱ्या अर्थाने ते क्रांतिवादी कधीही नव्हते. जास्तीतजास्त त्यांची मजल सुधारणा-वादापर्यंत जात होती. प्रत्यक्ष राज्यक्रांती जेव्हा घडून आली तेव्हा त्यांच्यापैकी कॉन्डोर्से हा एक सोडल्यास बाकीचे सर्व वयोमानानुसार नैसर्गिकरित्या संसार-यात्रा संपवून गेले होते म्हणून क्रांतिवाद्यांच्या हातून सुटले. नाहीतर तें देखिल कॉन्डोर्सेप्रमाणेच क्रांत्योत्तर दडपशाहीला बळी पडले असते. आमच्या या विश्वकोशवाल्यांवर ब्रिटिश व्यवहारवादी तत्त्वज्ञ लॉक याच्या तात्त्विक विचारांचा, ब्रिटिशांच्या घटनात्मक राज्यपद्धतीचा आणि व्हाल्तेरच्या संशय-वादाचा एवढा मोठा परिणाम झालेला होता की, रूसोचे केवळ तात्त्विक विचारही जे मान्य करू शकत नव्हते, त्यांना व्यवहारात आणला जात होता तो रूसो कितपत मानवला असता कोण जाणे? तत्त्वज्ञ रूसो निदान काहीतरी सुसह्य होता. पण रॉबेस्पियर वगैरेंनी व्यवहारात उतरविलेला रूसो म्हणजे असह्यतेचा व मानवजातीच्या दुर्दैवाचा केवळ कळसच होता. अर्थात हुकूम-शाहीला आमच्या या विद्वान बुद्धिजीवींचा आक्षेप असला तरी त्यांच्या मूळ विचारसरणीतच अशी काही वक्रता व बीजे होती की कोलरिज हा इंग्रज कवी म्हणतो त्याप्रमाणे, "मानवजातीची बंधनातून सुटका करण्याचा भाव ते आणीत असले तरी त्यांच्या विचारसरणीतील मुख्य प्रबंध आणि निरंकुश शासन-व्यवस्थेची किंवा हुकूमशाहीची मूलभूत तत्त्वे यात एक नैसर्गिक जवळिक प्रथमपासूनच अस्तित्वात आहे." त्यामुळे या विशिष्ट विचारसरणीच्या प्रभावा-खाली असणारा कोणीही स्वातंत्र्य इत्यादिविषयी कितीही आदर त्याला असला तरी अपाततःच शेवटी हुकमशाही मार्गाकडे खेचला जातो. गोंकूर्त बंधू या लेखन वगैरेत भाग घेणाऱ्या दोघाभावांनी त्या काळासंबंधी रोजनिशा ठेवल्या आहेत. त्यात ते म्हणतात की राज्यक्रांतीचा प्रारंभ विश्वकोशवाले विद्वान ज्या काव्यशास्त्रविनोदाच्या बैठकात वसत असत त्या बैठकात झाला असला तरी जेव्हा खरोखरीची क्रांती आली तेव्हा त्यात भाग घेणारे लोक हे त्या क्रांतीला चालना देण्याच्या गोष्टी करणाऱ्या विद्वानातील नव्हते. नंतर क्रांतीचा सर्व कारभार वेगळ्याच लोकांच्या हाती गेला.

क्रांती झालीच पाहिजे असे म्हणणारे व क्रांतीमुळे येणाऱ्या सुधारणांची वगैरे कल्पनाचित्रे रंगविणारे विश्वकोशकार विद्वान प्रत्यक्ष क्रांतीच्या क्षणी

मागे पडले व त्यांची जागा रॉबेस्पियरसारखे वकील, मॅरट्टसारखे स्वयंशिक्षित साहसी इसम, कारकून, सामान्य लोक इत्यादींनी घेतली.........अनेक प्रमादांनी व चुकांनी भरलेल्या या हास्य-शोक-नाटयाच्या जागतिक प्रथम प्रयोगाकरिता हा पहिला रंगमंच सजविला गेला. पुढे अर्थात प्रमादयुक्त अशा या हास्यशोक-नाटयाचे अनेक प्रयोग होणार होते आणि वाङ्मयसेवकांची राजकारणाविषयीची प्रमेये व प्रबंध आणि प्रत्यक्ष क्रांतीचा रोकडा व्यवहार यांच्या परस्परमीलनातून त्या नाटयाला कायम चालना मिळत राहणार होती. क्रांतीच्या नाटयाला पोषक असणारा उत्साह व स्फूर्ती ही जरी सरस्वतीच्या भक्तांच्या राजकीय लेखनातून व विचारातून मिळत गेली असली आणि सरस्वतीच्या भक्तांचे क्रांतीसंबंधीचे वैचारिक लिखाण जरी क्रांतीवाद्यांच्या हातून जरी बऱ्याचदा सुरक्षित राहिले असले तरी क्रांतीचे स्फूर्तीदाते सरस्वतीचे भक्त मात्र क्रांतीवाद्याच्या शस्त्राला अनेकवार बळी पडत आले आहेत. मुद्दा हा की क्रांती हाच मानवजातीच्या उद्धाराचा एकमेव मार्ग आहे या प्रकारची कल्पिते दुर्दम्य उत्साहाने उराशी कवटाळणारे आणि राजकारणात लुडबूड करू पाहणारे वाङ्मयसेवक जरी कटू भ्रमनिरासाचे वारस झाले तरी म्हणून काही बुद्धिजीवींच्या पुढील पिढ्या क्रांतीच्या परिणामांविषयी शहाण्या झाल्या नव्हत्या व क्रांतीसारख्या कल्पितांपासून दूर राहिल्या नव्हत्या. पतंग जसा दिव्याकडे ओढला जातो तसे हे बुद्धिजीवी क्रांतीच्या कल्पिताकडे वारंवार ओढले जातात. आता हे मात्र खरे आहे की अलीकडे अलीकडे अनेक लेखक-महाशय सुरक्षित अंतरावर राहून क्रांतिदेवतेची भक्ती करू लागले आहेत. परंतु यातही एक गंमत आणि तीही इतिहासाने साधार सिद्ध केलेली गंमत आहे. ती अशी की सर्वसामान्य मनुष्य प्रेमातील नकारातून हिरमुसला न होता जसा परत परत प्रेमदेवतेची आराधना करीत राहतो, तशाच प्रकारे आमचे वाङ्मय-सेवक लेखकलोकही क्रांतीविषयीच्या भ्रमनिरासाने नाऊमेद न होता पुन्हा पुन्हा तिची आराधना करीत असतात. क्रांतीच्या प्रेमाच्या बाबतीत आमचे साहित्यिक फार चिवट आहेत. कुठल्याही नकाराने ते खचत नाहीत आणि भ्रमनिरास झाला तरी क्रांतीच्या कल्पिताचा पिच्छा सोडत नाहीत. आमची साहित्यिकमंडळी इतकी काही चिवट आहेत की सामान्य मनुष्य जसा अनुभव आणि बुद्धी यांनी कितीही मागे ओढले तरी विकार व भावना आणि खोटी सुखस्वप्ने यांच्याच पाठी परत परत जातात, तशाच प्रकारे तेही क्रांतीविषयीचा ऐतिहासिक अनुभव आणि त्यांची स्वतःची विचारशक्ती यांनी कितीही समजाविले तरी परतपरत भावना आणि कल्पिते यांच्याच मागे धावत राहतात.



अनुक्रमणिका

फ्रेंच राज्यक्रांतीनंतर काही काळपर्यंत फ्रान्समध्ये दहशतीचे राज्य स्थापन झाले होते. विश्वकोशाच्या लेखकवर्गापैकी कॉन्दोर्से हा लेखक तेव्हा हयात होता. मात्र लपूनछपून दिवस काढीत होता. असे लपूनछपून दिवस काढीत असताना Sketch of the Progress of the Human Spirit हा मानवाच्या एकूण विकासाचा आलेख रेखाटणारा ग्रंथ त्याने पुरा केला होता. त्यात भावी काळातील मानवाच्या प्रगतीविषयी असे भाकित त्याने केले आहे की, "मानवाच्या पूर्णत्वाला मर्यादा नाहीत. हे पूर्णत्व असीम आहे." केवढी मोठी ही अपेक्षा नि एका कल्पितावरचा केवढा अंध विश्वास ? (भावी काळा-विषयी अगदी असेच भाकीत ट्रॉटस्कीसाहेबांनीही केले होते.) १७९४ च्या मार्च महिन्यातील कॉदोर्सेचे हे शब्द आणि त्यानंतर बरोबर तीन आठवड्यांनी क्रांतिसैनिकांनी त्याला केलेली अटक गिलोटिनची सुरी चुकविण्यासाठी पुढे तो विषाचा प्याला जवळ करतो. क्रांतीचा पुरस्कार करणाऱ्या ट्रॉटस्कीला इतके लगेच क्रांतीच्या चालकांच्या रागाला बळी पडावे लागले नाही म्हणा. त्याच्या डोक्यात स्टॅलिनच्या मारेकऱ्याची बर्फ फोडण्याची हातोडी बसेपर्यंत व ती हातोडी त्याचा प्राण घेईपर्यंत क्रांती होऊन पंधरा वर्षे उलटली होती. क्रांती-नंतर कॉन्दोर्सेप्रमाणे अगदी तीनच महिन्यात काही तो क्रांतिपक्षमालकांच्या रोषास बळी पडला नव्हता. मात्र "मानवाचे भावी जीवन आताच्यासारखे नंतर कंटाळवाणे असणार नाही" हे जे क्रांतीनंतरच्या काळासंबंधीचे भाकित त्याने केले होते, ते तशा नसले तरी अशा अर्थाने खरे झाले ही गोष्ट बरीक खरी !

उत्तम साहित्याच्या बाबतीत फ्रेंच राज्यक्रांती आणि नेपोलियनची कारकीर्द वांझोटीच आहे. ट्रॉटस्कीने या वांझपणाचे स्पष्टीकरण दिले आहे. वर ज्याचा नामोल्लेख आला आहे त्या ग्रंथातच या विषयीसंबंधी त्याने असे लिहून ठेविले आहे की फ्रेंच जनता क्रांतिकार्यात गुंतलेली असल्याने उत्तम साहित्याची निपज ती करू शकली नव्हती. ट्रॉटस्कीमहाशयांचे हे स्पष्टीकरण शुद्ध असत्याचे आहे हे मुद्दाम सांगावयास नको. खरी गोष्ट घडली होती ती अशी: फ्रेंच राज्यक्रांतीनंतर अनेक चांगले लेखक हद्दपारीचे जीवन कंठीत होते. काही स्वतःच वनवासात गेले होते आणि जे काही थोडेबहुत मागे राहिले ते आपल्या जीवाच्या भीतीनेच इतके धास्तावलेले होते की त्या धास्तीपुढे उत्तम वाङ्मय लिहिण्याची शक्तीच त्यांच्या अंगी उरली नव्हती. क्रांती पूर्ण झाल्या-नंतर फारच थोडे "मी आता वाचलो" असे सीएझ ह्या लेखकाप्रमाणे म्हणू शकले होते. दहशतीच्या कालखंडात कामिय् डेझमुयेंला या रॉबेस्पियरच्या

कविमित्राला देखिल फासावर चढविण्यात आले होतें. आंद्रे शोनिए हा त्या काळातील दुसरा एक नामांकित लेखकही गिलोटिनचा बळी झाला होता. यात आश्चर्य व कीव करण्याची गोष्ट ही की तरुणपणी वकिली करीत असताना प्राणदंडाच्या विरुद्ध बाजू घेणाऱ्या रॉबेस्पियरनेच शोनिएच्या मित्रांनी शोनिएला देहदंडाची शिक्षा माफ केली जावी हा केलेला अर्ज धुडकावून लावलेला होता. खुद्द रॉबेस्पियरचे गिलोटिन तेव्हा फारसे दूर नव्हते. (अर्थात त्या क्षणी रॉबेस्पियरला त्याची पुसटदेखिल कल्पना नव्हती.) साहित्य–इतिहासकार पी. इ. शार्वे लिहितो की क्रांतीनंतर अपरिहार्य झालेल्या देशत्यागाचे गंभीर व दूरगामी परिणाम फ्रेंच साहित्यावर व्हावयाचे होते. " नेपोलियन युगामध्ये प्रत्येक प्रश्नातील विसंगती पाहण्याचा व खदखदून हसण्याचा व्हाल्तेरीहास्यधर्म आणि प्रत्येक प्रश्नाकडे उदारमतवादी दृष्टिकोनातून पाहण्याचा माँटेस्कूधर्म फ्रेंच अकादमीतसुद्धा कमाबसाच तग धरून राहिला होता. बादशहा नेपोलियनच्या वतीनें राजप्रतिनिधी म्हणून फुशेनें ललितकलांवर केव्हाच निर्बंध–नियंत्रण बसविले होते. त्याशिवायही कितीएक निर्बंध साहित्याच्या प्रसारावर नेपोलियनने बसविले होते. उदारमतवादी विचारवंतांविषयी त्याचे मन फारसे साफ नव्हतेच. त्यांना तो " काल्पनिक विश्वात रममाण होणारे पंडित " म्हणत असे. मादाम द स्तेल ह्या अतिशय कुशाग्र बुद्धिमत्तेच्या बाईला तर त्याने पॅरिस शहरातून हाकलूनच लावले होते नि तिच्या ' द लालेमान्य ' नावाच्या पुस्तकावर बंदी घातली होती. तिच्या हालचालींवर पोलिसांची सक्त नजर होती. सगळ्या जाचाला कंटाळून तिला शेवटी फ्रान्समधून पळ काढावा लागला. नेपोलियनच्या जाचाचा त्रास झालेला कान्स्टंट हा आणखी एक विचारवंत. त्याचाही नेपोलियनला सतत विरोध असल्याने तो नेपोलियनच्या रोषास कारणीभूत झाला होता. नेपोलियनच्या कारकीर्दीच्या शेवटच्या कालखंडात फ्रान्स सोडून त्यालाही जर्मनीत पलायन करावे लागले. ' ॲडोल्फ ' हे त्याचे सर्वोत्कृष्ट पुस्तक १८१९ त तो प्रसिद्ध करू शकला. वास्तविक १८०६ तच ते लिहून पूर्ण होते. हे मुद्दाम सांगण्याचा मतलब हा की क्रांती झालीच पाहिजे वगैरे घोषणा देणाऱ्या व क्रांतीचे अध्वर्यूपण करणाऱ्या बुद्धिजीवी वर्गाच्या बौद्धिक हालचालींची, क्रांतीच्या बाबतीतील त्याचा उपयोग संपताच ही दशा होत असते. नेपोलियनच्या पराभवानंतर व पदच्युतीनंतर कुठे फ्रेंच साहित्याने पुन्हा जीव धरला.- शॅतोब्रियाँ आणि ह्यूगो, लमार्टिन आणि व्हिनी, स्तांधाल आणि मेरिमे हे सर्वश्रेष्ठ साहित्यकार नेपोलियनच्या उच्चाटणानंतर उदयास आले व प्रसिद्ध पावले.

फ्रान्सबाहेरील युरोपीय आणि इतर लेखक-विचारवंतांवर फ्रेंच राज्य-क्रांतीनें मोठा जबरदस्त परिणाम घडविला होता. फ्रेंच राज्यक्रांतीच्या पहिल्या विजयाबरोबरच मोठे मी-मी म्हणविणारे विद्वान एकजात भारावून गेले. राज्यक्रांतीविषयी त्यांना मोठीच आपुलकी निर्माण झाली. मात्र दिवसगतिक हा उत्साह उतरू लागला. कित्येकांचा तर फ्रेंच राज्यक्रांतीच्या उपयुक्ततेविषयी पुरता भ्रमनिरास झाला. तथापि क्रांतीच्या सुरुवातीला आमच्या बुद्धिमंत-मंडळींचा असा ठाम समज होता की पीडित आणि दुबळ्या, गरीब आणि शोषित यांच्या उद्धाराचे हे काही नवीनच शस्त्र जन्मास आले आहे. पददलि-तांना व अखिल मानवजातीला धीर देणारी ही नवीनच दैवी आशा निर्माण झाली आहे. आता क्रांती पूर्ण झाली. यापुढे समता आणि विवेक यांचे परमेश्वरी राज्य जन्मास येणार. "अशा त्या पुण्यसमयी केवळ जिवंत असणे हेही भाग्याचे होतेच, पण तरुण म्हणून जिवंत असणे हे तर केवळ स्वर्गीयच होते." क्रांतीविषयीच्या आपल्या उत्साहाची कारणमीमांसा देताना वर्डस्वर्थ या कवीने लिहून ठेविले आहे की, "ज्या देशामध्ये विवेक आणि तर्क यांची सत्ता चालू आहे त्या रोमँटिक देशाची मला ओढ आहे."

पण विवेक आणि तर्कावर उभारल्या गेलेल्या रोमँटिक भू प्रदेशाचे वर्डस्वर्थचें आकर्षण अल्पावधीतच मोडून पडण्याच्या बेतास आले. वर्डस्वर्थला जेव्हा कळून आले की अत्याचार, अन्यायाचा नायनाट करण्यासाठी जन्म घेतलेली क्रांती "स्वतःच अत्याचार आणि अन्याय करीत आहे" तेव्हा त्याचा पुरताच भ्रमनिरास झाला. मात्र क्रांतीविषयीचा या प्रकारचा बुद्धिमंतांचा भ्रमनिरास पुढील काळात अनेकवार अनेकांचा होणार होता. इतिहास वारंवारच हे घडून येणार होते. अतिउत्साही व रोमँटिक वृत्तीच्या बुद्धिमंतांना शोषि-तांचे शोषण करून क्रांती पतितांचा उद्धार करणार आहे असे पुन्हा पुन्हा वाटणार होते आणि शोषितांचे शोषण करण्यासाठी कंबर कसलेले महान क्रांतिवादी प्रत्यक्षात स्वतःच दलितांचे, शोषितांचे व सर्वांचेच वारंवार जुलूमकर्ते बनणार होते. पुढील मानवी इतिहासाचे हे कायमचे सूत्रच ठरले. "प्रत्येक पतितपावन देवाच्या वंचनेबरोबर" हे घडून येणार होतें. प्रत्येक नवा देव थोडा काळ पतितोद्धारक वाटणार होता, पण अल्पावधीतच फसव-णूकही ठरणार होता. ज्या कोलरिज कवीने क्रांतीचे तत्त्व मोठ्या उत्साहाने उचलून धरलेले असते तोहि पुढे क्रांतीच्या प्रत्यक्ष प्रतापानी कंटाळून आत्यंतिक दुःखाने व निराशेने असे उद्गार काढतो की "स्वतःच्या जुलमी इच्छांचे हे गुलाम होत! एका वेड्या खेळात तोडल्या त्यानी स्वतःच्या मनगटांवरल्या



अनुक्रमणिका



जीर्ण शृंखला. पण कोरले होतें ज्यावर 'स्वातंत्र्य' हे शब्द, अशा नवीन आणि अधिक मजबूत शृंखला चढविल्या परत त्यानी आपापल्या मनगटांवर."

फ्रेंच राज्यक्रांतीने एकूणएक मनुष्याचा भ्रमनिरास केला होता. या क्रांतीसंबंधी ज्याचा भ्रमनिरास झाला नाही असा एकही इसम शेवटी जगात उरला नाही. गटे, कांट, बिथोवन ज्यानी ज्यानी क्रांतीविषयी फार मोठ्या अपेक्षा बाळगल्या होत्या तो प्रत्येकजण शेवटी भ्रमनिरासित झाला. या सर्वांना क्रांतिसंबंधी शेवटी काय वाटू लागले होते ते गोया नावाच्या चित्रकाराच्या एका वाक्यात व्यक्त झाले आहे. तो म्हणतो की " विवेक आणि विचारांच्या सुखस्वप्नातून शेवटी सैतान पैदा होतात. " गोयाचे हे उद्‌गार क्रांतीविषयी भ्रमनिरास होणाऱ्या प्रत्येक लेखकाच्या विचाराचा सुप्त आत्मा बनले आहेत. होल्डरलिन हा थोर जर्मन कवी क्रांतीच्या संदर्भात लिहितो की, " भूतलाचा स्वर्गलोक बनवावा म्हणून जे जे प्रयत्न मानवाने केले त्या प्रयत्नातून भूतलाचा नरक मात्र बनविला गेला. " डोस्टोव्हस्की या रशियन कादंबरीकाराच्या मनाची स्थिती होल्डरलीनसारखीच झाली होती. तरुणपणी तो क्रांतीच्या तत्त्वाचा भक्त होता. नंतर क्रांतीचे खरे स्वरूप त्याच्या निदर्शनास आले व क्रांतीच्या महत्तेविषयी जेव्हा त्याचा संपूर्ण भ्रमनिरास झाला, तेव्हा क्रांतीच्या धारणेमध्ये गर्भित स्वरूपात असणाऱ्या शून्यवादी प्रवृत्तीसंबंधीचा आपला रोष व्यक्त करताना तो जवळजवळ होल्डरलिनने वापरलें तेच शब्द वापरून असे म्हणतो की, " ज्या योजनेचा जन्म निरंकुश स्वातंत्र्याच्या कल्पनेत होतो त्या योजनेचा शेवट शेवटी हुकूमशाही व्यवस्थेतच होणार असतो. " क्रांती, क्रांतीमागील आशाआकांक्षा व क्रांतीची फलश्रुती याविषयी हीच भावना आजवर अनेकांनी व्यक्त केली आहे. अगदी आमच्या काळापर्यंत! अर्थात मर्यादा नाहीत असे स्वातंत्र्य मिळवायचे अशा योजना स्वीकारून ज्या चळवळी करण्यात येतात, त्यांचा शेवट शेवटी हुकूमशाही व्यवस्था प्रस्थापित होण्यात होतो हा विचार डोस्टो-व्हस्कीने जगात अगदी पहिल्यानेच मांडला होता अशातला प्रकार नाही. या ना त्या स्वरूपात हा विचार कितीतरी लोकांनी मांडलेला आहे. हा राजकीय शहाणपणा तसा फार जुना आहे. तथापि प्रत्येक नवीन पिढीला तो नव्याने शिकावा लागतो इतकेच! पास्कल नावाच्या फ्रेंच गणित्याने व तत्त्ववेत्त्याने हाच राजकीय शहाणपणा डोस्टोव्हस्कीच्याही आधी फार पूर्वी लिहून ठेवला आहे. तो म्हणतो की " माणूस देवदूत नाही आणि सैतानही नाही. मनु-



अनुक्रमणिका



ह्यांच्या बाबतीत सर्वात दुर्दैवाची गोष्ट ही असते की जो एकदा देवदूतासारखा वागतो. तोच कधीकधी सैतानासारखाही वागू शकतो. "

फ्रेंच राज्यक्रांतीचा काळ संपल्यानंतर फ्रान्समध्ये पुन्हा एकदा राजसत्ता प्रस्थापित झालेली असते. राजसत्तेच्या पुनर्प्रस्थापनेनंतर फ्रान्समध्ये जे साहित्य निर्माण झाले त्याची दोन वैशिष्टये दिसतात. त्यातील एक वैशिष्टय हे की क्रांती या विषयासंबंधी त्यात संपूर्ण भ्रमनिरास व वैफल्य आढळून येते. एवढेच नव्हे तर तत्कालीन जगासंबंधीही एक प्रकारची निराशाही त्यात व्यक्त झालेली जाणवते. दुसरे वैशिष्टय हे की ते साहित्य बऱ्याच प्रमाणात रोमँटिक आहे. राजसत्तेच्या पुनर्स्थापनेनंतरच्या काळातील साहित्य प्रामुख्याने रोमँटिक जातीचे साहित्य आहे. त्यात वास्तवाविषयीची उदासीनता व काल्पनिका-विषयीची ओढ होती. चिकित्सक आणि तर्कनिष्ठ विचाराऐवजी कल्पना-विलासाला व भावविवशतेला फार महत्त्व होते. फ्रेंच साहित्यातील रोमँटिक-वादाची ही पूर्वावस्था. एका दृष्टीने ज्ञानयुगातील बुद्धीवरच्या श्रद्धेची थोडी उशीरा सुरू झालेली प्रतिक्रियाच ! ज्ञानयुगाची श्रद्धा ही होती की मनुष्य हा हळूहळू पूर्णत्वाकडे चालला असून त्याची विचारशक्ति व चिकित्सक बुद्धी त्याला संपूर्ण पूर्णत्वाकडे नेणार आहेत. रोमँटिकवाद बुद्धीऐवजी भावनांना अधिक महत्त्व देतो. रोमँटिकवाद म्हणजेच भावनांचे आकर्षण आणि भाव-नांच्या महत्त्वाची प्रतिष्ठापना. फ्रेंच राज्यक्रांतीमध्ये अशा कित्येक अविचारी व क्रूर घटना घडल्या की ज्यानी त्याचा अनूभव घेतला होता त्या फ्रेंच बुद्धिजीवीवर्गाचा मनुष्यातील बौद्धिक शहाणपणावरचा संपूर्ण विश्वासच त्यामुळे खतम् झाला. मनुष्य बुद्धीने चालत राहिल्यास त्याचा उद्धार होणार आहे या आशावादालाच फ्रेंच राज्यक्रांतीमुळे तडा गेला होता. त्यामुळे लेखक वगैरे बुद्धि-जीवींनी विचारांचे दुसरे टोक जे भावना ते पकडले होते. बुद्धी आणि विचार याच्याकडून ते एकदम काल्पनिक सुखाची स्थिती इत्यादीत स्वतःचे मन रमवीत होते. या लोकांना क्रांतीची आठवणदेखील नकोशी झाली होती. रोमँटिकवादी साहित्यामागील प्रेरणा ही अशा प्रकारे क्रांतिविरोधी धारणेची होती. क्रांतीची जणू लोकांना आता कायमची घृणा आली होती. मात्र काळ जसा उलटत होता तसतशी क्रांत्युत्तरपर्वाच्या कटू आठवणीही विरळ होत होत्या. हळूहळू क्रांत्युत्तर काळातील दहशतवादी घटना त्या सप्टेंबर कत्तली, ते दहशतदडपशाहीचे युग तथाकथित बौद्धिकता व विचारीपणा यांचे भयानक माथेफिरूपणात झालेले रूपांतर, नेपोलियन राजवटीतील क्रूर आणि दडपशाही सैनिकीशासन—वगैरेंची स्मृती लोपत गेली. बुद्धिवादी लेखकवर्गाच्या मनावरचा त्या स्मृतीचा दबावही

कमी झाला. परिणामतः १८३० च्या दरम्यान रोमँटिकवादामध्ये " क्रांती-विषयक आकर्षणाचे वारे पुन्हा एकदा संचारू लागले. फ्रान्स आणि इतर देशात उर्जितावस्थेला आलेला रोमँटिकवाद परत एकदा क्रांत्युत्सुक बनला होता. फ्रान्समध्ये तर क्रांतिवाद म्हणजेच राष्ट्रवाद हीच सार्वत्रिक भावना बनली होती क्रांतीचे कल्पित परत एकदा पुष्ट झाले. जगातील पहिली जनता-राज्यक्रांती फ्रान्समध्ये घडून आली असल्यामुळे की काय पण क्रांतिवाद हे जणू केवळ फ्रान्सचे एकट्याचेच राष्ट्रीय तत्त्वज्ञान आहे अशा प्रकारची कल्पना फ्रेंच बुद्धिवादीवर्गाने करून घेतली होती. क्रांतिवाद हाच फ्रान्सचा राष्ट्रवाद बनला होता व क्रांतीचे कल्पित या खोट्या राष्ट्रीय भावनेवर दिवसामाजी बाळसे धरीत होते. मात्र ही खोटी राष्ट्रीय भावना अगदी साहजिक होती. फ्रान्स हे आता एक पराभूत राष्ट्र होते. युद्धात त्याचा अहंगंड दुखावला गेला होता. व्यक्तीला काय किंवा राष्ट्राला काय न्यूनगंड कधीच सहन होत नसतो. दुखावलेला अहंगंड सावरून धरण्यासाठी मग खोटा अहंभाव पुढे केला जातो. पराभूत फ्रान्सदेखिल क्रांतिवादाच्या तत्त्वज्ञानाला राष्ट्रीय अस्मि-तेचा विषय बनवून तेच करीत होता. आम्ही पराभूत असू पण क्रांतिवादा-सारखे जगदुद्धाराचे तत्त्वज्ञान फक्त आम्हीच जगाला देऊ शकतो ही त्यामागील भावना होती. त्यातच इतर अनेक गोष्टींची भर पडून क्रांतिवादाचे कल्पित शक्तिमान बनत होते. सेंट जुस्त व दांता सारख्या लोकपुढाऱ्यांची राष्ट्र-प्रेमाने ओथंबलेली भाषणे, क्रांतीच्या घटनेतच कारुण्याला अनुकूल असणारे नाट्यमय वातावरण, नेपोलियन बादशहाच्या नेतृत्वाखाली फ्रेंच सैन्याने गाजविलेल्या शौर्याच्या आठवणी या सर्वांनी त्या कल्पिताला शक्तिमान बनवि-ण्यात आणखी हातभार लाविला होता. पराजित फ्रान्स आणि त्या फ्रान्सचा लेखकवर्ग या सर्वांमुळे अगदी भारला गेला. क्रांत्योत्तर राजवटीत लोकांच्या ज्या हालअपेष्टा झाल्या होत्या तो गतेतिहास विसरून गेला. हा वर्ग क्रांत्योत्तर काळात जनतेवर झालेला अत्याचार किती प्रमाणात विसरला होता याचे उदाहरण तत्कालीन लेखकवर्गाच्या ललित लेखनातही उत्तमप्रकारे गवसते. उदा., व्हिक्टर ह्यूगो या फ्रान्सच्या तत्कालीन नामांकित कादंबरीकाराच्या कादंबऱ्या पाहा. व्हिक्टर ह्यूगो हा नेपोलियनच्या एका सेनापतीचा मुलगा. म्हणजे फ्रान्सच्या तत्कालीन परिस्थितीचा पूर्ण अनुभव त्याला असावयास हवा होता. क्रांतीच्या दुष्परिणामांची योग्य ती उमजही त्याला असावयास हवी होती. पण तोही क्रांतीचे कल्पित उचलून धरतो. क्रांतीच्या कल्पिताचे फ्रान्सच्या बुद्धिमंत मंडळीतील सामर्थ्य कसकसे वाढत गेले याचा इतिहास व्हिक्टर



अनुक्रमणिका

हेथूगोच्या कादंबऱ्यांतून आपणास पाहावयास सापडतो. वास्तविक निदान क्रांतीच्या सामर्थ्याविषयी तरी त्यांच्या मनात संशयवाद निर्माण व्हावयास हवा होता. पण तसे झाले नाही. अर्थात क्रांतीच्या सामर्थ्याविषयीचा संशय फ्रेंच बुद्धिमंतांच्या मनात निर्माण झाला. परंतु तो पुढे द तॉकविय या लेखकाच्या काळात. द तॉकवियने हा संशय प्रथम बोलून दाखविला व बुद्धिमंतांच्या धारणेला चालना दिली. द तॉकविय हा कदाचित जगातील पहिला राजकीय विचारवंत की जो अशा प्रकारच्या कल्पितांच्या सामर्थ्यविषयी साशंक आहे. तो म्हणतो की क्रांतिकारी चळवळीमध्ये जनतेच्या धर्मश्रद्धेचे रूपांतर राजकीय श्रद्धेमध्ये होत असले तरी या राजकीय श्रद्धेची मूलभूत प्रकृती धार्मिकच राहते. त्या श्रद्धेचे सर्व आविष्कार धार्मिक श्रद्धेच्या आविष्कारासारखेच असतात. राजकीय तत्त्वज्ञानावरील बुद्धिमंतांची व सर्वसामान्य लोकांची श्रद्धा परमेश्वर, स्वर्ग आदि पारलौकिकांवरच्या श्रद्धेसारखीच असते एवढेच सत्य द तॉकवियनें ओळखले नव्हते, तर धार्मिक श्रद्धेमध्ये जो दुराग्रह, कडवेपणा व अंधश्रद्धाळू माथेफिरूपणा असतो तोच आग्रह, कडवेपणा व अंधश्रद्धाळू माथेफिरूपणा राजकीय तत्त्वप्रगालीच्या पाठिराख्यांमध्येही असतो हे देखिल त्याने ओळखले असावे, एकूण रचनेच्या बाबतीत धार्मिक कडवेपणा व माथेफिरूपणा आणि राजकीय कडवेपणा व माथेफिरूपणा यात काहीही फरक नाही. दोन्ही अगदी जुळी भावंडे आहेत. क्रांतीच्या घोषणेबरोबर धार्मिक श्रद्धेचे रूपांतर राजकीय श्रद्धेत होत असले तरी मनुष्याच्या प्रकृतीत क्रांतीच्या घोषणांमुळे कुठल्याही प्रकारचा मूलभूत फरक होत नसतो. मनुष्यांनी धार्मिक तत्त्वज्ञान टाकून राजकारण स्वीकारले म्हणून ती उदारमतवादी बनत नसतात. पहिल्याइतकीच ती नंतरही दुराग्रही राहतात आणि कडवी माथेफिरूही असतात. हे क्रांतीच्या राजकारणाचे महान मर्म ओळखणारा पहिला राजकीय विचारवंत द तॉकविय. द तॉकवियच्या प्रतिपादनाचे सत्य आणि महत्त्व फ्रेंचांना व इतरांना जरी लगोलग उमजले नाही तरी कालांतराने ते उमजणार होते. अर्थात सत्य उमजले तरी मनुष्ये त्या सत्याकडे वळणार होती असे नाही.

१८४० त फ्रेंचांच्या जीवनातली आशा आणि निराशाही कडेलोटी स्थितीला पोचलेली असतात व त्यांना एक वेगळेच असे राजकीय स्वरूप आलेले असते. मनुष्याच्या आशा आणि निराशा जेव्हा एकांतिक बनतात तेव्हा आता आपल्या आयुष्यात काही बरे घडले तर ते फक्त राजकीय उलथापालथीमुळेच घडू शकेल, इतर कशाहीमुळे ते घडणार नाही अशा प्रकारचे एकांतिक व घायकुतीचे तत्त्वज्ञान त्यांना सुचू लागते. किंवा कोणी सुचविल्यास पटू लागते.



अनुक्रमणिका

कोठल्याही समाजात जर काठावरच्या महत्त्वाकांक्षी परंतु महत्त्वाकांक्षेला वाट नाही म्हणून निराश, होतकरू पण कर्तृत्वाला वाव नाही म्हणून वैफल्यग्रस्त– नागरिकांची संख्या अमाप वाढली आणि राजकीय उलथापालथीव्यतिरिक्त इतर कोठल्याच मार्गांनी सत्ता आपल्या हाती येऊ शकेल असे जर त्यांना वाटेनासे झाले तर ते क्रांतिकारी गुप्त मंडळ्या व घातपाती संस्थांमध्ये सामील होऊन विध्वंसक कृत्ये करण्याच्या मागे लागतात. १८४० च्या फ्रान्समध्ये अगदी हेच घडले. बाबफ आणि बुओनारोट्टी लेखकद्वयाच्या Conspiracy of the Equals या पुस्तकापासून स्फूर्ती घेतलेल्या अनेक गुप्त संघटना तिथे स्थापन झाल्या. त्यांनी क्रांतिवादी तत्त्वज्ञान जवळ केले. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर निर्माण झालेल्या दहशतीच्या राजवटीचा अनुभव घेतलेल्या फ्रान्सने क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचा त्याग केला होता. पण आता परत एकदा क्रांतीची कल्पना आलिंगिली जात होती—" फ्रेंच क्रांतिवादी परंपरेचा " अभ्यास मार्क्स आणि एंगल्स करू लागतात.

फ्रेंच राज्यक्रांतीच्या स्फूर्तिदात्या तत्त्वज्ञानाच्या स्वातंत्र्य, समता आणि विश्वबंधुत्व या महान त्रयींपैकी शेवटच्या घोषणेला अपयश आल्याचे दिसल्यावर क्रांतीच्या घड्याळाचा लंबक अगदी विरुद्ध दिशेला झुकला. बॉदलेर हा कवी आपल्या काव्यात गाऊ लागला की " क्रांतीची नशा ही माझी भयंकर चूक होती. " फ्लॉबेर हा कादंबरीकारसुद्धा त्याच्याच सुरात सूर मिळवितो. क्रांतीविरुद्धच्या फ्लॉबेरच्या भावना तर इतक्या तीव्र बनलेल्या असतात की, " भावनांची शिस्त " हा त्याने त्या काळात लिहिलेला ग्रंथ १९६८ मध्ये जेव्हा पॅरिस येथे विद्यार्थीबंड झाले तेव्हाही पालकवर्गाने मोठ्या उत्सुकतेने व मनापासून वाचून काढला. १८४८ मधील डोके भ्रमिष्ट करून टाकणाऱ्या " जून दिवसांतून " बाहेर आल्यानंतर आणि १८५१ तील राजकीय उलथापालथ घडून गेल्यानंतर फ्रेंच लेखकवर्गाची क्रांतीची संपूर्ण नशा खाडकन उतरली व ते क्रांतीच्या चळवळीतून दूर झाले. बॉदलेर तर असे म्हणू लागला की बुद्धिमंत ज्याच्या पाठी धावत होते तो भूतलावरला स्वर्ग हे खऱ्या स्वर्गाचे उलटे प्रतिबिंबच आहे. रामराज्यवाल्या चळवळ्यांविषयी तो असे म्हणतो की रामराज्याकरिता खटपट करणारे हे उपक्रमशील उद्योगवीर म्हणजे सामान्य मनुष्याच्या सुखी जीवनाची केवळ " वंचना " होती. एका कल्पिताच्या नावाखाली ते समूहाला त्यांना हव्या त्या प्रकारे हाकू पाहतात. क्रांतिवादी बुद्धिवंत अफिणबाजांपेक्षाही कसे अधिक झिंगलेले आहेत हे सांगताना एके ठिकाणी जं जॅक रूसो या क्रांतीच्या आद्य उद्गात्याच्या प्रतिपादनाविषयी तो असे म्हणतो की जं जॅक हा तर अफीण न पिताच झिंगलेला होता. "

फ्रेंच साहित्य आणि क्रांती यांच्या प्रणय-इतिहासाच्या अनेक परी घडून आलेल्या आहेत. फ्रेंच साहित्यात क्रांतिदेवतेला अनेक प्रियकर गवसले. अलीकडच्या काळातील त्या फंदातले मोठे नाव म्हणजे जँ पॉल सार्त्र हे. बॉदलेर व फ्लॉबेर यांच्यावर तर त्याचा भलताच राग आहे. फारच मोठ्या आवेशाने या दोघांवर तो तुटून पडत असतो. बॉदलेर व फ्लॉबेर या दोघांहीवर त्याने एक ग्रंथ लिहिला आहे. त्यात "खऱ्या क्रांतिकारकांप्रमाणे जग बदलायची महत्त्वाकांक्षा पेलू न शकणारा सामान्य विद्रोही" अशी तो बॉदलेरची संभावना करतो. फ्लॉबेरला तर तो एक सर्वसामान्य मध्यमवर्गीय बूर्ज्वा बुद्धिमंत असेच समजतो आणि पुढे म्हणतो की "एका उच्च आणि उदात्त दृष्टिकोनातून जगाचे अवलोकन करायचा प्रयत्न करत असतानासुद्धा स्वतःचा क्षुद्र, मध्यमवर्गीय बूर्ज्वा दृष्टिकोन तो टाकू शकत नव्हता." अलीकडच्या काळात सार्त्रसाहेबांची क्रांतीविषयीची ही आच थोडी थंड झाली असावी. पण चमक कायम नाहीशी झालेली नाही.

"शोषण, दुरावा आणि इतर जी अनेक दुर्दैवे व उद्वेगजनक बाबी या समाजामध्ये दिसत आहेत त्यांच्यापासून मनुष्याची सुटका करता येण्यासारखी आहे काय? आपणाला तर बुवा त्याची खात्री देता येत नाही...... क्रांतिवाद्यांना क्रांतीच्या मार्गावर कुठे व केव्हा थांबावे हे कळत नाही असे इतिहासकार म्हणतात. मला तर याच्या विरुद्धच घडत असल्याचे जाणवते. क्रांतिवादी थांबतात आणि म्हणूनच तर त्यांच्या नंतरच्या पिढीला त्यांचे निशाण उचलून त्यांच्या पुढे जाण्याची गरज भासत असते...एक जरी क्रांतिकारी चळवळ मार्गात कोठेच न थबकता आपल्या हेतूंच्या अगदी शेवटच्या टोकाला जावयाला व त्यांची "तड लावावयास" तयार होईल तर कितीतरी बरे होईल असे मला वाटते." सार्त्रची क्रांतीची रग अद्यापही जिरलेली नाही हेच हे शब्द दर्शवितात. सार्त्रमहाशयांचे हे शब्द वाचले की क्रांतीच्या कर्तबगारीविषयी इतक्यांदा भ्रमनिरास झाला तरी आदर्श रामराज्यकल्पनांबरोबरची बुद्धिमंतांची बांधिलकी कशी संपुष्टात येत नाही हे कळून येऊन मन आश्चर्याने भरून जाते. सार्त्रने वर मांडले तितक्या अल्प शब्दात क्रांतीच्या भ्रमाचे आकर्षण इतर कुणाच्याही शब्दातून व्यक्त झाले नसेल. असो. आता सार्त्रचा वरचा परिच्छेद अधिक काळजीपूर्वक व चिकित्सक दृष्टीने पाहा म्हणजे मी या सगळ्या विचारांना भ्रम का म्हणतो हे कळून येईल. – सार्त्रला अभिप्रेत असणारे समस्याहीन, सुखी जग कधी प्रत्यक्षात येऊ शकेल की काय याची त्याची त्यालाच खात्री नाही. परंतु तरीही पूर्वीचे क्रांतिवादी आपल्या क्रांति-



अनुक्रमणिका

वादी हेतूंच्या शेवटास गेले नाहीत, घेतलेल्या प्रश्नांची तड त्यांनी लाविली नाही, त्यांनी मध्येच कच खाल्ला व म्हणून त्यांच्या हेतूंना अपयश आले असेही तो ठामपणे सांगतो व त्यांना दोष लावतो. सार्त्रच्या प्रतिपादनातली विसंगती अगदी उघड आहे. ( त्यातच पुन्हा " हेतूंची तड लावायची " हे शब्द सार्त्रने वापरले आहेत. " तड लावणे " या शब्दांचा अर्थ काय घ्यायचा ? त्यांनी काय केले असते म्हणजे त्यांच्याकडून हेतूंची " तड लाविली " गेली असती ? आपल्या हेतूंची तड लावण्यासाठी क्रांतिवाद्यांनी नेमके काय करावयास हवे होते याचे स्पष्टीकरण सार्त्रमहाशय कोठेही देत नाहीत. त्यांनी " तड लावावयास हवी होती " असे एक घाऊक विधान करून ते मोकळे होतात. विशेषतः सार्त्र ज्या " दहशत–दडपणविरहित " क्रांतीचे नाव घेतात त्या " दहशत–दडपणविरहित " क्रांतीच्या संदर्भात क्रांतिवाद्यांनी " तड लावणे " या शब्दांचा अर्थ काय घ्यायचा होता व काय करायचे होते हे तर निव्वळ सूचितदेखिल ते करीत नाहीत. या शब्दातून कोणती कृती त्यांना अभिप्रेत होती ते त्यांचे त्यांना माहीत ! )

क्रांती ही वस्तू जितकी भयानक वाटते तितकी ती प्रत्यक्षात भयानक असत नाही या प्रकारचा युक्तिवाद फ्रेंच राज्यक्रांतीच्या बाबतीत करता येण्यासारखा आहे. इतर आधुनिक क्रांत्यांच्या बाबतीत तसा युक्तिवाद करता येईल की नाही ही शंकाच आहे. फ्रेंच राज्यक्रांतीत घडून आलेला विध्वंस व वित्त आणि मनुष्यहानी पाहूनदेखिल एवढ्या मोठ्या उत्पाताच्या मानाने झाली ती हानी व हत्या काहीच नव्हत अशा प्रकारचे उद्‌गार क्रांतिवाद्यांचा सहप्रवासी नि फ्रेंच क्रांतीचा समकालिन स्कॉच जॉन मॅकिन्टॉश काढू शकतो. मागाहून अर्थात आपले ते शब्द तो मागे घेतो. पण क्रांतीची धुमश्चक्री चालू असता १७९१ त तो लिहितो की, " एवढा मोठा प्रलय झाला व संसार कोसळला तरी फारच थोडी मनुष्ये त्याच्या वजनाखाली चिरडली आणि एकूण विचार करता हा एवढा प्रचंड उत्पात फारच सौम्यपणे घडून आला. " एवढा प्रचंड उत्पात घडूनही मनुष्यहानी व वित्तहानी फारशी झाली नाही म्हणून मॅकिन्टॉश कौतुक करतात. मागाहून अर्थात सगळा विचार करता क्रांती या वस्तूविषयी तेही भ्रमनिरासित होतात. परंतु प्रारंभी तरी क्रांतीच्या व प्रगतीच्या वेदीवर किती थोडी मनुष्ये आहुतीदाखल बळी गेली याचेच त्यांना कौतुक वाटत असते. जगात अशा मॅकिन्टॉशांची संख्या अमाप आहे. क्रांतीत किती मनुष्ये प्राणास मुकली याच हिशेबावर क्रांतीची इष्टानिष्टता जोखायची ठरविले तरीही रशियन क्रांतीचे कुठल्याही प्रकारचे समर्थन देता येण्यासारखे नाही. फ्रेंच राज्यक्रांतीत व दहशतीच्या काळात बळी गेलेल्या मनुष्यांची संख्या वीस



अनुक्रमणिका

हजार इतकी होती. रशियन क्रांतीच्या महादहशतीच्या वळींची संख्या वीस दशलक्ष आहे. अर्थात क्रांतीच्या समर्थनाचा उपद्व्याप यामुळे वंद होतो असे नाही. आता थोडी अधिक निष्ठुर भूमिका घेतली जाते व म्हटले जाते की अंडे फोडल्यावाचून अंड्याचे ऑम्लेट करता येत नाही. क्रांतीसारख्या महापुरात काही अनर्थ घडायचेच. तात्पर्य, क्रांती हवी तर मनुष्यांची आहुती पडावीच लागेल. म्हणजे मनुष्य आणि वित्तहानीचे एवढे महाभारत पाहूनही आमच्या वुद्धिमंतांच्या डोक्यात काहीच प्रकाश पडत नसतो. जगदुद्धाराच्या कायम व सर्वांगपरिपूर्ण पायवाटा शोधणाऱ्या आमच्या लेखक व वुद्धिमंत मंडळींच्या वावतीत शेवट साध्य रामराज्य–संकल्पनचित्र आणि त्या शेवटाचे साधन रक्त-रंजित क्रांती एवढी दोनच समाधानकारक दैवते उरत असतात !

× × × ×

साहित्य आणि क्रांती यांचा एकमेकांवरोवरचा संवंध आणि त्या क्रांतीच्या प्रवाहात अडकलेल्या लेखकवर्गाचे दैव याचे दिग्दर्शन करणारे उत्तम उदाहरण आमच्या स्वतःच्याच क्रांतिवादी युगाने पुरविलेले आहे. उदाहरण मोठे नमुने-दार आहे. त्याची व्यवस्थित पाहणी केली तर अनेक निष्कर्ष उमजण्यासारखे आहेत. उदा., क्रांतिवादी शासने आणि जेथे क्रांतो नाही अशी शासने या दोन प्रकारच्या देशातील क्रांतिपुरस्कर्ते लेखक व कलावंत यांच्या मृत्यूच्या सरा-सरीची जर तुम्ही तुलना केली तर तुम्हाला मोठा गंमतीशीर विरोधाभास पाहावयास सापडेल. विरोधाभासाच्या भाषेतच वोलायचे तर असे म्हणता येईल की क्रांतीचा पुरस्कार करणाऱ्या लेखकांना व कलावंतांना नैसर्गिक मृत्यू फक्त जेथे क्रांतिवाद्यांचे शासन नाही अशाच देशात येऊ शकतो. जिथे क्रांतिवादी शासने आहेत तेथे नैसर्गिक मृत्यू फक्त अनैसर्गिक मार्गांनीच येत असलेला आढळतो. क्रांतिपुरस्कर्त्या लेखक–कलावंतांच्या मरणाच्या आकडेवारी-संवंधीचे हे विधान तुम्हाला थोडे अतिशयोक्तीचे व थट्टेचे वाटेल. परंतु ती अतिशयोक्ती नाही आणि थट्टाही नाही. क्रांती न झालेले व पश्चातक्रांती अशा दोन्ही समाजांची जर परस्परांशी तुम्ही तुलना केली तर तुम्हाला असे आढळून येईल की, क्रांती होऊन क्रांतिकारी शासन प्रस्थापित झालेल्या देशांपेक्षाही क्रांती न झालेल्या देशातच लेखकांना व कलावंतांना सर्जनाच्या अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य अधिक प्रमाणात उपलब्ध आहे. माझा मुद्दा तसा समजण्याला कठीण नाही आणि अगदी उघड व स्पष्ट आहे. – साहित्याचे नोवेल पारितोषक मिळविणाऱ्या पुढील दोन साहित्यिकांना त्यांच्या क्रांतिवादी देशात जी वागणूक

मिळाली त्याचा विचार करा. सोल्झेनित्सिन आणि पाब्लो नेरुदा यांना त्यांच्या क्रांतिवादी सरकारने जी वागणूक दिली ती अशा प्रकारच्या वागणुकीचा व घटनांचा प्रातिनिधिक नमुना आहे. सोल्झेनित्सिन किंवा नेरुदा यांचे उदाहरण घ्यायचे नसेल तर ब्रेख्टचे उदाहरण घ्या. किंवा हवे तर पिकासोचे उदाहरण घ्या. १९४५ मध्ये पिकासो कम्युनिस्ट पक्षाचा सभासद झाला. परंतु आजही परंपरावादी व आकार आणि बाह्य रूप यांचे यथार्थ चित्रण करणारी, मात्र क्रांतीच्या तत्त्वज्ञानाच्या प्रचाराला हातभार लावू न शकणारी रूपवादी शैली-तील चित्रे कम्युनिस्ट देशात दाखविली जात नाहीत. एवढेच कशाला पण १९७१ च्या नवंबरात जो एक प्रसंग घडला त्यावरूनही क्रांतिवादी देशात कले-मागच्या मानवी मनाच्या उत्स्फूर्त अभिव्यक्तीकडे कशा प्रकारे पाहिले जाते याचे दिग्दर्शन सहज घडून येते. पिकासोच्या नव्वदाव्या वाढदिवसानिमित्त व तो दिवस साजरा करावा म्हणून पॅरिसच्या चित्रप्रदर्शनगृहात पिकासोने काढलेल्या चित्रांचे सार्वजनिक प्रदर्शन नवंबर १९७१ त भरविण्यात आले होते. या प्रदर्शनाला ब्रेझनेव्ह गेले होते. त्यांनी प्रदर्शन पाहिले पण चित्रांविषयी मत काही प्रदर्शित केले नाही. तेव्हा पिकासोच्या चित्रकारीविषयी तुमचे मत काय असे कोणीतरी त्यांना विचारले. त्यावर त्यांनी जे उत्तर दिले ते मतप्रणालींना सर्वांगाने वाहून घेणाऱ्या मनोवृत्तीचे द्योतक आहे. ब्रेझनेव्ह म्हणाले की, "शांततेचे प्रतीक म्हणून कबुतर या पक्षाची निवड करण्यात पिकासो यांची असामान्य कल्पकता दिसून येते." पिकासोच्या कबुतरचित्रणाचीच तेवढी स्तुती ब्रेझनेव्ह यांनी करण्यामागचे मर्म असे आहे की शांततेचे प्रतीक म्हणून कबुतराची पिकासोनी केलेली निवड कम्युनिस्टांनी आयोजित केलेल्या जागतिक शांतता परिषदेत ( कम्युनिस्ट पीस काँग्रेस ) फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाच्या वतीने झालेली होती. पिकासोच्या चित्रांच्या संदर्भातील ब्रेझनेव्ह यांचे उद्‌गार पुढील पिढ्यांच्या माहितीसाठी कायम टिकतील अशा प्रकारे जतन करून ठेवण्या-लायक आहेत. असो. पण ब्रेख्ट, पिकासो ही बडी नावे सोडली तरी क्रांतिकारी सरकारात लेखक–कलावंतादींच्या सर्जनात्मक उद्योगांचे व सर्जनाच्या स्वातंत्र्याचे काय होते हे सांगणारी खंडोगणती उदाहरणे उपलब्ध आहेत.

क्रांतिवादी देशात लेखक–कलावंतांच्या आत्माभिव्यक्तीच्या स्वातंत्र्याची दशा काय होते हे अनुभविल्यामुळेच की काय पण मास्को–यात्रेहून परतल्यावर आणि "भावी काळ आणि त्यातील वैभव" आपण तेथे पाहिले असा जयघोष करणाऱ्या व मास्कोवर अतिउत्साही विश्वास दाखविणाऱ्या लेखकांपुढे जेव्हा त्यांच्या स्वप्नभूमीत राहता येण्याची संधी उपस्थित झाली तेव्हा तिला त्यांनी नकार दिला असावा.

लिआँ फॉय्टवांजेर या सद्गृहस्थांनी १९३७ त जेव्हा मॉस्कोला भेट दिली तेव्हा "खऱ्याखुऱ्या स्वातंत्र्याचा" त्यांना एवढा मोठा साक्षात्कार त्या ठिकाणी झाला की, त्या स्वातंत्र्याचे आणि तेथील क्रांतिविरोधी नागरिकांवर भरण्यात येत असलेल्या मॉस्को–खटल्यांचे समर्थन करणारे एक पुस्तकच त्यांनी लिहून टाकले. मॉस्को–खटल्यात कैद्यांकडून कबुलीजबाबाच्या ज्या कैफियती मिळविण्यात येत त्याच्या संदर्भात सन्मान्य फाय्टवांगर म्हणतात की हे कबुली-जबाब म्हणजे जर खोटे किंवा पूर्वरचित जबाब असतील तर सत्य कशाला म्हणायचे हेच मला कळत नाही." मात्र या सद्गृहस्थांवर जेव्हा विजन-वासात जाण्याची पाळी आली तेव्हा "खरेखुरे स्वातंत्र्य" असलेल्या रशियाच्या देशात न जाता प्रथम फ्रान्स आणि नंतर अमेरिका यासारख्या "सामान्य, मिळमिळीत व औपचारिक" बूर्झ्वा स्वातंत्र्य असणाऱ्या देशात राहणे त्यांनी पत्करले. ही गोष्ट मोठी बोलकी आहे. तीच स्थिती हेन्रिख मान यांची. आयुष्यभर ते अमेरिकेत राहिले आणि अनेक वर्षांच्या तर्कवितर्कानंतर जर्मन डेमॉक्रॅटिक रिपब्लिकमध्ये जाण्याचा निर्णय त्यांनी घेतला त्याच क्षणी ते मरून गेले. ब्रेख्टमहाशय तेथे गेले. परंतु आपला ऑस्ट्रियन सरकारचा पासपोर्ट आणि स्विस बँकेतील खाते या दोन्ही गोष्टी शेवटपर्यंत धरून ठेवल्या.

तेव्हा एक गोष्ट आपण कायम लक्षात ठेवावयास हवी. ती ही की राम-राज्यआदर्शराज्यांबद्दलचा आपला अभिमान आणि भक्ती नि त्यांच्याविषयीची क्रांतिवादी ओढ ही त्या क्रांतिकारी आदर्श स्वप्नभूमीत राहण्याची सक्ती आपणावर झाली नाही तरच टिकून राहू शकतात. प्रत्यक्ष त्या क्रांतिकारी देशात राहण्याची पाळी आली की हा सगळा उत्साह कोठल्या कोठे नाहीसा होतो. क्रांतीविषयीचा आमच्या युगाचा अनुभव आहे हा. असो. जिथं प्रत्यक्ष क्रांती घडली आहे तेथील लोकांची आणि जे लोक तेथून दूर आहेत, पण कल्पनेने क्रांतीविषयी आत्मीयता बाळगीत आहेत त्यांची क्रांतिविषयीची प्रति-क्रिया परस्परविरोधी असावी हे आश्चर्यजनक नव्हे. एखादी वस्तुस्थिती प्रत्यक्षात अनुभविणारे आणि तिचा अनुभव फक्त कल्पनेत घेणारे अशा दोघा-तील तो फरक आहे. प्रत्यक्ष अनुभव घेणारांपेक्षाही त्या अनुभवाची फक्त कल्पनाच रंगविणारांना तो अनुभव अधिक वेधक वाटायचाच! त्यामुळे क्रांतीची कल्पना ज्यांनी थोडया काळासाठी किंवा कायमपणासाठी अंगिकारिली किंवा क्रांती म्हणजेच रशियनक्रांती असे जे समजले, परंतु क्रांतिकारी देशात ज्यांनी प्रत्यक्ष निवास कधी केला नाही अथवा केला तरी एकदोन आठवड्यां-पुरता प्रवासभेटीच्या निमित्ताने केला अशा लेखकांची जागतिक वाङ्मयातली

संख्या फार मोठी आहे. एवढेच नव्हे तर त्यांची बौद्धिक पातळी व गुणवत्ताही मोठी वरच्या दर्जाची आहे. उदा., क्रांतीच्या कल्पनेच्या लोभात पडलेल्या लेखकात अनातोल फ्रान्स, जॉर्ज बर्नाड शॉ, रोमांरोलाँ, आन्री बारबुझ्, थिओडोर ड्रेझर, अप्टन सिक्लेर, आंद्रे माल्रो, ज्युलिए बेंडा, जँ गेह्लेन, पॉल निझान, आंद्रे गीद, पॉल एलुआर, सीमाँ द बुव्हाः, सीआन् ओ'कॅझी, ऑस्कर लेव्ही, डॉन डॉस पास्सो, एडमंड विल्सन, इ. इ. क्युमिंग्ज, रिचर्ड राइट, डब्लू. एच्. ऑडेन आणि इतर अगणितजण त्यात आहेत.

आता त्यांच्यापैकी अनेकांनी पुढे आपला हा क्रांतीधर्म सोडला. तर अनेकांच्या विचारात बरीच उत्क्रांती नि पालट झाला. अर्थात या सर्वांना एकाच मापपट्टीने मोजता येणार नाही. प्रत्येकाची बाब वेगवेगळी आहे. मात्र एक तपशील मोडल्यास, यापैकी प्रत्येकानेच आयुष्यात केव्हाना केव्हा क्रांतीच्या महानतेच्या कल्पिनाला उराशी कवटाळलेले होते. त्या बाबतीत त्यांची सामाजिक, शैक्षणिक वा सांस्कृतिक पार्श्वभूमि यातील फरक अथवा त्यांच्या व्यक्तिगत व्यक्तित्वातील फरक आड आलेला नव्हता. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळी त्यांचे पूर्वसुरी जसे वागले तसेच हे आमचे आधुनिक विचारवीरही वागले होते. त्यांच्याप्रमाणेच त्यांनीही क्रांतीला (या वेळी रशियनक्रांतीला) स्वातंत्र्य आणि समतेचे मार्गदर्शक व प्रातिनिधिकही तत्त्व मानले होते.

त्यांच्या वागण्याची मोठी गंमत ही की क्रांतीच्या मक्कायात्रेच्या बाबतीत आपला राजकीय अज्ञपणाच केवळ त्यांनी व्यक्त केला नव्हता, तर मक्केत म्हणजे मास्कोत राजकीय तत्त्वज्ञानाच्या नावाखाली जे हिंसाचार चालले होते त्यांचे समर्थन करण्याचीही तयारी त्यांनी ठेवली होती. आता अनातोल फ्रान्स हे गृहस्थ तर महान संशयवादी नि चिकित्सक. प्रत्येक गोष्टीच्या आणि तत्त्वज्ञानाच्या खरेपणाविषयी आणि मोठेपणाविषयी त्यांना जन्मजात संशय. पण या ठिकाणी त्यांचा संशयवादीपणा बहुधा झोपी गेला होता. या राजकीय अत्याचारांबद्दल बोलताना ते लिहितात की, " न्यायाचे युग अवतरलेले पाहायचे असेल तर ते अवतरत असताना घडून येणारे अन्याय, अत्याचार, हिंसा, क्रौर्य याजकडे दुर्लक्ष करणे भाग आहे. " अर्थात अनातोल फ्रान्स यांना विसाव्या शतकातील या दुष्कृत्यांचे प्रमाण केवढे मोठे असणार आहे याची पूर्वकल्पना नव्हती. तरीही एका तथाकथित उत्तम व न्याय्य गोष्टीसाठी अन्याय व अत्याचाराचे समर्थन त्यांनी केले हे प्रकरण मागे उतरतेच ! (अनातोल फ्रान्स यांच्या बाजूने एक गोष्ट जाता जाता सांगता येण्यासारखी आहे. क्रांतीनंतर अनेक रशियन सामाजिक क्रांतिकारकांवर क्रांतीशी प्रतारणा केल्यावरून १९२२ त



अनुक्रमणिका

रशियात खटले भरले गेलें. फ्रान्सनी या क्रांतिकारकांची बाजू घेतली. आपल्या पक्षाच्या धोरणाविरुद्ध जाऊनही ! )

क्रांतीच्या नावाखाली क्रांतिवाद्यांनी आपल्याच सहकाऱ्यांवर आणि इतर नागरिकांवर केलेले अन्याय व अत्याचारांचे वर्तन आणि क्रांतिवाद्यांच्या त्या तथा प्रकारच्या अन्याय्य वर्तनासंबंधी इतर देशातील त्यांचे बुद्धिमंत सहप्रवासी आणि इतर सहानुभूतीदार यांनी घ्यावयाची बौद्धिक भूमिका प्रारंभाला थोडी गोंधळलेली होती; तरी मागाहून त्यात तर्कसंगती आणली गेली. ही भूमिका मोठी बस्तारदणाची होती. सगळचा रक्तपाताचे, हिंसेचे व अन्याय-अत्याचारांचे समर्थन क्रांतीच्या श्रीफलासाठी द्यावी लागणारी अपरिहार्य किंमत अशा प्रकारे घाऊक स्वरूपात न करता किंवा एकजात त्यांना वाईटही न ठरविता काही अन्याय-अत्याचार वाईट, तर काही अपरिहार्य असा आभास त्यातून निर्माण करण्याचा प्रयत्न होऊ लागला. हे लेखक वगैरे असे भासवू लागले की हिंसा व क्रौर्य तत्त्वतः वाईट असलीत तरी काही विशिष्ट प्रसंगात व काही विशिष्ट लोकांच्या बाबतीत ती टाळताच येत नाहीत. म्हणून त्यांचा निषेधही करता येत नाही. थोडक्यात निवडक हिंसेचा त्या भूमिकेत निषेध होता आणि निवडक हिंसेचे समर्थनही होते. किंवा काही हिंसेचा निषेध व त्याजबरोबर हुकूमशाही व दहशतवाद यांचा पाठपुरावाही होता. या भूमिकेत अनुस्यूत असलेली प्रधान बौद्धिक सूत्रे Die Massnahmc मध्ये फार चांगल्या प्रकारे पाहावयास सापडतात. ब्रेख्टने तिथे पक्षसंस्थेला नीतिसंस्थेपेक्षा श्रेष्ठ आणि वरिष्ठ संस्था ठरविले आहे. तो म्हणतो की नीतीपेक्षा पक्ष श्रेष्ठ व वरिष्ठ आहे. ब्रेख्ट लिहितो की "साम्यवादाच्या शिपायाच्या अंगी खरे बोलण्याचे बळ असावे लागते, तसेच खरे न बोलण्याचेही बळ असावे लागते." या नाटकात साम्यवादाच्या शिपायाच्या कबुलीजबाबाचा आणि त्याच्या पुढील देहदंडाचा असा एक प्रसंग रंगविण्यात आलेला आहे. ते दृश्य ही जणू काही नंतरच्या मॉस्को-खटल्यांचीच पूर्वावृत्ती असावी. कारण क्रांति-सैनिकाच्या कायदेशीर हत्तेच्या निमित्ताने व शासनाच्या बाजूचा म्हणून जो युक्तिवाद तेथे ब्रेख्टने दाखविला आहे तोच पुढे मॉस्को-खटल्यांच्या वेळी सहप्रवासी बुद्धिमंत देत होते. पक्षसंख्या नैतिक बऱ्यावाईटाच्या कल्पनांच्या पलीकडे असते ही ब्रेख्टची भूमिका ऑडेन या कवीच्या Spain नावाच्या कवितेतही परावर्तित झालेली दिसते. ऑडेन त्या कवितेत असे म्हणतो की "जे खून अपरिहार्य असतात त्यांच्या बाबतीत निर्माण होणारी आत्म-अपराधीपणाची व पाप केल्याची भावना आपण बुद्धिपूर्वक स्वीकारली



अनुक्रमणिका

पाहिजे." मेर्लोपाँटी या फ्रेंच विद्वानाने तर स्टॅलिनप्रणीत "कन्सन्ट्रेशन कॅम्पसच्या" (स्टालिनी छल-शिबिरांच्या) अस्तित्वाचे विरोधविकासाच्या तर्कशास्त्र पद्धतीवर आधारित असलेले समर्थन स्वतःच्या '**मानवतावाद आणि दहशतवाद**' या पुस्तकातही दिले आहे. या सर्व लेखकांची व विद्वानांची क्रांती-बरोबर घडणाऱ्या मनुष्यहानीचे समर्थन करणारी प्रतिपादने व समर्थने म्हणजे दहशतवाद व हुकूमशाहीच्याही समर्थनाची गृहीतकृत्ये होती.

वरील लेखकांपैकी कित्येकांनी स्टॅलिनच्या कारकीर्दीवरही आपली मते दिलेली आहेत. ती मते वाचली की मनुष्य इतका मंदमती व मूर्ख कसा होऊ शकतो याचेच आश्चर्य वाटू लागते. कारण ही मते देणारे व स्टॅलिन राज-वटीवर भाष्ये करणारे लोक कोणी सोम्यागोम्या नव्हते. ह्यूलेट जॉन्सन, अॅना लुइझ स्ट्रॉंग किंवा वेब पतीपत्नी यांच्यासारख्या मूढ सहप्रवाश्यांनी केलेली भाष्ये व अनुकूल प्रतिपादने आपण समज शकतो. पण स्टॅलिनला उप-कारक ठरू शकतील अशी भाष्ये व प्रतिपादने करणारात कित्येक पहिल्यादर्जाचे बुद्धिमंत होते. कित्येक नामांकित साहित्यिक व शास्त्रज्ञही होते. बुद्धिमंतांनी स्टॅलिन राजवटीच्या केलेल्या काही प्रशंसा पुढीलप्रमाणे आहेत : उदा., रोमाँ-रोलाँ स्टॅलिनच्या राजवटीविषयी म्हणतात की, "स्टॅलिनची राजवट म्हणजे आत्म्याच्या गरजांची अबाधित हमीच आहे." रोमाँरोलाँ असे म्हणतात तर बर्नार्ड शॉ या दुसऱ्या विद्वान प्रतिभा संपन्न कलावंताला "स्टॅलिनच्या ठिकाणी सुसंस्कारित श्रोत्याचा साक्षात्कार होतो." हेन्रिख मान स्टॅलिनच्या वतीने अशी हमी देतात की "बुद्धिवादी ही आपली बिरुदावली टाकून देण्यापेक्षा मार्शल ही आपली बिरुदावली टाकून देण्याचे स्टॅलिन पत्करील." फ्य्स्टवांजेर असा दिलासा देतात, "स्टॅलिनला त्याचे जे देव्हारे माजविले जात आहेत ते बिलकूल नापसंत आहेत."

पुढे रशियामध्ये पक्षशुद्धीकरणाचे प्रकरण घडून आले. म्हणजे पक्षाला नापसंत असणाऱ्या सभासदांची कायमची विल्हेवाट लावण्याचा कार्यक्रम घडून आला. ह्या महान पक्षशुद्धीकरणाच्या समारंभात जे घडले ते पाहून मृतांच्या आत्म्याच्या शांतीसाठी लिहिलेल्या प्रार्थनागीतात आख्मातोव्हाने पुढील पंक्ती लिहून ठेविल्या आहेत :

> "ही स्त्री मरणासन्न आजारी आहे.
> ही स्त्री विलक्षण एकाकी आहे.
> तिचा पती मृत झाला आहे आणि
> मुलगा दूर..कैद्यांच्या कोठडीत
> भाका करुणा माझ्यासाठी; करा ईशाची त्या प्रार्थना.

मॉस्को—खटल्यात ज्यांना आरोपी बनविण्यात आले होते त्यांच्यासंबंधी आरगाँ पुढीलप्रमाणे भाष्य करतात : " हे लोक निरपराधी आहेत असा बचाव द्यायचा म्हणजे असत्य वारंवार आणि अधिकाधिक मोठ्या आवाजात गर्जून सांगितले की जगाला ते सत्य वाटू लागते हा हिटलरी सिद्धांत सर्वार्थांनी खरा मानण्यासारखे आहे." आरगाँची स्टॅलिनभलावण वाचून नादेझ्दा मान्देलस्थाम या मान्देलस्थाम कवीच्या पत्नी तर इतक्या गरम झाल्या की Hope against Hope नावाचे स्टॅलिनी राजवटीतील आपल्या आठवणींचे एक पुस्तकच त्यानी लिहून प्रसिद्ध केले. त्या पुस्तकात त्या म्हणतात की, " या जगातल्या आरगाँ महाशयांसारख्या महाशयांची असली पुस्तके जेव्हा मी पाहते आणि आम्ही जे जीवन आज कंठित आहोत त्या प्रकारचे जीवन आपल्या देश-बंधूंना कंठावयास प्रवृत्त करण्याचा त्यांचा बेत जेव्हा मी ओळखते, तेव्हा आमच्या देशात मला जे अनुभव आले त्या अनुभवांचे निवेदन करणे हे मला माझे आद्य कर्तव्य वाटू लागते." सार्त्रच्या बरोबर काम करणारे डेव्हिड रूझे यांना स्टॅलिनच्या गुलाम—शिबिरांची खरीखुरी माहिती उर्वरित जगाला द्यावी अशी इच्छा होती. पण सार्त्रने त्यांना मना केल्यामुळे त्यांना स्वतःचा तो बेत सोडून द्यावा लागला. ही मना करताना सार्त्रचा मुद्दा पुढीलप्रमाणे होता. सार्त्र म्हणतो की " स्टॅलिन हे कामगारांचे आशास्थान आहे. बिलाँकूरच्या कामगारांना या आशेपासून वंचित करता कामा नये."

× × × ×

लेखक आणि कलावंत क्रांतीच्या मोहात फसतात. क्रांतिकार्याला मदत करू जातात. क्रांतीनंतर आमचे स्वातंत्र्य विस्तारित होईल, अधिक मुक्तपणे आपला आत्मा प्रकट करता येईल ही त्यांची क्रांतीपासून अपेक्षा असते. नि आशाही. त्यांच्या या आशा—अपेक्षांचे काय होते.

रशियनक्रांतीमध्ये ज्यांनी कृतीशील भाग घेतला त्या रशियन लेखकांच्या आशाआकांक्षाचे काय झाले ? त्यांच्या आशा कितपत यशस्वी झाल्या ?

" आई " हा क्रांतीचे तत्त्वज्ञान सांगणारा मॅक्झिम गोर्कीचा अभिजात ग्रंथ. गोर्कीने त्यात भाकित केले होते की, " जगातील सर्वात परिपूर्ण अशी लोकशाही रशियामध्ये तयार होईल." रशियात क्रांती झाली. क्रांत्युत्तर राजवट आली. पण आता गोर्की स्वतःच्या भाकितासंबंधी तेवढा निःशंक राहिला नव्हता.



अनुक्रमणिका

क्रांतीनंतर रशियाबाहेर पळ काढणाऱ्या लेखकांची पुढील यादी पाहा. त्यात कोणाचे नाव नाही? सगळ्या स्तरातील नि व्यवसायातील व्यक्ती त्यात आहेत. बुनिन, बर्देव्, आंद्रिव, मेझ्रेकोव्हस्की, झीनैंदा हिपिअस, रेमिझॉव, बाल्मों, खोडासेविख हे सर्वजण त्यात आहेत. शिवाय अॅलेक्सी टॉलस्टॉय, स्वेताएव्हा, एहरेन्बुर्ग आणि प्रिन्स मिर्स्कि हेही त्यात आहेत. मागाहून हे थोडेजण रशियात परतले. आता मागे परतून सोव्हिएट वाङ्मयाचा आढावा जेव्हा आम्ही घेतो तेव्हा एकोणिसशे तिशीतील ( म्हणजे क्रांतीच्या नंतरच्या काही थोड्या वर्षांच्या काळातील—जेव्हा क्रांतिसरकार आपली पक्कड लेखकवर्गाच्या स्वातंत्र्यावर बसवू शकले नव्हते तेव्हाच्या काळा-तील ) सोव्हिएट वाङ्मयाचा तो काळ म्हणजे सुवर्णकाळ होता असे वाटू लागते. " समाजवादी वास्तववादाचे " जू अद्याप लेखकांच्या मानेवर बरोबर बसले नव्हते. लेखकांना मोकळेपणाने श्वासोच्छ्वास करता येण्याइतका अवसर NEW Economic Policy या संस्थेने अद्याप त्याना ठेविला होता. वाङ्मयीन प्रवृत्तींच्या मुक्त धडपडीला काही प्रमाणात अद्यापही मोक-ळीक होती. विर्नीचे कलाकार आणि लेखक राजकीय मातब्बरांबरोबरच्या आपल्या सहकार्याविषयीचे कित्येक भ्रम अद्याप टिकवून होते. पक्ष हळूहळू एकसत्ताधारी बनत होता. साहित्यही राजकारणाच्या वेठीस धरले जाण्याचा प्रश्न फक्त काही थोड्या अवधीचाच राहिला होता. या काळात झामिआतिन नावाच्या कादंबरीकाराने We नावाची कादंबरी प्रसिद्ध केली होती. स्टॅलिन पुढे कोठे झुकणार आणि त्याच्या आयुष्याची दिशा कोणती होणार याचीच जणू आगाऊ प्रतिकृती Benefactor नावाच्या त्या कादंबरीतील पात्राच्या निमित्ताने त्याने रेखाटली आहे. राजकारणाच्या वेठीस साहित्यिकांना पुढे कसे धरले जाईल व त्याचे साहित्यावर कोणते परिणाम होतील याचाही अंदाज त्याच कादंबरीत व्यक्त केलेला आहे. कारण एके ठिकाणी झापिआतिन लिहितो की, रशियन लेखकांवर पक्षाच्या दुराग्रही मतांचा जुलूम केला गेला नाही व त्या मतांचे चिलखत त्यांच्या अंगावर चढविले गेले नाही तरच " आमच्या लेखकांना काही भविष्य आहे. नाहीतर त्यांचे भविष्य म्हणजे त्यांचा भूतकाळ. त्या भूतकाळात त्यानी जे काही कर्तृत्व दाखविले तेवढेच. भविष्यात फक्त तेवढेच उरेल. " पुढे बरोबरच तसे घडले. मांदेलस्थाम या कवीने पुढे कोणते दिवस येणार हे फार पूर्वी जाणलेले असावे. १९७३ च्या एका कवितेत तो लिहितो की " माझे युग, माझे युग आहे एक पशू... "



अनुक्रमणिका



१९३० साली याकोवसन नावाच्या एका इसमाचा एक लेख प्रसिद्ध झाला होता. लेखाचा विषय होता क्रांतीनंतरचे लेखकांचे भवितव्य. नि शीर्षक होते एका पिढीने केलेली आपल्या पिढीच्या कवींची उधळण." लेखात एकूण पाच कवींच्या क्रांत्युत्तर जीवनाचा आढावा घेतलेला होता व शेवटी निष्कर्ष काढण्यात आला होता की या कवींची पिढी त्यांच्या सुखदु:खाविषयी बेपर्वा आणि उदासीन राहिल्यामुळे त्यातील काही फाशी तर काही आत्महत्येने नष्ट झाले. या पाचांपैकी चारांनी क्रांतीला पाठिंबा दिलेला होता व एकाने विरोध दर्शविला होता. चारांनी क्रांतीचा स्वीकार केला होता, एकाने नकार दिला होता. "पाचांपैकी ग्लुमिलोव्हच्या नशिबी फाशी, ब्लोकच्या नशिबी प्रदीर्घ यातना व छळ नि शेवट मृत्यू; ख्लेब्निकोव्हला भयंकर उपासमार, अडवणूक व शेवट मृत्यू आणि एसिनिन व मायकोव्हस्की यांना अगोदर ठरवून ठेवलेला मृत्यू आला होता." याकोवसनच्या मते जरी ह्या कवींच्या जीवनाची परवड ही त्यांच्या पिढीने केलेली त्यांच्या जीवनाची उधळण होती. तरी मागाहून जे काही घडले त्यावरून या "उधळणीत" त्यांच्या पिढीचा हात नव्हताच हे सिद्ध होत होते.

पाश्चात्य साहित्यिक सहप्रवाश्यातील गिद, माल्रो आदि तारकासमहाने जातीने उपस्थित राहून ज्या पहिल्या रशियन सोव्हिएट लेखक-संमेलनाला भूषविले होते, त्या संमेलनात सोव्हिएट रशियन साहित्यातल्या आशावादी प्रवृत्तींच्या सामर्थ्याविषयी झादनोव्ह यांनी वरीच घमेंड मारली होती. ते म्हणाले की, "आमचे साहित्य आशावाद आणि धैर्य यांनी पूर्णत: ओथंबलेले आहे." एव्हाना मध्यंतरी क्रांतिवादाच्या विरुद्ध बाजू घेतलेले मॅक्झिम गोर्की हे देखिल परतून क्रांतीवाल्यांच्या बाजूला झुकलेले असतात. मध्ये काही काळ क्रांति-वादाच्या महत्तेविषयी त्यांच्या मनात संशय निर्माण झालेला होता. आता तो दूर झालेला असतो. तेव्हा पुनर्मतपरिवर्तन झालेल्या सोव्हिएट साहित्याच्या या अधिकृत भीष्माचार्यांनीही "साम्यवादी वास्तववाद" हा मूलत: कसा कर्तव्य-तत्पर आहे हे जाहीर केले. कर्तव्य तत्पर म्हणजे विशिष्ट मताचा प्रचार करा-वयास बांधलेले साम्यवादाच्या तत्त्वज्ञानाशी बांधील.... डोस्टोव्हस्कोला त्यानी एक सामान्य पलायनवादी, कर्तव्यचुकार ठरवून टाकले "मानवी मनाचे व्यापार कसे चालतात याचे यत्किंचितही ज्ञान त्याला नव्हते." खरे साहित्य व सत्य श्रीमंती नायकात वसत नाही. ते लोकसाहित्यातील, त्या प्राचीन कालिक न सदा समीप वाटणाऱ्या श्रमिक नायकात—तो प्रोमिथ्यूस, भोळा इवान, पेतृस्का आणि अर्थातच लेनिन यांच्यामध्ये वसत असते. परिषदेत माल्रो हेही







बोललेले असतात. गुलाम-श्रमिकांच्या वेठबिगारीने बांधल्या गेलेल्या श्वेतसमुद्रा-वरील कालव्याची त्यानी प्रशंसा केलेली असते व " साम्यवादी वास्तववाद " ही एक मौलिक पद्धत आहे असे जाहीर करुन टाकलेले असते. मात्र भाषण कर-ताना त्यांना अभिप्रेत असणाऱ्या पुरुषश्रेष्ठ नमुन्याची ते भलावण करतात. ते म्हणाले की " एकेकाळी मनुष्यविषयक क्रूर, निष्ठुर व हृदयशून्य वाटणारा दृष्टिकोन घेऊन त्या दृष्टिकोनाला जसे नित्शेने आपल्या झरथुष्ट्र नामक नायकाच्या पातळीला चढविले, तशाच प्रकारे जी मूल्ये मनुष्यांना एकत्रित आणू शकतात व मनुष्याचे पौरुषयुक्त बंधुत्व या कल्पनेला काही अर्थ प्राप्त करुन देऊ शकतात व त्या मूल्यांना हास्यास्पद भावुतेच्या पलीकडील पातळी-वर सुप्रतिष्ठीत करण्यासाठी प्रयत्नशील बनले पाहिजे. मनुष्यवर्गाला संघटित करू शकणाऱ्या आणि धैर्ययुक्त नि विश्वबंधुत्वाच्या भावनेने त्यांना एकत्रित कार्य करावयास उद्युक्त करणाऱ्या कठोर मूल्यांची प्रतिष्ठापना आपण केली पाहिजे. वगैरे साम्यवादी वास्तववादाच्या निमित्ताने केले गेलेले माल्रो यांचे वाक्य ? हे वक्तव्य तसे पाहिल्यास त्या विशिष्ट प्रसंगाशी विशोभितच होते. वास्त-विक साम्यवादी जीवन आणि साम्यवादी वाङ्मय यात वास्तव वादाचा प्रभाव केव्हाच संपुष्टात आला होता. तिथे भेसूरपणाचा अतिवास्तववादाचा जमाना उजाडला होता. परिषदेनंतर दोन वर्षांच्या अवधीत गोर्की मरण पावले. सोव्हिएट राष्ट्राच्या सरकारी मताप्रमाणे डॉक्टरलोकांच्या सामूहिक प्रयत्नांचे ते कर्तृत्व होते. डॉक्टरलोकांना सोव्हिएट वाङ्मय आणि क्रांती यांचे भले पाहवत नव्हते. म्हणून त्यांनी गोर्कीच्या तब्येतीला सुरुंग लावला. आणखी एका वर्षाने गिदचा भ्रमनिरास झाला. १९३२ त ज्या गिदने लिहिले होते की साम्यवादाच्या बाजूने झालेले " आपले हृदयपरिवर्तन हे आध्यात्मिक परिवर्तनाच्या जातीचे परिवर्तन होते " आणि " सोव्हिएट युनियन मुक्तीचा मार्ग दाखवित आहे ", तोच गिद पुढे एका वर्षाने लिहितो की, " वस्तुस्थिती प्रत्यक्षात असते तशीच ती पाहिली पाहिजे. उगाच कल्पनेच्या चष्म्यातून स्वप्नात पाहावी तशी ती पाहू नये. " गिदचा निष्कर्ष असा की " सोव्हिएट युनियनने आमच्या सगळ्या प्रिय आकांक्षांचा चुराडा करुन टाकला आहे. " गिदने जेव्हा अगदी प्रारंभी साम्यवादाचा स्वीकार केला होता तेव्हा पुरनाम नावाच्या साम्यवादाच्या एका पुरस्कर्त्याने लिहिलेले असते की " साम्यवादाबरोबरच ज्या यौवनाचा शोध गिद आयुष्यभर घेत होता ते यौवनही त्याला मिळाले. " नंतर अर्थात साम्य-वादाच्या देवतेने गिदला धोका दिला व गिदने एके काळच्या त्या आपल्या परमेश्वराला टाकले. झाले ! गिदच्या मृत्यूनंतर १९५१ त साम्यवादाच्या



अनुक्रमणिका

'**मानवता**' नावाच्या पत्रात गिदवर मृत्युलेख लिहिण्याची पाळी आली असता लिहिले गेले की " एक मढे आज खरोखुरीचे खपले. " असो. पण या गोष्टी फार पुढच्या. या ठिकाणी आपण ज्यावर लक्ष केंद्रित अशी गोष्ट एकच. ती ही की प्रारंभिक उत्साहाच्या अपूर्व भरात ज्यानी साम्यवादाचा मनसोक्त स्वीकार केला होता ती सर्व मंडळी पुढे भ्रमनिरासित झाली. ती म्हणू लागलीत की सोव्हिएट युनियनने आमच्या स्वप्नांचा पार चुराडा केला. 'सोव्हिएट युनियनने आमच्या स्वप्नांची पुरती निराशा केली' हा कल्पनाबंध युरोपीय लेखकांच्या एका पिढीतल्या लिखाणाच्या कायम पण सुप्त असा ध्यासच बनला. या पिढीतल्या या सर्वांनी एकापाठोपाठ एक क्रांतीचे तत्व स्वीकारले होते व तसेच एकापाठोपाठ एक ते क्रांतीविषयी हताश बनले होते. अगदी फ्रेंच राज्य-क्रांतीच्या काळातल्या त्यांच्या वाडवडिलांप्रमाणे ! मात्र एवढे एक – लेखकांची एक सबंध पिढी क्रांतीचे तत्व उचलून धरते व नंतर तत्संबंधी हताश होते हे एक – साम्य सोडल्यास रशियन क्रांती व फ्रेंच क्रांती या दोहोत कसलेही साम्य नाही. पण आपली क्रांती ही फ्रेंच क्रांतीसारखीच आहे या साम्याचे फार मोठे भांडवल रशियातील क्रांतीत केले गेले. या साम्याने रशियन क्रांती चळवळीला स्फूर्ती आणि उत्साह पुरविला. विशेष म्हणजे हे साम्य जरी अगदीच वरवरचे होते तरी त्या साम्याने रशियन चळवळीचा आत्मा घडविला. दृष्टिकोन तयार केला नि कृतीही प्रभावित केली.

कवी आणि लेखकमंडळींच्या उधळण्याची क्रिया चालूच होती. फक्त पूर्वीपेक्षा अधिक तीव्र स्वरूपात कवी व लेखक यांच्या मार्गदर्शनासाठी व त्यांच्या साहित्याचे नियंत्रण करण्यासाठी क्रांतिकारी सरकारने मुळी दोन सरकारी संस्थाच नेमून दिल्या. एक प्रकारे लेखकांची ती ससेहोलपटच होती ! ही ससे-होलपट कशी होती याचे वर्णन करण्यासाठी सोव्हिएट रशियाचे एक नामांकित लेखक सोल्झेनित्सिन यांनी चौथ्या सोव्हिएट लेखकपरिषदेला उद्देशून एक पत्रकच काढले होते. पत्रकात ते म्हणतात :

" सार्वजनिक व्यासपीठ आणि वर्तमानपत्रे यांच्यातून अनेक लेखकांचा छळ, प्रतिषेध व अपमान आणि पाठपुरावा करण्यात येतो. या छळाचा व प्रतिषेधाचा प्रतिकार करण्याची संधी त्याना दिली जात नाही. हे हाल त्याना मुकाटपणे सहन करावे लागतात. याहीपेक्षा भयानक स्थिती म्हणजे त्यांच्यावर शारीरिक अत्याचारही करण्यात येतात. त्यांना मारपीटही केली जाते. त्यांची व्यक्तिगत गांजणूक होते. ते जेथे जातील तेथे त्यांचा पिच्छा पुरविण्यात येतो. ( बुल्गाकोव, अख्मातोवा, त्स्वेतेवा, पास्तरनाक, झोशेन्को, प्लॅटोनोव्ह,



अनुक्रमणिका

अलेक्झांडर ग्रीन, व्हासिली, ग्रासमन ही छळ करण्यात आलेल्यांपैकी काहींची नावे. ) काही लेखकांच्या बाबतीत तर या छळाचा शेवट त्यांची रवानगी हद्दपारीत अथवा छळछावणीत केली जाण्यात अथवा त्यांचा मृत्यू ओढवण्यात झाली आहे. लेखकांच्या संघटनेच्या नेतृत्वाने भेकडपणाने या लेखकांना स्वतःचे दुःख स्वतः सहन करण्यासाठी वाऱ्यावर सोडण्यापलीकडे काहीही अधिक केले नव्हते. ( उदा., पावेल वासिलिव, मांडेलशाम, अल्तेम वेझली, पिन्याक बॅबेल, ताबिद्झे, झाबोलोत्स्की आणि इतर ) ही यादी ' इत्यादींवरच ' संपविली पाहिजे. कारण विसाव्या पक्षअधिवेशनानंतर आम्हाला असे कळले की सुमारे ६०० पेक्षाही अधिक लेखकांना त्यांची तुरुंगातील व श्रमिक-शिबिरातील नियती भोगण्यासाठी लेखकांच्या आज्ञाधारक संघटनेने मुक्त केले होते. कदाचित ही यादी याहीपेक्षा अधिक मोठी असेल ! "

ही यादी कुंठीत झालेली नाही. आजसुद्धा तीत भर पडतेच आहे ! अर्थात स्टॅलिनच्या मृत्यूनंतर लेखक-कलाकारांना थोडी कमी निष्ठुर वागणूक दिली जाऊ लागली आहे. तरीही ब्रॉडस्की, डॅनिएल बुकोव्हस्की आणि "इतर" ही नावे स्टॅलिननंतरच त्या यादीत समाविष्ट झाली आहेत. सोल्झेनित्सिन यांचे खुद्द स्वतःचे उदाहरण तर जगविख्यातच आहे.

सोव्हिएट युनियनच्या क्रांतीत, क्रांती व साहित्य किंवा साहित्यिक यांची सुस्पष्ट अशी हातमिळवणी व भेट घडून आलेली असल्याने क्रांतीचे साहित्यावर ( म्हणजे ते साहित्य तयार करणाऱ्या लेखकावर ) कोठल्या प्रकारचे परिणाम घडून येतात अथवा घडू शकतात याचे प्रथमहाती ज्ञान मिळण्याची संधी या ठिकाणी उपलब्ध आहे. ही संधी जर आपण घेतली तर क्रांती व क्रांतीत भाग घेणाऱ्या लेखकांचे लेखनविषयक व नंतरचे भवितव्य याविषयीचे आपले ज्ञान विस्तृत होण्याची शक्यता आहे. रशियन क्रांतीत ज्यांनी भाग घेतला त्या सर्वांना त्या महान घटनेचे चक्षुर्वैसत्य साक्षीदार बनायचे होते, तेव्हा ज्या घटनेचे ते हाजीर साक्षीदार होते त्या घटनेविषयीचे त्यांचे मत कोणते आहे ?

या बाबतीत पास्तरनाक, सिन्यावस्की, सोल्झेनित्सिन आणि नाडेल्झा मांडेल्स्थाम ही मंडळी पूर्णपणे स्पष्टवक्ती आहेत. आज रशियामध्ये जे आत्मिक अशा प्रकारचे पुनरुज्जीवन घडत आहे त्याचे प्रतिनिधित्व हे लोक करतात. तरीही त्यांचा नैतिक दृष्टिकोन आणि त्यांचे ऐतिहासिक चिंतन ही दोन्हीही जे लोक आत्मिक धर्माच्या बाबतीत त्यांच्याशी सहमत नाहीत त्यांच्याही विचारांशी जुळणारी आहेत. कारण वाङ्मय आणि क्रांती यांच्या गाठीभेटीतून काय निष्पन्न होऊ शकते याविषयी दोघांच्याही मनात एकवाक्यता आहे.



अनुक्रमणिका

**पास्तरनाक** क्रांती या विषयासंबंधी आपल्या **डॉ. झिवागो** ह्या कादंबरीत जरी बऱ्याच प्रमाणात संदिग्ध आहेत तरी क्रांतीच्या परिणामांविषयी व प्रत्यक्ष प्रकट स्वरूपाविषयी अगदी निःसंदिग्ध आणि स्पष्ट आहेत. ते लिहितात :

" जीवनाची फेरघडण करायची ! जे लोक अशा प्रकारची जीवनाच्या फेरघडणीची गोष्ट करतात ते जीवनातील अनेक बऱ्यावाईट अनुभवातून गेले असतील; परंतु जीवनाविषयीचे कसलेही आकलन त्याना आलेले नाही. त्यांना जीवन काय हेच मुळी कळलेले नाही...त्यांच्या दृष्टीने जीवन हा एक मातीचा कच्चा गोळा असतो की जो त्यांच्याकडून संस्कारित केला जाणार आहे...परंतु जीवन ही कच्ची माती नव्हे किंवा तुम्ही हवे तसे वाकवावे असे एखादे कच्चे द्रव्यही नव्हे...जीवन म्हणजे एक अपूर्व तत्त्व. स्वतःच स्वतःला नित्य-नूतन करणारे तत्त्व. तुमच्या अथवा माझ्या दृढ व घन प्रमेयांच्या ते पलीकडचे आहे...

" मार्क्सवाद शास्त्र नव्हे. कारण त्याचा पाया शास्त्राच्या दृष्टीने असावा तितका पक्का नाही. शास्त्रे संतुलित असतात. कमालीची वस्तुनिष्ठ असतात. मार्क्सवादापेक्षा अधिक आत्मकेंद्रित व वस्तुस्थितीपासून दूर असणारी दुसरी चळवळ मला तरी कुठे आढळलेली नाही. या देशात आपण व्यवहारात कसे अगदी शहाणे आहोत हे दाखविण्याच्या चिंतेने प्रत्येकजण ग्रासलेला आहे आणि सत्तेवर असणारे तर काय, आपल्या अस्खल नीयतेचे कल्पित जनतेच्या गळी उतरविण्यासाठी ते इतके उत्सुक आहेत की त्यापुढे सत्याकडे लक्ष द्यावयासही त्यांना फुरसत उरलेली नाही. "

दुसऱ्या एका ठिकाणी पास्तरनाक वक्रोक्तीने लिहितात की " त्यांना आमच्याकडून फक्त एक बारकीशी गोष्ट हवी आहे—आम्ही ज्याच्यावर प्रेम करतो त्याचा तिरस्कार त्यांना आमच्याकडून हवा आहे आणि आम्ही ज्याचा तिरस्कार करतो त्याचे प्रेम त्यांना हवे आहे. बस्स, याच्यापेक्षा अधिक काहीही त्यांना नको आहे. पण हीच गोष्ट तर सर्वात कठीण आहे. "

" **साम्यवादी वास्तववाद** " नामक एक लेख सिन्यावस्की या लेखकाने लिहिला आहे. त्यात क्रांतीचे सत्ताधारी, जनतेला ज्याच्याविषयी प्रेम वाटते त्याचा द्वेष आणि ज्याचा द्वेष असतो त्याचे प्रेम कसे सक्तीने अपेक्षितात आणि ही अपेक्षा क्रांती-सत्ताधाऱ्यांच्या बाबतीत कशी एखाद्या मानसिक जुलुमासारखी असते याचे अधिक स्पष्टीकरण आलेले आहे. सिन्यावस्की यांच्या म्हणण्याप्रमाणे क्रांतीचा हा अभंग स्थायीभावच आहे. क्रांतीची कल्पनारम्य आदर्शवादी कार्य-प्रवृत्ती आणि सक्ती करण्याचे आंतरिक बंधन या दोन्ही गोष्टी परस्परावलंबित



अनुक्रमणिका

आहेत असे ते म्हणतात. क्रांतीच्या या कार्यप्रवृत्तीसाठी सिन्यावस्की क्रांतीचे " आंतरिक प्रयोजन " ( the purpose ) हा शब्द वापरतात. लोकांच्या मनावर जबरदस्ती केलीच पाहिजे हे जे आंतरिक बंधन क्रांतीच्या ' प्रयो-जनातून ' कार्य करते याचे उदाहरण म्हणून साम्यवादी वास्तववादाचा उल्लेख ते करतात. ते म्हणतात की साम्यवादी वास्तववाद हे अशी जबरदस्ती कर-ण्याचे सोव्हिएट रशियातले एक हत्यार आहे. क्रांतीचा हा कल्पनारम्य आदर्श-वादी चक्रनेम कसा असतो हे सांगताना सिन्यावस्की लिहितात की,

" तुरुंग या संस्थेचे उच्चाटण करावे म्हणून आम्ही नवे तुरुंग बांधून काढतो. भोवनालाच्या भिंती दूर कराव्यात म्हणून त्यांच्यापेक्षाही प्रचंड चिनी भींती आम्ही आमच्या भोवती उभारतो. श्रम आणि परिश्रम, विश्रांती आणि स्वच्छंदी आनंदागत वाटू लागावेत म्हणून आम्ही त्यांचे वेठविगारीत रूपांतर करतो. यापुढे रक्ताचा एक थेंबदेखिल गळता नये या इच्छेच्या पोटी मनु-ष्यांच्या कत्तलीवर कत्तली आम्ही सुरू ठेवतो. " १४ ऑगस्ट या आपल्या एकदम नवीन कादंबरीत सोल्झेनित्सिनने रशियातील क्रांतिवादी बुद्धिवाद्यांवर काही टीकात्मक विचार व्यक्त केले आहेत. या कादंबरीतील एक पिता समूह-वादी राज्यव्यवस्थेचा पुरस्कार करणाऱ्या आणि क्रांतिवादी वीरघोषणांचा वापर करणाऱ्या सोन्या नामक मुलीची खरडपट्टी काढताना म्हणतो की, क्रांतीचे आवाहन हे बेजबाबदारपणाचे लक्षण आहे. सोन्या ही बुद्धिवादी वर्गाची प्रतिनिधी. क्रांतीच्या घोषणा हा तिचा व तिच्याचसारख्या इतर बुद्धिवाद्यांचा ध्यास. गोर्कीच्या एका ग्रंथातील विचारांचा हवाला देऊन तिचा बाप तिला म्हणतो की क्रांतीमुळे देशाचा कुठल्याही प्रकारचा फायदा होणारा नाही. उलट राजकीय नेमस्तपणा व तंत्रवैज्ञानिकांनी केलेले मूलभूत संशोधनकार्य यांच्यामुळेच रशियाचा औद्योगिक मागासलेपणा कमी होणार आहे.

कादंबरीतल्या पित्याचे प्रत्यक्ष शब्द असे: " शहाणा व समंजस इसम क्रांतीच्या भानगडीत पडणार नाही किंवा क्रांतीचे समर्थनही करणार नाही. कारण क्रांती म्हणजे प्रदीर्घ आणि निर्बुद्ध असा विध्वंस आणि नाश. पहिली गोष्ट अशी की क्रांती, मग ती कोणती का क्रांती असेना, तिच्यामुळे देशाचे पुनरुज्जीवन घेऊन येत नसते. उलट बऱ्याच काळपर्यंत तिच्यापायी देशाची छकलेच होऊन राहतात. क्रांती जितकी अधिक रक्तमय आणि प्रदीर्घ, तितकी अधिक किंमत तिच्यापायी त्या देशाला द्यावी लागत असते. मात्र अधिक



अनुक्रमणिका

किंमत दिल्यामुळेच कदाचित अशी क्रांती त्या देशाला महानही वाटत असावी ! "

क्रांत्युत्तर काळात रशियातील सत्ताधाऱ्यानी अनेक अनन्वित ज़ुलमी कृत्ये तेथे केली. पण प्रदीर्घ काळपर्यंत हा अत्याचार व भयानक कृत्ये चालूनही त्याचा कुणी निषेध केला नाही किंवा त्याला चांगलासा विरोधही केला नाही. या घटनेचे स्पष्टीकरण देताना **नाझेज्दा मांदेल्स्थाम** आपल्या Hope against Hope या आठवणींच्या पुस्तकात लिहितात की,

रशियातील बुद्धिजीवी वर्ग दडपशाही व बलात्काराचा निषेध करीत नव्हता. पण त्याचे कारण दडपशाही व राज्यकर्त्यांकडून मिळणारी लाचलुचपत हे नव्हते; ( अर्थात या दोहोंचे प्रमाण फारच मोठे होते. ) तर ते भारावून गेले होते ते " क्रांती " या शब्दामुळे. या शब्दाने त्यांची बुद्धी खच्ची केली होती व त्यांचे विचार पांगळे बनविले होते. " क्रांती " या शब्दाची एवढी पक्कड त्यांच्या मनावर होती की तो शब्द ( व त्यावरोवर येणारे इतरही सर्व काही ) टाकून द्यावयास ते तयार नव्हते. " क्रांती " हा एक असा शब्द आहे की ज्याच्या प्रभावामुळे राष्ट्रेच्या राष्ट्रे कोलमडून पडली आहेत. या शब्दातच इतके अलौकिक सामर्थ्य आहे की लोकांना पकडून धरण्यासाठी फाशीची सजा व तुरुंगवास यांची गरज आमच्या राज्यकर्त्यांना अद्याप का भासावी हेच मला कळत नाही. "

' क्रांती ' या केवळ शब्दाचीही भूल मनुष्यजातीला पडते. या शब्दापुढे मनुष्याची सगळी बुद्धी अगदी लटकी पडते. हाच खरा गाभ्याचा मुद्दा आहे. सोव्हिएट कम्युनिष्ट युनियनच्या राजवटीच्या कायदेशीरपणाचा आधार ती राजवट क्रांतीच्या मार्गे प्रस्थापित झाली आहे ही लोकांची समजूत होय. क्रांतीने त्या राजवटीला एक हक्कदारपणा बहाल केला आहे. जे जे क्रांतीच्या मार्गे येते ते ते यथोचित व न्याय्य असते असा एक समज क्रांतीच्या मूलभूत तत्त्वज्ञानातच अंतर्भूत असल्याने क्रांतीच्या मार्गाने प्रस्थापित झालेली राजवट जनतेला नैसर्गिक व उचित वाटत आहे. क्रांतीचा मार्ग हा कम्युनिस्ट आदर्श राज्याकडे नेणारा मार्ग वाटत असल्याने या राजवटीच्या हक्कदारपणाचा मानसिक स्वीकार जनतेने केला आहे. या हक्कदारपणाची जनतेची भावना दुबळी बनली तर कम्युनिस्ट राजवटीचा जनतेच्या मनावरीक प्रभाव तत्काळ कमी होईल. लोकाना ही राजवट मग अपरिहार्य आणि न्याय्य वाटणार नाही. याच कारणाने या बाबतीत कम्युनिस्ट पक्ष कमालीचा हळवा राहत आला आहे व नेहमीच तसा राहणार आहे. क्रांतीच्या प्रक्रियेतून कम्युनिस्ट

स्वर्गाचा जन्म होणार आहे हा समज अर्थातच मार्क्सच्या इतिहासाच्या तत्त्वज्ञानाचा भाग आहे. इतिहासाची सांगता, क्रांतीच्या प्रयोजनाचा लाभ, श्रद्धेची परिपूर्ती हा इतिहासाचा नैसर्गिक कायदा असल्याचे मार्क्स सांगतो; नव्हे तसा तर्काचा हवाला देतो. त्यामुळे इतिहासामध्ये जे नैसर्गिक ते अत्युत्तम व यथोचित असावे हा समज युक्तच होता. वाङ्मयात वापरल्या जात असलेल्या साम्यवादी वास्तववादासकट इतर जी अनेक विचारप्रणालित्मक नियंत्रण तंत्रे सोव्हिएट रशियांत आहेत त्या नियंत्रण तंत्रांमध्येआधारभूत असणाऱ्या नयतेच्या समाजाचा आंतर–आधार हा मार्क्सप्रणीत इतिहासाचा समज आहे. या ऐतिहासिक कायद्याच्या समजाला धक्का पोचण्यासारखे काहीही सोव्हिएट राजवट सहन करू शकणार नाही. तसे करणे म्हणजे स्वतःच्या कायदेशीरपणाचा व न्यायतेचा आधारच गमाविणे. अनेक अंगांनी तेथील विचारांचे जे नियंत्रण-नियमन करण्यात येते त्याचे कारण हे आहे. कम्युनिस्ट राजवट न्याय्य व नैसर्गिक आहे या श्रद्धेला धक्का पोचणे म्हणजे सारेच ओमफस होण्यासारखे आहे. कम्युनिस्ट राजवट ही इतिहासाची व तर्काची आणि व्यवहाराची अपरिहार्य सांगता असल्याचा जनतेचा समज हा कम्युनिस्ट राजवटीला एक नैसर्गिक व ऐतिहासिक वैधपणा आणून देतो. वाङ्मयातून साम्यवादी वास्तववादाचा प्रचार व प्रसार हा याच हेतूचा भाग आहे. हा प्रचार हा विशिष्ट विचार प्रसृत करावयास हातभार लावतो. विचारप्रणालीचे नियमन–मार्गदर्शन करण्याचे इतरही अनेक मार्ग तेथे राबविलेले आहेत. या सगळ्या खटाटोपाचा हेतू मार्क्सप्रणीत " इतिहासाच्या कायद्याविषयीची " श्रद्धा कायम राहावी, तिला तडा जाऊ नये हा आहे. मार्क्सप्रणीत " इतिहासाच्या कायद्याच्या " सूत्राला तडा गेल्यास कम्युनिस्ट राजवट आता जी नैसर्गिक व ऐतिहासिक दृष्टचा वैध व अपरिहार्य वाटत असते त्या समजालाच धक्का पोचेल. असले कोठल्याही प्रकारचे प्रयत्न कम्युनिस्ट राजवट चालवू देणे शक्य नाही. किंवा मार्क्सप्रणीत " इतिहासाच्या कायद्याच्या " तत्त्वाला दिले गेलेले कसलेही आव्हान तेथे चालवून घेतले जाणार नसते. कारण ते आव्हान केवळ मार्क्सप्रणीत इतिहासाच्या कायद्याच्या सूत्राला नसेल. किंवा सोव्हिएट वाङ्मयातील ' साम्यवादी वास्तववादालाच ' फक्त नसते. तर त्याचाही आधार असणाऱ्या–नव्हे सर्वच कम्युनिस्ट राजवटीच्या न्याय्यतेचाच आधार असणाऱ्या क्रांतीच्या कल्पितालाच ते आव्हान असते. अंतिम अर्थाने क्रांतीच्या कल्पितात अध्याहृत असणाऱ्या आदर्श रामराज्य–अवतरणाच्याच धारणेला ते आव्हान असते. या प्रकारच्या आव्हानामुळे सोव्हिएट राजवट वैध व नैसर्गिक आहे या लोक-

समजालाही धुपणी लाविली जाते ती निराळीच. या केवळ एका आव्हाना-बरोबर कल्पनेचा एक मोठा उत्तुंग मनोरा कोसळण्याचा संभव आहे व त्या कोसळण्यामुळे सोव्हिएट राजवटीला धक्का पोचणार आहे. सोव्हिएट राज-वटीच्या वैधपणावरील श्रद्धेसाठी सोव्हिएट विचारप्रणालीत अध्याहृत असलेल्या इतिहासाच्या सांगतेच्या सूत्रावर खरी नसली तरी शाब्दिक तरी निष्ठा हवी असते, ती एवढ्यासाठीच ! ही निष्ठा नसेल तर सोव्हिएट राजवटीच्या ऐतिहासिक अपरिहार्यतेवर तरी निष्ठा कोण ठेवणार !

ख्रुश्चेवच्या " गुप्त भाषणानंतर " या परिस्थितीत थोडा बदल होत असल्याचे व सरकारी यंत्रणांनी आणि राज्यकर्त्यांनी नेमून दिलेल्या ठाम समजूतींपासून नि सिद्धांतांपासून बाजूला सरकू देण्याची प्रवृत्ती सोव्हिएट रशियात सुरू झालेली दिसू लागली आहे. उदा., आपण ज्या चार सोव्हिएट साहित्यिकांचा वर उल्लेख केला आहे त्या चार साहित्यिकांच्या साहित्यातच कम्युनिस्ट सिद्धांतप्रणालीच्या गाभ्यालाच आव्हान देण्याची प्रवृत्ती आढळून येताना दिसते. **पास्तरनाक** आणि **सोल्झेनित्सिन** यांनी तर विशेषतः मार्क्स-वादी इतिहास–सिद्धांतावरच सरळसरळ हल्ला चढविलेला दिसतो. आपल्या **झिवागो** नांवाच्या कादंबरीत मार्क्सच्या इतिहासविषयक सिद्धांताची संभावना " भूतकाळातील एक विनोदी आणि हास्यकारक वैचारिक अवशेष " अशा शब्दात पास्तरनाक करतात. आणि पुढे म्हणतात की, " या सिद्धांतांचा फारसा गंभीर विचार कोणीही करू नये. " ऑगस्ट १९१४ मधील नायकाच्या तोंडून सोल्झेनित्सिन असे बोलतात की, " इतिहासावर विचार आणि तर्कबुद्धी यांची सत्ता नसते, इतिहास हा अतार्किक आहे. "

× × ×

**साहित्य** आणि **क्रांती** ही जेव्हा एकत्रित येतात तेव्हा जी एक गोष्ट अटळपणे व विनाअपवाद आढळून येते ती अशी, –साहित्यिक आणि क्रांती यांचा संबंध आला की साहित्यिकांच्या धारणा आणि राजकीय पक्षाची साहित्य-नियंत्रणाची सवय किंवा साहित्य--लेखक आणि क्रांतिवादी शासक याच्यात न चुकता तंटा निर्माण होत असल्याचे आढळते. साहित्यिक आणि क्रांतिवादी राज्यकर्ते यांच्यात साहित्यिक अभिव्यक्तीचे मार्ग व रीत आणि साहित्यिक अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य याविषयी नेहमी वादावादी असते हे वारंवार दिसून आले असले, तरी यासंबंधीचे चीनचे उदाहरण मुद्दाम उल्लेख करावा इतके डोळ्यात भरणारे आहे. चीनच्या बाबतीत आधुनिक साहित्यवाद आणि



अनुक्रमणिका

क्रांतिवाद या दोन्हीही धारणा पाश्चात्य देशातून सर्वस्वी आयात केलेल्या आहेत. चीनमधला बुद्धिवादी वर्ग हा देखिल अनेक अर्थांनी पाश्चात्य वैचारिक परंपरेची निर्मिती आहे. एकोणिसशे अकरामध्ये मांचू घराण्याचे पतन झाले आणि चीनमधला बुद्धिजीवी वर्ग वरती आला. कारण मांचू घराण्याच्या इतिश्रीबरोबर पारंपरिक चिनी पंडितांच्याकरवी राज्यकारभार केला जायचा या परंपरागत तत्त्वाचीही इतिश्री झाली होती. क्रांती आणि आधुनिक साहित्य यातील इतके घट्ट नाते दुसऱ्या कुठेही आढळले नसेल आणि त्यांच्यामधील वादही इतका तीव्र दुसऱ्या कोठे नसेल.

चीनमध्ये पूर्वी साहित्याची निर्मिती फक्त अभिजात चिनी भाषेत होत असे. डॉ. हु शीह यांनी त्याऐवजी लोकभाषेला प्रोत्साहन दिले. साहित्यिक अभिव्यक्तीचे माध्यम लोकभाषा झाले आणि आधुनिक चिनी वाङ्मयालाही चालना मिळाली. डॉ. हु शीह कोलंबिया विद्यापीठात पदव्युत्तर विभागात विद्यार्थी म्हणून शिकत असता वाङ्मयाचे भाषिक माध्यम म्हणून चिनी लोकभाषेचा पुरस्कार करणारा एक लेख त्यांनी पेकिंग विद्यापीठाच्या **न्यू यूथ** नावाच्या साहित्यिक पत्रिकेत प्रसिद्ध केला होता. ही घटना १९१७ ची. चीनच्या सांस्कृतिक क्रांतीची (किंवा जिला चीनच्या साहित्यिक पुनरुथ्थानाची चळवळ म्हणतात त्या चळवळीची) सुरुवात म्हणजे डॉ. हु शीह यांचा हा लेख. लोकभाषेला साहित्यिक भाषेचे स्थान देण्याच्या या सूचनेला पेकिंग विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांनी मोठ्या उत्साहाने उचलून धरले होते. लवकरच हे विद्यापीठ **चार मे** चळवळीचे स्फूर्तिस्थान आणि उदयोन्मुख कम्युनिस्ट चळवळीचे रंगरूट भरतीकेंद्र बनले. या व अशाच प्रकारच्या हेतूंपायी व उद्देशांमुळे चिनी लोक त्यांच्या भूतकाळापासून अलग होत गेले. पहिल्याने मृतवत आणि अनिशिष्ट बनलेल्या साहित्यिक परंपरेपासून आपण आपली सुटका करून घेतली पाहिजे असे त्यांना वाटू लागले. विद्यार्थ्यांच्या व बुद्धिवाद्यांच्या मते ही परंपरा दुर्बोध, विद्वज्जड आणि केवळ साचेबंद संकेतात फिरणारी झाली होती. तेव्हा ही विद्वानांची पंडिती भाषा टाकून पूर्वी कधी काळी ज्या चिनी लोकभाषेत कादंबऱ्या लिहिल्या जात होत्या, ती जिवंत लोकभाषा पुनरुज्जीवित करावी आणि जीर्ण व वांझ बनलेल्या विद्वत्ताप्रचुर भाषेच्या जागी तिची स्थापना करावी असे त्यांच्या मनाने घेतले. त्यांचा दुसरा उद्देश समाजाचे पुनरुथ्थान घडवून आणावे हा होता. त्यांना असे वाटत होते की चिनी समाजाचा ऱ्हास होत असून तो समाज अस्तंगत होत आहे. तेव्हा मज्जी–सुधारणांच्या वेळी ज्याप्रमाणे त्या सुधारणांनी समाजाचे पुनरुथ्थान घडवून

आणले तसे नवीन सुधारणा करून दुसरे पुनरुत्थान आपण घडवून आणावे. मात्र या सुधारणा सहन होणार नाहीत म्हणून क्रांतीचा मार्ग स्वीकारून समाजाचे नूतनीकरण करावे. म्हणजे एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकातील ज्या परकीय सत्तांनी चीनला हिणविले त्यांना खंबीरपणे उत्तर देता येईल. चीनमधील या कालखंडाची व त्या कालखंडातील धारणांची तुलना युरोपमधील रिफर्मेशनच्या (धर्मसुधारणेच्या) कालखंडाशी व त्या कालखंडातील लोक-धारणांशी करता येईल. रिफर्मेशनच्या काळात रोमन कॅथलिकवादात पंथीय युद्धे सुरू होती (Vulgate wars). त्याच काळात शेतकरी बंडेही झाली होती. (मार्टिन ल्यूथर काळ.) अशाच प्रकारची काही विस्कळीत मनोवृत्ती विसाव्या शतकाच्या प्रारंभातल्या चिनी लोकमानसाची होती. या काळातल्या चिनी मनोधारणांची तुलना फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळच्या 'प्रजासत्ताकाच्या रक्षणासाठी हत्यारे घ्या' या प्रकारच्या घोषणांच्या वेळच्या फ्रेंच लोक-धारणांशीही करता येईल. किंवा रशियन क्रांतीच्या वेळच्या लोकधारणांशीही करता येईल. रशियन क्रांतीच्या आधी तेथील समूहवादी बुद्धिवाद्यांना त्यांच्या राजकीय व सांस्कृतिक आशाआकांक्षा आणि तेथील मागासलेल्या आर्थिक व सामाजिक वातावरणाचे दडपण यांच्यामुळे जो काही विषाद वाटत होता तसाच विषाद चीनमधील तत्कालीन बुद्धिवाद्यांना व विद्यार्थ्यांना वाटत होता. विषादाच्या या प्रेरणांना मार्क्सवादाने आपणाकडे आकर्षित करून घेतले होते. अर्थात युरोपीय विचारांच्या प्रभावाखालील चिनी साहित्यिक अग्रदूत व लेनिन-वादी राजकीय चळवळ यांच्या वरवरच्या युतीपेक्षा या प्रकरणात काहीतरी अधिक गंभीर होते हे उघडच आहे. क्रांती आणि साहित्य यांचा संबंध अत्यंत घनिष्ट असून दोघेही एकमेकास पूरक आहेत याप्रकारचे जे गैरसमज इतर क्रांतिवादी देशात नेहमी असतात तशाच प्रकारचे गैरसमज या चीनमध्येही होते आणि साहित्य व क्रांती यांच्या घनिष्ट संबंधांच्या चिनी धारणेमागील भ्रामक समजुती इतर देशातल्या भ्रामक समजुतींपेक्षा काही कमी गंभीर नव्हत्या. इतर देशातील बुद्धिवादी व साहित्यिक वर्गाला ज्याप्रमाणे क्रांती सर्जनावरील प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष निर्बंध व नियमन कमी करून सर्जनाच्या स्वातंत्र्याचा विस्तार करते असे जसे वाटत असते तसेच येथीलही साहित्यिकांना वाटत होते. त्यांचीही अपेक्षा होती की क्रांती म्हणजेच स्वातंत्र्याचा विस्तार, क्रांती म्हणजेच सुखाची प्रस्थापना.

अर्थात विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकातील नव-चिनी लेखकांच्या बौद्धिक व राजकीय मतप्रणालीसंबंधीच्या भूमिकेत तशी एकवाक्यता नव्हती.



अनुक्रमणिका

अनेक प्रकारचे राजकीय विचार तेथे अस्तित्वात होते. मात्र राजकीय विचार-सरणीत भेद असले तरी सर्वांनाच आधुनिकीकरणाचें महत्त्व वाटत होते. सर्वांच्याच मताने देशाचे आधुनिकिकरण हेच एक प्रगतीचे साधन होते. मात्र त्यांच्यापैकी काही उदारमतवादाकडे झुकत होते, तर काही साम्यवादाकडे; तर काही अराजकवादाकडे—सर्वच मते आणि विचारप्रणाली हा आयात माल होता. चौथ्या दशकात चिनी बुद्धिजीवी अधिक कडवा आणि क्रांतिप्रेरित बनला व त्याने कम्युनिस्ट–पुरस्कृत लेखक–संघटनेचे सभासदत्व स्वीकारले. डाव्या विचारसरणीच्या या लेखक–संघटनेची संस्थापना लू सून ह्या ख्यातनाम चिनी नवसाहित्यकाराच्या हस्तें १९३० च्या मार्च महिन्यात झालेली होती. जपानशी युद्ध सुरू होताच त्यांच्यापैकी अनेक येनानला चालू पडले. येनान हे त्या काळच्या अतिप्रगत विचारांचे माहेरघर. असो. पण चिनी कम्युनिस्ट पक्ष आणि क्रांतिवादी लेखक यांच्यातील तंट्याला यापूर्वीच प्रारंभ झालेला होता. च्यू चिऊ-पे व आ चौ यांग हे दोघे लेखक–संघाचे पक्ष–निरीक्षक. लेखक आणि हे दोघे पक्ष–निरिक्षक या दोघांचे सतत संघर्ष होत. विशेषतः लू सून, फेंग सुए–फेंग, हू–फेंग, हू चिऊ-युआॅन आणि सूवेन या लेखकांचें आणि पक्ष–निरीक्षकांचे तर मुळीच पटत नसे. लू सून १९३६ त मरण पावला. रशिया-तील मॅक्सिम गोर्कीला ज्याप्रमाणे त्याच्या मृत्यूनंतर कम्युनिस्ट साहित्याचा रक्षक संत म्हणून देवत्व बहाल करण्यात आलें तशाच प्रकारे लू सूनच्या मृत्यू-नतर लू सूनलाही चीनमध्ये देवत्व देण्यात आले.

येनानमध्ये कित्येक लेखकांनी पक्षावर टीकात्मक लेखन केले. जेव्हा हा प्रकार सुरू झाला तेव्हा या दुर्वर्तनाची सार्वजनिक चर्चा करण्यासाठी १९४२ च्या मेमध्ये वाङ्मय आणि कला या विषयांवर एक परिषदच आयोजित केली गेली. रशियातील पहिल्या लेखक–संघटनेने तेथील लेखकांच्या बाबतीत जी भूमिका केली तीच भूमिका आता हीही संघटना चिनी लेखकांच्या बाबतीत करीत होती. म्हणजे त्यांच्या हालचालींचे (अर्थात अभिव्यक्तीक) नियमन–मार्गदर्शन ती करीत होती. कम्युनिस्ट पक्षाच्या हाती देशाची राजकीय सूत्रे येण्यापूर्वीच कम्युनिस्ट पक्ष लेखकांच्या हालचालींचे नियंत्रण चीनमध्ये करू लागला होता. लेखकांची मनधरणी करून त्यांना आपल्या पक्षाच्या व धोर-णाच्या बाजूला वळविण्याची गरज आता राहिलेली नाही याची कल्पना माओला आली होती. (हे लेखक मुख्यतः शांघाय येथे एकवटले होते.) लेखकांनी कसे वागायचे, म्हणजे कोणत्या प्रकारचे वाङ्मय प्रसवायचे याचे नियम माओत्से तुंगने स्वतःच घालून दिले होते. परिषदेपुढे जी दोन भाषणे

त्याने केली त्यात त्याने लेखकांना धारेवरच धरलें आणि त्यांना वजावले की " लेखक हे कामगार आणि जनता यांच्यासाठी रावणारे भारवाहू वैल आहेत. " " क्रांतीचे साहित्य व कला उद्दिष्टाची नेमकी वाट चालताहेत किंवा नाही हे पाहणे हा आमचा कटाक्ष आहे, " असेही त्याने पुढे वजाविले. माओच्या मताप्रमाणे " सर्वांगीण क्रांतिकारी यंत्रणेचे एक पूरक यंत्र म्हणून काम करणे हे साहित्य व कला यांचे उद्दिष्ट होते. " भाषणात पुढे त्याने सांगितले की:

" तुम्ही म्हणाल की मार्क्स–लेनिनवादामुळे लेखक–कलावंतातील सर्जनशील प्रवृत्ती मरून जाणार नाहीत काय ? मी म्हणतो की, होय. या प्रवृत्ती मरून जातील. जनता आणि श्रमजीवी यांच्या जीविताकांक्षांशी व जीवन–तत्त्वज्ञानाची सुसंगत नसतील अशी कोठलीही सर्जक अभिव्यक्ती मार्क्स-लेनिनवादामुळे मरून जाईल......वुद्धिवाद्यांनी जनतेच्या आशाआकांक्षाशी व ध्येय-धोरणांशी एकजीव वनावे व जनतेची सेवा करावी. या क्रियेतून काही दुःख आणि संघर्ष निश्चितच निर्माण होणार आहेत. "

माओने म्हटले तसे संघर्षही निर्माण झाले आणि दुःखेही ! दुराग्रही व हट्टी (पक्ष दृष्टिकोनातून) लेखक–साहित्यिकांना वठणीवर आणण्यासाठी आणि पक्षकार्यासाठी त्याना पुन्हा वळविण्यासाठी किंवा त्यांच्या व्यक्तिमत्वाची, विचाराची इत्यादि नवी घडण घडविण्यासाठी पक्षाने वरचेवर " सांस्कृतिक मोहिमा " सुरू केल्या. यापैकी अगदी पहिली मोहिम येनानच्या चर्चापरिषदेनंतर अगदी लगेच घेण्यात आली व तिचा रोख वांग-शी-वै ह्या लेखकाविरुद्ध होता. हा The wild Lily या लोकप्रिय पुस्तकाचा कर्ता. वांग-शी-वैचा दोष असा की पक्ष-संघटकांच्या ' हम करेसो कायदा ' वृत्तीवर व वर्तनावर त्यानें परखड टीका केली होती. नव्हे आपल्या लिखाणातून त्यांना धारेवर धरण्याचे औद्धत्य दाखविले होते. येनान परिषदेनंतर वांग-शी-वै-जो कुठे अदृश्य झाला तो परत काही कधी कुणाच्या दृष्टीस पडला नाही. त्याचे काय झाले कुणास ठाऊक ? लू सून याचा शिष्य सिआ च्यूं हा दुसराही एक लेखक १८४८ त तसाच एकाएकी गायब झाला. येनान परिषदेत वांग-शी-वैचे वैचारिक समर्थन करण्याचा प्रयत्न त्याने केला होता.

१९४९ मध्ये लोकांच्या चिनी प्रजासत्ताकाची स्थापना झाली आणि लगेच लेखक-लोकांची परिस्थिती फार गंभीर वनली. राज्यकर्त्यांच्या " साम्यवादी वास्तववादाच्या " चिनी तर्जुम्याशी सहमत न झाल्यामुळे कित्येक लेखक संकटात सापडले. तर काही लेखकांनी राज्यकर्त्यांच्या प्रचारमोहिमात प्रचारकाची भूमिका करावयास नकार दिल्यानें तेही संकटात सापडले. एकूण



अनुक्रमणिका

लोकांचे चिनी प्रजासत्ताक लेखकांच्या बुद्धिस्वातंत्र्याच्या मूळावरच आले. त्यां-आधीच, म्हणजे लाल सेनेने मांचुरिया कवजात घेतला तेव्हा मांचुरियाचा थोर लेखक सिओ चुन पक्षाच्या पक्षशुद्धीकरण चळवळीचा बळी बनला होता. (सिओ चून याने गनिमी सैनिकांबरोबर मांचुरियामध्ये काम केलेले होते.) १९४२ त सिओ चूनचा काटा काढला गेला. लू सूनचा मित्र फेंग सुह-फेंग —यानेही लाल सेनेच्या दीर्घ यात्रेत भाग घेतलेला असतो—१९५४ व १९५७ मध्ये साम्यवादी टीकेचे लक्ष्य बनला. अनेकवार त्याच्यावर टीका केली गेली. फेंग-सुह-फेंगचा मित्र हू-फेंग. डाव्या लेखक-संघटनेचा तो सभासद. तरीही १९५५ च्या सगळ्या वर्षभर त्याच्यावर देशव्यापी टीका करण्यात येत होती. नव्हे त्याच्याविरुद्ध ती देशव्यापी मोहीमच उघडण्यात आली होती. १९५७ मध्ये प्रसिद्ध लेखिका थिंग लिंग (स्टॅलिन पारितोपिकविजेती) विरुद्ध केली गेलेली प्रचारमोहीमही काही कमी दुष्ट व क्रूर नव्हती. शिक्षा म्हणून तिला पक्ष-अधि-काऱ्याचे ऑफिस झाडावे लागे. ते उजव्या-विचारसरणीच्या लेखकांच्या विरुद्धचे वर्ष होते. महाकवी ऐ चिंगला निकालात काढले गेले याच वर्षी. याच काळात इतरही अनेक फारशा प्रसिद्ध नसलेल्या लेखकांना संपविण्यात आले. "शतशत फुले उमलू द्या" या मध्यंतरीच्या माओ-उदारमतवादाच्या अल्पकालखंडात गफलतीने आपल्या मनीचे खरे बोल उघडपणे बोलून दाखविण्याचा बौद्धिक असमंजसपणा त्या बिचाऱ्यांनी केला होता.

नंतरच्याही काळात पक्ष आणि लेखकलोक यांच्यात या ना त्या कार-णांनी कुरबुरी सुरूच होत्या. उदा., १९५९–६० तला हो चि फँग या भावकवी-बरोबरचा पक्षाचा झगडा. मात्र पक्ष हळूहळू इतका शक्तिमान बनू लागला होता की विरोधी प्रवृत्तींना प्रकट होता येणे दिवसेंदिवस फारच कठीण जात होते. शेवटी तर सांस्कृतिक क्रांतीच्या निमित्ताने विरोधी आवाज आणि विरोधी प्रवृत्ती पारच चिरडून टाकण्यात आल्या. मात्र सांस्कृतिक क्रांतीच्या संबंधात एक गोष्ट पक्की ध्यानात ठेवावयास हवी. ही चळवळ केवळ माओविरोध कांचा आवाज बंद पाडण्याकरिताच नव्हती, तर प्राचीन चिनी परंपरा व रूढी आणि ऐतिहासिक परंपरा यांचाही आवाज बंद करण्यासाठी ती होती. माओपक्षाचे विरो-धक आणि प्राचीन सामाजिक-सांस्कृतिक-ऐतिहासिक परंपरा या सर्वांचा बंदोबस्त त्या चळवळीत केला गेला. या चळवळीच्या निमित्ताने माओच्या रेड गार्डसनी बुद्धिवादी नागरिक आणि प्राचीन कला व परंपरांचे रक्षण-देखभाल करणाऱ्या संस्था नि वस्तुसंग्रहालये यांच्यावरही हल्ले करावयास कमी केले नाही. आणि

रेडगार्डस्चे कन्फ्यूशियन परंपरेविरुद्धचे हल्ले तर सांस्कृतिक क्रांती संपली तरीही चालूच राहिले.

१९१७ सालानंतर चिनी साहित्याचे पुनरुज्जीवन झाले होते. चिनी नव-बुद्धिवाद्यांनी उत्साहाने क्रांतीच्या देवकार्याला उचलून धरले होते. पण आता चिनी रेड गार्डच्या अतिरेकी व आचरट चाळचांनी चिनी नव-बुद्धिवाद्यांचे निर्मूलन घडून आले होते. मात्र या निर्मूलनाला रेडगार्ड एवढे एकच कारण नव्हते पक्ष-राजकारणाने एक " संपूर्ण वर्गच्या वर्ग " म्हणूनच त्यांना वहिष्कृत ठरविले होते. या ठिकाणी माओ आणि स्टॅलिन यांच्या त्यांना नको असलेल्या लोकांचे उच्चाटण करण्याच्या मार्गांची तुलना करता येण्यासारखी आहे. स्टॅलिनला रशियातील कुलाक्स ही जमात त्याच्या राजकारणात खुपत होती. त्याने एका फटक्यात त्या जमातीचे शिरकाण करून टाकले. माओचे मार्ग इतके गावठी नि रानवट नव्हते. माओचे मार्ग अतिशय नाजूक आणि सफाईदार. माओने या " बुद्धिवादी वर्गाविरुद्ध " एकापाठोपाठ एक अनेक मोहिमा उघडल्या. त्यांना सामान्य लोकांच्या नजरेत वदनाम ठरविले. माओप्रणीत येनान–आदेश व आदर्श समजावून देण्यासाठी ज्या या सतत मोहिमा निघत गेल्या व " जनतेच्या कर्णधारांची आणि जनतेची " सेवा कशी करावी याचे जे वारंवार धडे आयोजित केले गेले त्या छळाने व त्रासाने थकूनच हा वर्ग क्रांतीच्या चळवळीतून वाद झाला. आणि मोठचा नामी प्रकारे असमाधानी बुद्धिमंतांना चळवळीतून काढून टाकण्याचा माओचा हेतू साध्य झाला.

आता कित्येक चिनी लेखकांच्या साहित्यिक ग्रंथांसंबंधी. या चिनी साहित्यिकांपैकी कित्येकांचे ग्रंथ चीन कम्युनिस्ट बनण्यापूर्वीच्या चीनमध्ये बाहेर पडलेले होते. आता ते ग्रंथ पुनर्लिखित करावे असा आदेश दिला गेला नि चिनी सांस्कृतिक क्रांतीच्यापूर्वी त्यांच्याकडून ते करून घेतले गेले. रशियातील शोलोखॉव, ग्लॅडकॉव्ह आणि फाडेयेव्ह इत्यादि लेखकांप्रमाणे चिनी कम्युनिस्ट दृष्टिकोनातून आपल्या ग्रंथांचे पुनर्लेखन करण्याच्या आज्ञा त्यांनी मानल्या होत्या. या बावतीत त्यांनी ब्रही विरुद्ध काढला नाही. **पे चो** या लेखकाचे उदाहरण येथे देता येईल. हा प्रसिद्ध व लोकप्रिय असा चिनी अराजकवादी लेखक. (अराजकवादाच्या तत्त्वज्ञानाचे त्याला इतके वेड की वाकुनिन आणि क्रोपोटकिन या दोन प्रसिद्ध रशियन अराजकवाद्यांच्या नांवावरून आपले नांव त्याने तयार केले होते.) तर असा हा कोठलीही शिस्त व ठाम व्यवस्था न मानणारा प्रसिद्ध लेखक. पण माओ विजयी होताच त्याने आपली सगळी अराजकवादी मते मुकाट टाकून दिली आणि साम्यवाद पत्करला. एवढेच नव्हे तर त्याच्या



अनुक्रमणिका

ग्रंथामध्ये अराजकवादाची बाजू घेणारे असंख्य (आणि उत्साहपूर्ण) उल्लेख होते तेही त्याने आपण होऊन काढून टाकले.

सांस्कृतिक क्रांतीच्या काळात चीनमधील साहित्यनिर्मिती पूर्णतः बंदच पडली होती. माओच्या प्रतिभेचे गुणगौरव गाणाऱ्या आणि माओच्या शत्रूंना तुच्छ ठरविणाऱ्या माओ-भक्तिरसपूर्ण सामान्य दर्जाच्या लेखनकामाशिवाय दुसरे अधिक चांगले त्या काळात काही प्रकाशितच होऊ शकले नाही. आधुनिक चीनच्या साहित्यिक व क्रांतिवादी चळवळींचा पाळणा असे जे पेकिंग विद्यापीठ त्याला तर टाळेच लागले होते. घटना अनेक दृष्टींनी बोलकी नि प्रतीकात्मक आहे. साहित्य आणि क्रांती यांच्यातला संबंध काय असू शकतो याचे दुसरे इतके बोलके व समर्पक उदाहरण देता येण्यासारखे नाही. ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात एका चिनी सम्राटाच्या आज्ञेवरून चिनी ग्रंथांची एक होळी चीनमध्ये फार पूर्वी झालेली होती. पण ती क्रांतीच्या नावे नव्हे, तर एका दरबारी सल्लागाराच्या सल्ल्यावरून. सल्लागाराची शिफारस होती, " ज्या जनतेला ज्ञानार्जन करण्याची इच्छा असेल तिने ते ग्रंथांपासून न करता सरकारी अधिकाऱ्यांच्या आचार-विचारांवरून करावे. " आता क्रांतीच्या नावे ज्ञानबंदी जारी केली गेली.

सांस्कृतिक क्रांतीच्या पश्चात ग्रंथप्रसिद्धी सुरू झाली. पण त्या ग्रंथांचा हेतू बहुजनसमाजामधून जो शेतकरी–कामकरी नेतृत्ववर्ग तयार होत होता त्या वर्गाला मार्गदर्शन लाभावे हा होता. म्हणून ही पुस्तके प्रचारात्मक आणि विशिष्ट हेतुपुरस्सर तयार होत होती. स्टॅलिनच्या रशियातही रशियन क्रांतिवाद्यांच्या गटासाठी अशाच प्रकारचे साहित्य तयार केले गेले होते. (या वेळी नव–नेतृत्ववर्गाच्या तयारीसाठी पेकिंग विद्यापीठही पुन्हा उघडण्यात आले.) चीनमधील बुद्धिवाद्यांच्या नाशामुळे चिनी बुद्धिजीवी वर्गाची केवळ साहित्यिक अभिरुचीच फक्त क्रांतीच्या प्रक्रियेत नष्ट करण्यात आली नव्हती; तर चिर–क्रांतीची जी योजना माओने आखली, त्या योजनेमध्ये समाजाच्या नेतृत्वाची अशी जी एक सामाजिक भूमिका सर्व ठिकाणचा लेखकवर्ग करीत असतो, त्या भूमिकेचीही आहुती दिली गेली होती. लेखकांचे हे नवशिक्षणच करण्यात आले होते आणि त्या नवशिक्षणात त्यांना " लाल आणि क्रांतितत्त्व-विद्याविभूषित " बनण्यास भाग पाडण्यात आले होते. त्यामुळे त्यांचे सामाजिक महत्त्व घसरलेच होते. आता सांस्कृतिक क्रांतीच्या पर्वात त्यांचे सामाजिक महत्त्व आणखीनच घटले. चिनी क्रांती घडून येण्याच्या आधी चिनी साहित्यिक बुद्धिवादी वर्ग संख्येने लहान होता तरी महत्त्वाने चांगला मजबूत

होता. सांस्कृतिक क्रांतीनंतर हा गट नष्टच झाला. एवढेच नव्हे तर यापुढे या गटाकडून काही महत्त्वाची कामगिरी घडू शकेल असेही वाटत नाही. चीनमध्ये नवी सांस्कृतिक योजना आखण्यात आली आहे. त्यात सांस्कृतिक क्रांतीमध्ये लेखकांवर व ग्रंथांवर घातलेले निर्बंध सैल करण्याचे धोरण स्वीकारले आहे. नव्हे त्या धोरणास अनुसरून सांस्कृतिक क्रांतीत प्रक्षिप्त ठरविल्या गेलेल्या इकडच्या तिकडच्या काही पुस्तकांवरील बंदी उठविलीही होती. (उदा., माँटेस्क्यूचे The Spirit of the Laws; रूसोचे Social Contract व थ्युसिडिडीझचे History of the Peloponnesion War ) मात्र पुस्तकांवरील निर्बंध उठविण्यामागे कोठल्याही प्रकारचे निश्चित असे तत्त्व या योजनेत स्वीकारलेले नाही. मनास येईल ते पुस्तक मुक्त केले जाते. तेव्हा पुस्तक-प्रकाशनावरील व लेखनावरील निर्बंध उठविण्यात हे जे धरसोडीचे व मन चाहे सो धोरण स्वीकारलेले आहे त्यामुळे लेखकवर्गाची व साहित्य संस्थेची गेलेली प्रतिष्ठा पुन्हा प्राप्त होईलसे वाटत नाही. किंवा साहित्यिकांचा नष्ट झालेला वर्ग नव्याने प्रस्थापित होईलसेही वाटत नाही. युद्धपूर्व काळात चिनी संस्कृतीवर पाश्चात्य संस्कृतीचा फार मोठा प्रभाव होता. क्रांतीनंतर तो पूर्णपणे नष्ट केला गेला. परराष्ट्रधोरणात फरक केल्याने हा प्रभाव वाढेल असे म्हणता येत नाही. प्रक्षिप्त ठरविलेले चिनी अभिजात ग्रंथ मुक्त केले गेल्यामुळे सांस्कृतिक परंपरेत थोडीबहुत परंतु वरवरची अखंडता निर्माण होऊ शकेल, नाही असे नाही. पण त्याच्यातून अधिक काही निष्पन्न होईल असे वाटत नाही. जुन्या चीनच्या वैभवाचा प्राचीन चिनी विद्यामंडित सरकारी अधिकारी वर्ग आणि पाश्चात्य विद्याविभूषित नव बुद्धिजीवी वर्ग, हे दोन्ही वर्ग जे एकदा नाहीसे झाले आहेत ते कदापिही पुन्हा निर्माण होणे नाही.

× × × ×

साहित्य आणि क्रांती यांच्यातल्या संघर्षाचे कमी अतिरेकी उदाहरण म्हणून फिडेल् कॅस्ट्रोच्या क्यूबाचा निर्देश करता येईल. मात्र क्यूबा–क्रांतीतील साहित्य व क्रांती यांच्या संघर्षाचे आंतरराष्ट्रीय पैलू अभ्यासण्यासारखे आहेत. विजयी क्रांतिवादी आणि क्रांतीच्या तत्त्वज्ञानाची भुरळ पडल्याने क्रांतीला ज्यांनी उचलून धरलेले असते ते साहित्यिक, यांच्यातील क्रांतीनंतर आढळणाऱ्या संबंधांचेच हेही एक उदाहरण आहे. क्रांती घडून आलेल्या व जेथे क्रांतिसरकारे प्रस्थापित झाली होती अशा देशात ज्याप्रमाणे क्रांतीनंतर लेखक–साहित्यिकांवर अनेकविध बंधने लादली गेली होती तशाच प्रकारे येथेही घडले होते.



अनुक्रमणिका



अर्थात इतर देश आणि क्यूबा येथील लेखक व सरकार यांचे संबंध यात काही वरवरचे फरक निश्चित आहेत. पण अंतिम परिणामांच्या दृष्टीने त्या फरकांना काहीही महत्त्व नाही.

कॅस्ट्रो सत्तेवर आला तेव्हा बॅटिस्टा राजवटीला कंटाळलेल्या मध्यमवर्गीय बुद्धिवाद्यांचा पाठिंबा त्याला मिळाला. वास्तविक कॅस्ट्रोची तत्त्वप्रणाली व राजकीय प्रचार यात बौद्धिक आशय फारसा नव्हताही. कॅस्ट्रो स्वतः बुद्धिवादी नव्हताच ! तो स्वतःच तसे म्हणत असे. तो म्हणे की आपला विश्वास कृतीवर आहे. "आपण क्रांतिवादी कृतीशूर आहोत." २६ जुलैची चळवळ आटोपल्यानंतर चळवळीतील आपल्या फाजील उदारमतवादी आणि कमी क्रांतिवादी पाठिराख्यांपासून त्याने स्वतःची फारकतही करून घेतली होते. म्हणजे प्रत्यक्ष चळवळीपासून त्यांना तोडून त्याने बाजूला केले होते. मात्र कॅस्ट्रो स्वतःला जहाल क्रांतिवादी म्हणवीत होता तरी तो कम्युनिस्ट नव्हता. अनेक कारणांपायी क्यूबातला कम्युनिस्ट प्रभाव क्षुल्लकच राहिला होता. "मी लेनिन–मार्क्सवादी आहे" ही सार्वजनिक घोषणा जेव्हा कॅस्ट्रोने क्यूबात केली, तेव्हा त्याच क्षणी त्याने हेही जाहीर करून टाकलेले होते की, "दास कॅपिटलच्या" पहिल्या २७० पानांपलीकडे आपलें वाचन गेलेलें नाही. इतर क्रांतिकारी चळवळींच्या मागे जशी तात्त्विक व मतप्रणालींच्या स्वरूपाची खंबीर बैठक असते तशा प्रकारची वैचारिक बैठक क्यूबाच्या क्रांतिकारी चळवळीच्या मागे कधीही नव्हती. इतर देशातल्या क्रांतिकारी चळवळींनी देशातील राजकीय सत्ता जेव्हा हस्तगत केली तेव्हा आपण काही तत्त्वासाठी, काही तात्त्विक प्रमेयांसाठी व सिद्धांतांसाठी झगडलो होतो असे त्या चळवळी सांगू शकल्या. या प्रकारची भाषा क्यूबाला वर्ज्य होती. क्यूबाच्या क्रांतिकारक चळवळीला तात्त्विक मतप्रणालीचे अधिष्ठान प्रारंभी नव्हतेच. ते अधिष्ठान ती चळवळ यशस्वी होऊन थांबल्यावर तयार करण्यात आले. तेसुद्धा अर्धवट मानसिक–वैचारिक गोंधळलेल्या अवस्थेत. क्रांतीच्या चळवळीची नग्नता झाकण्याकरिता. अंजिराच्या पानागत. लाज झाकली न झाकली अशा प्रकारे. Notes for the Study of the Ideology of the Cuban Revolution मध्ये चे ग्वेवरा लिहितो की :

"आमची ही क्रांती एकमेवाद्वितीय अशी आहे. काहींच्या मते तर क्रांतीची जी काही प्रस्थापित लक्षणे आहेत त्याना आमच्या या कादंबरीने पुरता छेद दिलेला आहे. विशेषतः क्रांतीची चळवळ कशी घडून यावयाची याची जी पारंपरिक प्रमेये आहेत, ती तर आमच्या चळवळीने पार खोडून काढली आहेत.

क्रांतीची चळवळ एकूण कशी तयार होते व घडते याविषयी लेनिनने लिहून ठेविले आहे ते असे : तो म्हणतो " क्रांतिकारी चळवळीला क्रांतिकारी विचारांची व मतप्रणालीची जबरदस्त बैठक असल्यावाचून क्रांती घडून येत नसते. ......पण क्यूबाच्या आमच्या क्रांतिकारी चळवळीत ज्यांनी भाग घेतला व ज्यांनी त्या चळवळीच्या सूत्रधाराचे काम केले त्यांच्यापाशी क्रांती-विषयक कोणत्याही प्रकारचे सुस्पष्ट व ठाम असे वैचारिक तत्त्वज्ञान नव्हते. सैद्धांतिक बैठक नव्हती. क्यूबाच्या क्रांतीने मार्क्सचे विचार स्वीकारले आहेत. पण कोठून ? तर क्रांतीचे बौद्धिक शस्त्र टाकून क्रांतीची क्रांतिवादी बंदूक जिथून त्याने आपल्या खांद्यावर घेतली तिथून.........क्यूबाच्या क्रांतीमध्ये मार्क्सच्या सिद्धांतातील प्रमेय व कायदे कार्य करताना दिसतात. पण त्यांचा आणि त्या चळवळीच्या नेत्यांचा व त्या नेत्यांच्यां ज्ञानाचा कोठल्याही प्रकारचा संबंध नाही. क्यूबाच्या क्रांतीच्या नेत्यांचे त्या कायद्यांचे सैद्धांतिक ज्ञान किंवा क्रांतीच्या मार्क्सप्रणीत कायद्यांच्या ज्ञानासंबंधीची त्यांची जाहीर भाषणे यात अर्थाअर्थी संबंध कोणी पाहूच नये. मार्क्सचे क्रांतीविषयक कायदे क्यूबाच्या क्रांतीत कार्य करीत आहेत; पण क्रांतीच्या नेत्यांनी जाणूनबुजून ते वापरले होते म्हणून नव्हे, तर स्वतःच्या स्वतंत्र अस्तित्वाने ते तेथे आहेत. "

क्रांतीच्या प्रत्यक्ष कृतीमुळे झपाटला गेलेला व क्रांतीमागील वैचारिक बैठकीविषयी फारशी कदर न बाळगणारा कॅस्ट्रोदेखिल म्हणतो की, मार्क्सवाद म्हणजे ठराविक प्रश्नाला ठराविक उत्तरे या प्रकारची धार्मिक संथा नाही. मार्क्सवादाला अशी संथा मानणे हे मार्क्सवादविरोधी आहे. क्यूबा–क्रांतीच्या वेळचे क्रांतीचे हे कॅस्ट्रोप्रणीत तत्त्वज्ञान म्हणजे एक खोटे समर्थन आहे. वस्तुतः क्रांतीला तत्त्वज्ञानाची गरज नाही. तत्त्वज्ञानाचा आधार नसला म्हणून क्रांती घडायची थांबत नाही. क्यूबानेच ते दाखवून दिले होते. पण मार्क्स–लेनिनच्या पोथीत क्रांतीला तत्त्वज्ञानाच्या अधिष्ठानाची अपरिहार्य गरज आहे असे सांगितलेले. तेव्हा कॅस्ट्रोची ही सारवासारव. ज्याची अपरिहार्य गरज, त्या गरजेचाच अभाव पाहून काही लोक जसे गरजेचे तत्त्वज्ञान करतात, तसे कॅस्ट्रो गरजेच्या अभावाचे तत्त्वज्ञान करीत आहे. असो.

मतप्रणालीचा आधार नसणारी क्रांती हे क्यूबा-क्रांतीचे वैशिष्टच. कुठल्याही प्रकारच्या तात्त्विक व सैद्धांतिक बैठकीचा आधार या क्रांतीला नव्हता. ही सैद्धांतिक बैठक अनुयायांना संघटित करावयास उपयोगी पडते. सिद्धांत हे अनुयायांना सुसंघटित राखणारे अनुबंध ठरतात. अशी बैठक येथे नव्हती. त्यामुळेच क्यूबाच्या क्रांतीच्या बाबतीत एक वेगळाच उत्स्फूर्तपणा

जाणवतो, जणू काही कुठल्याही पूर्वनियोजित योजनेवाचून ही चळवळ घडून आली होती. या चळवळीचे दुसरे वैशिष्टय म्हणजे त्यातील कायम जाणवलेला झुंझारपणा. तिसरे वैशिष्टय त्यातील पक्ष-पदाधिकाऱ्यांचा तुलनात्मक छोटेपणा. या चळवळीत प्रचंड व अपवादात्मक व्यक्तिमत्वाचा असा एकही कोणी पुढारी नव्हता. सगळे वेताळ वात असे ते होते. या तीन वैशिष्टयांमुळे— चळवळीचा उत्स्फूर्तपणा, सातत्यपूर्ण लढाऊपणा आणि नेतृत्वातील अतिप्रचंड व्यक्तित्वाचा अभाव–ही चळवळ उच्चभ्रू व कलावंत वगैरे पेशांच्या बुद्धिवाद्यांना आकर्षित करीत होती. याचे व कॅस्ट्रोकडे एकोणीसशे साठीतले हे बुद्धिवादी पुन्हा एकदा आकर्षित झाले होते त्याचे कारण क्रांतीच्या कल्पनेचे हे नवे स्वरूप. क्रांतीच्या कल्पनेच्या या नव्या स्वरूपामुळे त्यांची कल्पनाशक्ती पुन्हा एकदा उत्तेजित झाली होती व ते भारले गेले होते. कॅस्ट्रो-छाप दाढीने तर तरुण मुलांच्या मनावर एवढा परिणाम करून सोडला होता की अशा दाढीच्या फॅशनची लाटच्या लाट जगभर उठली. कॅस्ट्रोची दाढी हे दाढीची पाती बनविणाऱ्या कारखान्यावर कोसळलेले मोठे संकटच होते. दाढीची पाती बनविणाऱ्या कारखानदारांचा फायदा एका झटक्यात तिने कमी करून टाकला होता. अर्थात कॅस्ट्रोच्या रणघोषणांच्या रोमँटिक आकर्षणाची तुलना "ला मार्सलेझ" या फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळच्या क्रांतीगीताच्या आकर्षणाशी किंवा "डाय इंटरनाशनाल" या घोषणेच्या आकर्षणाशी करता येणार नाही. या घोषणा त्या बाबतीत भलत्याच लोकप्रिय आणि बलवान होत्या. कॅस्ट्रो एका बाबतीत अतिशय हुशार होता. समूहाचे हित तेच सर्व देशाचे हित व जीवनतत्त्वज्ञान ही आपली एकांतिक समूहवादी भूमिका एकीकडे टिकवून धरून त्याच वेळी उच्चभ्रू साहित्य आणि अतिशय पुरोगामी सिनेमे या दोघानाही आपला पाठिंबा तो चालू ठेवित होता. सांगायचा मुद्दा असा की कॅस्ट्रोच्या भूमिकेचे आकर्षण कट्टर डाव्याना होते तसेच कट्टर उच्चभ्रूनाही होते. एकाच वेळी त्याने डाव्या काठाला आणि उच्चभ्रू मंडळींना आकर्षित केले होते. शिवाय असे दुटप्पी वागूनही लोकमानसावरची त्याची पक्कड घट्ट होती. कॅस्ट्रो एकाच वेळी दोन चेहरे दाखवीत होता. एकीकडे जनसामान्यांच्या हिताचे म्हणून सर्व सार्वजनिक संस्थांचे सामूहिकरण करण्याच्या, थोडक्यात जहाल साम्यवादाच्या गोष्टी तो करीत होता; तर दुसरीकडे अति-पुरोगामी व शिष्ट मानल्या जाणाऱ्या फिल्म्सना व साहित्यालाही तो पाठिंबा देत होता. कॅस्ट्रोच्या व्यक्तित्वाने पॅरिसमधल्या सीन नदीच्या डाव्या काठच्या डाव्या लोकांना भारले, तसेच न्यूयॉर्कमधल्या ग्रिनविच व्हिलेज भागातल्या अति-

पुरोगामी नि उच्चभ्रू आवडीनिवडीवाल्यांनाही त्याने भारले. त्या वेळपर्यंत पिपल्स कम्युनिस्ट इंटरनॅशनलमध्ये असणाऱ्या सेझाना रोझांदाने l' unita (ऐक्य) च्या पाक्षिकात कॅस्ट्रोच्या सांस्कृतिक सहिष्णुतेसंबंधी उत्साहभरित बातमीपत्रे लिहिली. तोच प्रकार फ्रान्समधील **फ्रान्स स्वार** (फेंच सायंकाळ) या पत्रात जँ पॉल सार्त्रने केला. भूतलावरचा सार्त्रचा हा दुसरा भूस्वर्ग होता. पहिला सोव्हिएट युनियनचा. निदान सोव्हिएट युनियनच्या बाबतीत १९५४ मध्ये "लेखक संघटनेतून हकालपट्टी केल्या गेलेल्या लेखकांना अधिक बरी पुस्तके लिहून संघाशी पुनर्सख्य करावयास हरकत नाही" असे सोव्हिएट रशियातून परतल्यावर बापुडवाणे तरी लिहावे लागले होते. आता क्यूबाच्या बाबतीत तसले क्षमायाचक असे काहीही लिहावे लागले नव्हते. जगभरचे अनेक डावे बुद्धिवादी क्यूबाची राजधानी हवाना येथे जमा झाले होते. चाळीस वर्षांपूर्वी अशीच त्यांची मैफल मॉस्कोत भरली होती.

कॅस्ट्रोच्या क्यूबा-क्रांतीमधील साहित्यिक अग्रदूतांना स्वतःचे भवितव्य प्रारंभी भलतेच उजळ वाटत होते. तरी हळूहळू काळे ढग जमा होऊ लागले होते आणि उजळपण मावळू लागले होते. क्यूबात कलात्मक अभिव्यक्तींच्या स्वातंत्र्यात फेरफार करण्याचा हक्क असलेली राष्ट्रीय परिषद प्रथम स्थापन झाली. मात्र ही परिषद स्थापन झाली होती तरी जून १९६१ मध्ये कॅस्ट्रोने जे भाषण केले, त्यात स्टॅलिन व माओच्या परंपरांच्या अगदी विरुद्ध आश्वासन लेखकमंडळीस व बुद्धिवाद्यास तो देऊन गेला. तो म्हणाला की "बुद्धिवाद्यांनी व लेखकांनी चिंता करावी व घाबरावे असे काहीही घडलेले नाही. त्यानी बिलकूल घाबरू नये."

"क्रांती स्वाभाविकपणेच स्वातंत्र्याची विरोधक व शत्रू असू शकत नाही. आमच्यातील सर्जकतेला क्रांती मारक होणार आहे, आमच्यातील सर्जक प्रवृत्तींची मुस्कटदाबी होणार आहे अशी जर भीती कुणाला वाटत असेल तर ती भीती अनाठायी आहे असे त्याने समजावे. या प्रकारच्या भीतीला या ठिकाणी स्थानच नाही.........नागरिकांचे सांस्कृतिक व्यवहार आणि जीवन यात शासनाचे अस्तित्व म्हणजे त्या अधिकाराचा दुरुपयोग असे मानण्याचे काहीच कारण नाही.

कॅस्ट्रोचे आश्वासन होते तरी काळ्या ढगांची छाया दिवसेंदिवस अधिकाधिक गडद होत होती. ही छाया गडद होऊ लागली तसे अनेक बुद्धिवादीं "तंगड्या झाडू लागले." अनेकांना, या अनेकात Revolution या पत्राचे माजी संपादक कार्लो फ्रांकी आणि त्याच पत्राच्या वाङ्मयविभागाचा संपादक



अनुक्रमणिका

गुलेर्मो कॅविरे आॅफान्त हेही होते—या सर्वांना सर्व सोडून विजनवासात पळ काढावा लागला. इतक्याउप्पर आपापल्या जागांना जे चिकटून बसले त्यांना शासनाच्या अधिकृत मतांशी अधिकाधिक जुळवून घेत जावे लागले. हर्बर्टो पॅडिल्ला या कवीची या बाबतीत जी अवस्था झाली तो या प्रकाराचा कळस होता आणि प्रातिनिधिक नमुनाही.

१९६८ मध्ये पॅडिल्लाच्या **फ्लेरा डेल ज्वेगो** या नावाच्या काव्य-संग्रहाला वार्षिक पारितोषिक मिळाले. परंतु पारितोषिक मिळताच त्याच्यावर सरकारी पत्रांनी जी आगपाखड सुरू केली, ती एकूण वारे कोठल्या दिशेला वाहू लागले होते हे स्पष्टपणे दाखवीत होती. वेर्दे आॅलिवो या लष्करी पत्रिकेने परीक्षकांना झोडूनच काढले. या पत्रिकेचा पॅडिल्लावर आणि त्याला बक्षिस देणाऱ्या परीक्षकांवर एक आरोप असा होता की, पॅडिल्लाच्या काव्यात क्रांतीचा जोष आणि उत्साह नव्हता तरी हे बक्षिस त्याला दिले गेले होते. हा आरोप हे अर्थात सर्वच क्रांत्यांचे सर्वसाधारण अंग आहे. प्रत्येक क्रांतीतच चालकांना क्रांत्युत्तर काळाचे काव्य नि वाङ्मय पुरेसे क्रांत्युत्सुक नाही असे वाटू लागते. या संदर्भात खुद्द फिडेल साहेबांचेच वचन ध्यानात घेता येईल. फिडेल म्हणतात की " क्रांतिवादी हा आशावादीच असला पाहिजे. त्याव्यतिरिक्त तो इतर काहीच असू शकत नाही. " तर तात्पर्य असे की कवी, लेखक वगैरेंनी क्रांतीच्या बाबतीत फक्त एक भूमिका घ्यावयाची, की क्रांती यशस्वी झाली आहे. भूतलावर नवा स्वर्ग अवतरत आहे. पॅडिल्लाच्या काव्यात हे नव्हतें. तेव्हा सरकारी मते त्याच्या विरुद्ध गेली. **वेर्दे आॅलिवोच्या** मते तर हा इसमच मुदलात बुळा होता म्हणून त्याचे काव्य षंढ निपजले होते," त्याच्या बुळेपणाची बरोबरी त्याच्या काव्यातील अश्लीलता नि क्रांतिविमुखताच फक्त करू जाणोत ! " पॅडिल्ला वरचा हा हल्ला तितकासा बरोबर नव्हता. निदान न्याय्य तर अजिबात नव्हता. मागे एकदा क्यूबा—क्रांतीचा एक चालक **चे गेव्हारा** यानेही साम्यवादी वास्तववादाच्या संदर्भात काही व्याजोक्तीपूर्ण उद्गार काढले होते. हा लेख आता पॅडिल्लावर तुटून पडू पाहणाऱ्या **वेर्दे ओलिवोमध्येच** आलेला असतो. लेखाचे नाव होते Notes on Man and Socialism in Cuba. चेचे मत असे की " साम्यवादी वास्तववादाचे जे कित्येक साचेबंद आणि हवाबंद नमुने आहेत त्यांच्याच फक्त मर्यादात कलेकरिता उपचार आपण का म्हणून शोधावेत ? " चेचे मत तर उघडउघड प्रस्थापित साम्यवादी तत्त्वज्ञानाला विरोधी होते, नि साम्यवादाच्या जाहीर धोरणालाही ! पण चे गेव्हारावर फारसा कडवा हल्ला







झाला नाही. वेर्दे ओलिवोने त्याला फक्त खिजविले आणि प्रकरण तेवढ्यावरच राहिले. परंतु पॅडिल्लावर जो हल्ला आता त्या पत्राने चढविला होता तो आत्यंतिक दुष्टावापूर्ण आणि कटू व निष्ठुर असा होता. क्यूबातील सरकारी धोरणवाल्या पत्रांकडून त्याची अगदी सालडीच काढण्याचा प्रयत्न होत होता. El Caiman Barbudo ( The Bearded Aligator ) या तरुण कम्युनिस्ट नियतकालिकाने पॅडिल्लाच्या काव्यसंग्रहावर आणि पॅडिल्लावरही अनेक कठोर लेख लिहिले, परीक्षणे केली आणि त्याला एक क:पदार्थ ठरविला. या लेखांपैकी एक लेख तर लि सांद्रो ओटेरो या क्यूबाच्या सांस्कृतिक अधिकाऱ्याचाच होता. शत्रूला नामोहरम करण्यासाठी तो कोठल्याही थराला जाऊ शकत होता. हा लेखच अथपासून इतिपर्यंत केवळ दुष्टाव्याने भरलेला होता आणि तितकाच कटुतेनेही. आणखीही अनेक प्रकारची टीका पॅडिल्लावर केली जात होत होती. या एकूण प्रकरणातून जे दिसत होते ते असे: लेखकांच्या मुक्त वैचारिक हालचालींवर दडपशाहीचे आक्रमण करू पाहणाऱ्या सरकारी कारवाया चालू असल्या तरी क्यूबाचे सरकार तोंडाने मात्र " क्यूबा–क्रांती सर्व प्रकारच्या दडपशाहीपासून पूर्णतः मुक्त आहे " असा मंत्र जपत होते. क्यूबाच्या वर्तमानपत्रातून ठळक जागी अशी निवेदनेच वेळोवेळी प्रसिद्ध होत होती. पाहा: सुझां झोटांग– " Some Thoughts on the Right Way ( for us ) to love the Cuban Revolution " — Ramparts एप्रिल १९६९. याच लेखात झोटांगबाईंनी अशी ठाम ग्वाही दिलेली आहे की " क्यूबाचा एकही लेखक तुरुंगवासात नाही. अथवा पूर्वी कधी नव्हता. अथवा साहित्य प्रसिद्ध करण्याच्या मार्गात क्यूबातील लेखकाच्या आड कोठल्याही सरकारी अडचणी येत नाहीत. "

क्यूबातील लेखकांबद्दल आणि त्यांच्या आविष्कारिक स्वातंत्र्याबद्दल परदेशी सहप्रवाशांची ही निवेदने. आता वस्तुस्थिती: मार्च १९७१ मध्ये पॅडिल्लाला अटक होते. महिन्यापेक्षा अधिक काळपर्यंत जेलमध्ये डांबला गेल्यानंतर, पॅडिल्ला त्याच्यावर केल्या गेलेल्या सरकारी आरोपांना महान स्टॅलिनीपद्धतीचा कबुलीजबाब देतो. " होय, तो प्रतिक्रांतिवादी होता. तो भुक्कड कवी होता. विश्वासघातकी आणि एक दुष्ट असा इसम होता. " आता पॅरिसमध्ये वास्तव्य करून असलेल्या के. एस्. कॅरोल आणि रने ड्यूमाँ या पूर्वीच्या सी. आय्. ए. एजंटांना ( हे दोन्हीही एके काळचे कॅस्ट्रोचे डावे मित्र. क्यूबासंबंधी त्यांनी जे पुस्तक लिहिले आहे त्यात त्यांनी क्यूबावर सडकून टीका केलेली आहे. ) गुप्त माहिती पुरविली होती. " पॅडिल्लाची

तुरुंगातली रवानगी आणि त्याने दिलेली आत्म-कबुली याच्यामुळे अनेक बोधपर हेतूंची साध्यता होत होती !

हा कबुलीजबाब आणि दडपशाही घटना यांच्याविरुद्ध जेव्हा Le Monde नावाच्या फ्रेंच पत्रात एक पानभर मजकूर आला तेव्हा डावा किनारा (पॅरिसमधले बहुतेक सगळे डावे सेन नदीच्या डाव्या काठावर वास्तव्य करून आहेत म्हणून डाव्यांना Left Bank असे म्हणण्याची प्रथा आहे) बुद्धिवादी मंडळी अतिशय व्यथित होतात. त्यांच्यातील सार्त्र, सीमाँ द वोव्हाः नि इतर " प्रगतीवादी " लेखकमंडळी कॅस्ट्रोच्या निषेधाचे कडक अनावृत पत्र ल मोन्दमध्ये लिहून आणतात. (ल मोन्द एप्रिल १९७१.) २२ मे रोजी ल मोन्दने दुसरे अनावृत पत्र प्रसिद्ध केलेले असते. पत्रावर सह्या असतात सूझां झोटांग, आल्वर्तो मोराविया, कार्लो फुआंत इत्यादि सगळे नामांकित साहित्यिक, विचारवंत. पत्रात लिहिलेले असते की, " हर्वर्टो पॅडिल्लाने सही केलेला कबुलीजबाब ही एक शोचनीय घटना आहे. क्रांतीची न्याय्यता आणि इष्टता या दोन्ही बाबींना धक्का न पोचविता असा कबुलीजबाब मिळविताच येणे शक्य नाही. कबुलीजबाबात अर्थशून्य आत्मदोषारोप आणि भ्रमिष्ट विधाने यांची रेलचेल असून हर्वर्टो पॅडिल्लाच्या तोंडी आत्मनिंदा व आत्म-दोषारोप करणारी अशी जी वाक्ये घातली गेली आहेत, ती अशा प्रकारच्या खऱ्या उद्‌गारांचे एक खोटे विडंबनच आहे........पॅडिल्लाच्या तोंडी घातल्या गेलेल्या या वाक्यांवरून असे वाटू लागते की पॅडिल्लाच्या तोंडी कोणते शब्द घालायचे हे पूर्वीच ठरवून ठेवलेले असावे. पॅडिल्लाने केलेली विधाने त्याच्या-कडून जबरदस्तीने वदवून घेतल्यासारखी वाटतात. या सर्व प्रकरणावरून असे वाटते की येनकेन प्रकारेण कुणाचा तरी बळी द्यायचा हा हेतू या बनावामागे होता. या सगळ्या प्रकरणामुळे स्टॅलिनच्या काळातील अत्यंत वाईट अशा क्षणांची पुन्हा एकदा आठवण होते. "

या पत्रकाच्या संबंधातील पॅडिल्लाची प्रतिक्रिया. अर्थात क्यूबा-सरकारच्या मेहरबानीमुळे जगाला ज्ञात होऊ शकलेली. " पॅडिल्लाला हे पत्रक मुळीच आवडलेले नाही."–इति Presna Latina हे सरकारी पत्रक. पॅडिल्लाच्या दृष्टीने त्याच्यावर सही करणारांनी केलेला साम्यवादाचा तो " विश्वासघात " होता. ( ल मोन्द ३०–३१ मे १९७१ ).

ल मोन्दला लिहिलेल्या पत्रात पॅडिल्ला म्हणतो की, " हेही पत्र मी लिहिलेले नाही असे तुम्ही पुन्हा म्हणाल. तुम्ही म्हणाल की ही माझी शैली नव्हे. पण मला तुम्हाला हे बजावून सांगायचे आहे की आजवर एकदाही कधी



अनुक्रमणिका

तुम्हाला माझ्या शैलीचे कौतुक वाटले नाही. माझ्या शैलीची व माझीही कसल्याही प्रकारची कदर आजपर्यंत तुम्ही केलेली नाही. तुम्ही सारेजण एक-जात बूर्झ्वा उदारमतवादी आहात. आजपर्यंत नेहमीच तुम्ही मला एक सामान्य प्रतीचा लेखक मानीत आलात. आणि आजच माझ्याकडे तुम्ही लक्ष देत आहात ते केवळ क्रांतीला तुम्हाला अपशकून करायचा आहे म्हणून. क्रांतीला बदनाम करायचे आहे म्हणून. तुम्ही सर्व सी. आय्. ए., साम्राज्यवाद, आंतरराष्ट्रीय प्रतिक्रांतीवाद यांनाच मदत करीत बसा. क्यूबाला तुमची गरज नाही."

३० एप्रिल १९७१ ला हॅवाना येथे राष्ट्रीय, शैक्षणिक व सांस्कृतिक परिषद भरली होती. त्या परिषदेत कॅस्ट्रोसाहेब बोलले व त्यांनी पॅडिल्ला प्रकरणासंबंधीची खरी परिस्थिती सांगितली. क्यूबाच्या या महत्तम नेत्याने प्रथम ल मोंदच्या पत्रलेखकांचा धिक्कार केला नि तो म्हणाला की,

"अलीकडच्या एका वर्षात हे जग आणि त्यात राहणारे लोक यांना आम्ही उत्तम प्रकारे ओळखू लागलो आहोत. यापैकी कित्येकांचे अगदी अचूक वर्णन येथे मघा केले गेले. आम्ही क्यूबाच्या क्रांतीचे समर्थक व पाठीराखे आहोत असे कंठरवाने सांगणारात कित्येक भोंदू आणि फसवेही आहेत."

भाषणात नंतर "बूर्झ्वा उदारमतवादी" आणि "व्याज किंवा दिखाऊ डावे" यांची कॅस्ट्रोने खूप निर्भर्त्सना केली. "पाश्चात्यांच्या खोटया फॅशन्स व वैचारिक टुमी" व "खोटा दिखाऊपणा" यांची परखड शब्दात हजेरी घेतली आणि शेवटी असे सांगितले की "कलादि अभिव्यक्तींकडे पाहण्याचा आमचा दृष्टिकोन राजकीय आहे." कारण "सांस्कृतिक वसाहतवादाबरोबर" आपणास लढा द्यावयाचा आहे. "काही चुकार मेंढरांचा विरुद्ध व फुटीर मते मांडण्याचा हक्क आपण एकजात नाकारीत आहोत." शेवटी क्यूबा-क्रांतीची बाजू घेणाऱ्या सहप्रवाश्यांना त्याने जो टोला मारला तो तर इतका उघड होता की कान बंद ठेवणारांनाही तो जाणवावा. तो ओरडून म्हणाला की "अशा प्रकारची टीका चालू दिली जाणार नाही. आमचे "दिखाऊ मित्र" आम्हावर जी खोटी टीका करीत आहेत ती मुळीच सहन केली जाणार नाही. ही सूचना व चेतावणी क्यूबाबाहेरील लेखक नि साहित्यिक मंडळींना होती. अर्थात याच चेतावणीत गर्भित असणारी क्यूबांतर्गत लेखक–साहित्यिकांसाठी असणारी धमकीही तितकीच स्पष्ट होती. क्यूबा–कांग्रेसने जो जाहीरनामा काढला होता त्यात ही धमकी पुढील शब्दात व्यक्त होत होती.

"क्रांतीच्या ज्या तत्त्वप्रणालींवर समाजवाद आणि साम्यवाद यांची उभारणी झालेली आहे, त्या तत्त्वप्रणालीच्या विरुद्ध कट करून स्वातंत्र्याच्या



अनुक्रमणिका

तथाकथित पोकळ कल्पनांच्या व सिद्धांतांच्या मिषाने क्रांतीविरोधी तत्त्व-ज्ञानाचे विष फैलाविणाऱ्या साऱ्या प्रवृत्ती आम्हास अमान्य आहेत. अशा प्रवृत्तींचा सर्वांनी धिक्कार करावयास हवा. "

शिक्षण आणि सांस्कृतिक जीवन यांच्यात एकवाक्यता आणण्याच्या उद्देशाने कित्येक उपायही या जाहीरनाम्यात सूचित करण्यात आले होते. या प्रकारच्या उपायांची एक यादीच त्या जाहीरनाम्यात देण्यात आली होती. नवीन सरकारच्या शिक्षण व सांस्कृतिकता यात एकवाक्यता आणण्याच्या धोरणाचा केवळ उल्लेख व निर्देश त्यात आला नव्हता, तर नव्या सरकारची तत्त्वप्रणाली मनावर बिंबविण्यासाठी व सरकारी विचार नि बौद्धिक प्रबंध प्रसारित करण्यासाठी प्रचारसाधनांचा उपयोग कशा प्रकारे केला जावा, लोकांच्या विचारांचे नियमन-नियंत्रण कशा प्रकारे केले जावे याचाही आराखडा त्यात मांडला गेला होता. या सगळ्या प्रकरणाचा तात्कालिक परिणाम **बोहेमिया** साप्ताहिकाचा संपादक एन्रिक द ला ओझा याला संपादकाच्या कामावरून दूर करण्यात झाला. त्याचा दोष हा होता की 'काय लिहावे व काय लिहू नये याचे तारतम्य त्याच्यापाशी नव्हते.' किंबहुना अशा प्रकारच्या सर्व बाबतीत तो अगदी निष्काळजी होता. या प्रकारच्या लेखनात जितकी काळजी घ्यावयास हवी असते तितकी काळजी त्याने घेतली नव्हती. एन्रिक द ला ओझाची संपादकपदावरून उचलबांगडी केली गेली होती, तर पॅडिल्लाप्रकरणात पॅडिल्लाची ससेहोलपट करणारा व पॅडिल्लाला टीकेच्या धारेवर धरणारा 'वेर्दे ओलिओ'चा माजी संपादक लुई पव्हाँ याला राष्ट्रीय सांस्कृतिक परिषदेच्या प्रमुखपदाची वस्त्रे दिली गेली. एकीकडे क्यूबा-सरकार, कॅस्ट्रो, खुद्द पॅडिल्ला, पाश्चात्य डाव्या लेखकांनी केलेल्या कॅस्ट्रोनिषेधाचा निषेध करीत होते; तर दुसरीकडे पॅडिल्लाची सौभाग्यवती श्रीमती ब्रेल्झिक काझा हीसुद्धा पॅडिल्लाची बाजू घेऊन पाश्चात्य लेखक कॅस्ट्रो सरकारच्या निषेधाची जी मोहिम चालवित होते त्या निषेधाचा धिक्कार करीत होती. अशा प्रकारच्या निषेधाच्या निषेधाची सर्व क्यूबाभर अगदी रणधुमाळीच माजली होती. जो उठला तो पाश्चात्यांचा निषेध करीत होता. पॅडिल्ला म्हणत होता की क्यूबा सरकारने त्याला मुळीच वाईट वागणूक दिलेली नव्हती. क्यूबा सरकारचे सरकारी निवेदनेही तेच सांगत होती नि पॅडिल्लाची पत्नीही तेच म्हणत होती. पॅडिल्लाची पत्नी तर पाश्चात्य डाव्यांच्या निर्भर्त्सनेच्या मोहिमेत सर्वात आघाडीवर होती. ती म्हणत होती की कॅस्ट्रो व क्यूबा-सरकारवरील पाश्चात्य डाव्यांची टीका म्हणजे कॅस्ट्रो-सरकार-विरुद्ध देण्यात येत असलेली "निर्लज्ज चिथावणी" होती. क्यूबात जारी करण्यात



अनुक्रमणिका

आलेल्या नव्या सांस्कृतिक धोरणामुळे लेखकांना वा विचारवंतांना एकदम नवा पवित्रा घेणे भाग पडत होते. कासा द लाझ् अमेरिकास या संस्थेची संचालिका हैडी सान्तामारिया हिला, बौद्धिक स्वातंत्र्याच्या बचावाचे जे धोरण क्यूबाच्या बाहेर आखण्यात येत होते, त्या धोरणापासून स्वतःला वेगळे करावे लागले. पेरुवियन लेखक मारिओ वर्गास ल्लोसा यांना एक अनावृत पत्र वर्तमानपत्रात प्रसिद्ध करून आपल्या संस्थेचा अधिकृत पाठिंबा क्यूबाच्या सरकारी धोरणालाच असून आपण तो पाठिंबा आत्यंतिक निष्ठेने देत आहोत असे उघडपणे जाहीर करावे लागले.

क्यूबा-सरकार बुद्धिवाद्यांवर व लेखकांवर दडपण आणून त्यांच्या स्वतंत्र विचारांची मुस्कटदावी करते यासाठी ज्यांनी निषेध केला होता त्या सर्व डाव्या लेखकांना क्यूबा-सरकारने शत्रूपक्षात बसविले. " प्रगतीवादी साहित्य " व " क्रांती " यांच्यातील प्रणयाचे आणखी एक प्रकरण या प्रकारे संपुष्टात आले होते.

× × × ×

' जुने मरणालागुनी गेले आहे '. अन्यायाचा शेवट झाला आहे; अन्याय करणारांचेही उच्चाटण झाले आहे; आता सुख, शांती, समृद्धी यांचे सहस्र वर्षांचे परमेश्वरी राज्य येणार, या क्रांतीच्या म्हणजे क्रांतीवाद्यांच्या घोषणा असतात. या घोषणा सामान्य जनतेच्या गळी उतरविण्याचे कार्य बहुधा लेखक व साहित्यिक लोक करीत असतात. तेव्हा साहित्यिक व क्रांती यांच्या एकत्र येण्यातून काय घडून येते याचा आढावा उद्बोधक ठरेल. पण भूतलावर स्वर्ग आणण्याच्या गोष्टी करणाऱ्या क्रांत्यांच्या निरीक्षणातून जे तात्पर्य निघते ते असे---क्रांत्यांचे इतर परिणाम व फलित काहीही असोत; हे परिणाम कोणी चांगले मानोत अथवा वाईट मानोत; कल्याणकारक मानोत अथवा अकल्याण-कारक मानोत; क्रांत्या कुठल्याही परिस्थितीत, त्या क्रांत्यांच्या किंवा क्रांत्युत्तर राजवटींच्या यंत्रणेत गवसलेल्या लेखकांना धार्जिण्या ठरत नाहीत. क्रांती ही वस्तू साहित्यिकांच्या बाबतीत सर्वथा निराशाजनक आहे. कित्येकदा तर शोकात्मकही. क्रांत्यांमुळे इतरांचा फायदा होईल अथवा होणार नाही. पण क्रांत्यांच्या तंत्रात सापडलेल्या लेखकांचा लेखक म्हणून नेहमी तोटाच होत असतो. पूर्व युरोपातील राज्यकर्ते आणि लेखक यांच्यातील संघर्ष हेच सिद्ध करतात. पुर्व युरोपातील या संघर्षांना अधिक कटू स्वरूप येण्याचे दुसरे कारण असे की युग्लोस्लोवियाच्या क्रांतीचे नाव सोडता, पूर्व युरोपातील इतर सर्वच्या



अनुक्रमणिका

सर्व क्रांत्या त्या–त्या देशावर देशाबाहेरील शक्तींकडून लादल्या गेलेल्या आहेत. त्या क्रांत्यांपैकी एकही क्रांती स्वदेशी नाही. त्या परकी देशांनी केलेल्या हस्तक्षेपातून घडल्या होत्या. मात्र याचा अर्थ असा नाही की ज्या देशातील क्रांत्या स्वदेशी शक्तींमुळे घडल्या होत्या, त्या देशातील साहित्यिक जनतेचे भवितव्य ज्या देशातील क्रांत्या परकी हस्तक्षेपामुळे घडल्या होत्या त्या देशातील जनतेपेक्षा अधिक बरे असते ! छे, छे ! तसे मनात आणण्याचे मुळीच कारण नाही. दोन्हीही ठिकाणी लेखक–साहित्यिकांचे भवितव्य सारखेच वाईट व त्रासदायक असते ! पोलंड, हंगेरी, युगोस्लोविया आणि पूर्व युरोपातील इतर कित्येक देश, की जेथे राज्यक्रांत्या घडून आल्या आणि जेथील साहित्यिकांनी त्या–त्या क्रांत्यात भाग घेतला होता, त्या साहित्यिकांच्या दुर्दैवाची कहाणी गाण्याचे येथे प्रयोजन नाही. किंवा साहित्यिकांचे व लेखकांचे बौद्धिक स्वातंत्र्य अभंग राखण्यासाठी त्या लेखक–साहित्यिकांनी क्रांत्युत्तर राजवटीबरोबर जो प्रखर लढा दिला त्याचीही उजळणी करण्याचे या ठिकाणी कारण नाही. पूर्व जर्मनीतल्या बुद्धिवाद्यांचे बंड; १९५६ चा पोलिश ऑक्टोबर-उठाव; १९५६ ची हंगेरी क्रांती; १९६८ चा प्राग उठाव या प्रत्येक उठावात लेखकवर्गाने महत्त्वाची भूमिका केलेली आहे. आणि हा आणि या ठिकाणी फार महत्त्वाचा आहे, या प्रत्येक ठिकाणी क्रांत्युत्तर क्रांतिसरकारच्या हातून लेखकवर्गाची बुद्धिपुरस्सर ससेहोलपटही केली गेली आहे. या प्रत्येक ठिकाणच्या लेखकवर्गाचा क्रांतीच्या पश्चात परिणामांचा अनुभव अतिशय भयानक आहे. प्रत्येक ठिकाणचा लेखकवर्ग क्रांतीच्या चांगुलपणाविषयी भ्रमनिरासित झालेला आहे. नव्या क्रांतिवादी शासनाविषयी पूर्णतः निराश झालेला आहे. या निराश होणारात क्रांती घडवून आणण्यात ज्यांनी हिरीरीने भाग घेतलेला होता ते साहित्यिक आणि लेखकही आहेत.

तसे पाहिल्यास पोलंड या देशात गेल्या महायुद्धापूर्वीच्या काळात फार थोडे क्रांतिवादी साहित्य लिहिले गेले होते. क्रांतीचे गुणगान गाणारे पहिले काव्य एकोणिसशे विशीत बाहेर पडले. Three Salvoes–तीन मुक्त्या हे त्याचे नाव. हे काव्य तीन कम्युनिस्ट प्रातिनिधिक कवींनी रचले होते. 'तीन मुक्त्या' हे नाव पुढे खरेच मोठे भविष्यसूचक ठरले. कवींना अभिप्रेत होता त्या अर्थाने नाही; पण कवींना जी काही मुक्ती क्रांतिवाद्यांनी दिली त्या अर्थाने ! मुक्ती–उद्गात्या या तीन कवींपैकी दोघेजण स्टॅलिनच्या हस्तकांकडून मारले गेले. (वांद्रुस्की १९३२ त आणि स्टॅन्डे १९३८ त.) तिसरा ब्रोनिस्की १९४० त. तो सोव्हिएट युनियनच्या पाशात सापडला नि कैदेत

अडकला. कैदेनंतर त्याची रवानगी सरळ एका श्रमशिबिरात केली गेली. पुढे जनरल अँडरच्या सैन्यातून सोव्हिएट युनियनच्या बाहेर पडण्यात त्याने कसेबसे यश मिळविले. युद्धसमाप्तीनंतर तो पोलंडास परतला आणि पोलंडास परत येताच महत्त्वाचे कार्य जर त्याने कोणते केले असेल, तर स्टॅलिनच्या खोट्या स्तुतीपर एक खुषामती काव्य लिहून त्याने प्रसिद्ध केले. Ode to Stalin हे त्याचे काव्य विद्यार्थ्यांच्या शालेय पुस्तकात अंतर्भूत करण्यात आले आहे. ब्रौनिस्की पुढे दारूबाज बनला आणि अशाप्रकारे अत्यंत हलाखीच्या परिस्थितीत एक दिवस मरण पावला नि मुक्त झाला. क्रांतीच्या उज्जवल प्रभावाचे नि मानवाच्या मुक्तीचे गीत गाणाऱ्या या तीन कवींचे मुक्तीचे भाकित वेगळ्याच अर्थाने खरे झाले. पुढे अर्थात ब्रौनिस्की "क्रांतीचा शाहीर" ठरला व त्याला मानवंदना मिळू लागली. मात्र सोव्हिएट बंदीखान्याचे वर्णन करणाऱ्या त्याच्या कविता दडपून टाकण्याची खबरदारी घेण्यात आलेली होती. पोलिश कम्युनिस्ट साहित्यिकांपैकी चौथा नामांकित साहित्यिक ब्रुनो जेसिन्स्कि. पोलिश वाङ्मयातल्या फुच्युरिस्ट[१] प्रवृत्तींचा तो पहिला प्रवर्तक. Je Brule Paris ही त्याची फ्रेंच कादंबरी. पॉल मोदांच्या Je Brule Mascou या कादंबरीला दिलेले ते उत्तर होते. पॅरिसमधील L'Humanite या नियतकालिकात ती कादंबरी क्रमशः प्रकाशित होत गेली. या मॉस्कोच्या सेवेसाठी. पुढे तो रशियात गेला असता Literature Mirovois Revolyutsi या प्रोलिटेरिएट लेखकांच्या जागतिक संघटनेच्या मुखपत्राचा मुख्य केला जातो. मागाहून त्याला सोव्हिएट रशियातून पोलिश भाषेत प्रसिद्ध होणाऱ्या

---

१. फ्युच्युरिस्ट (Futurism). एक इटालियन कला-चळवळ. १९०९ मध्ये तिचा प्रारंभ झाला. मारिनेत्ती नावाचा कवी हा त्या चळवळीचा नेता. या चळवळीने आपली भूमिका स्पष्ट करणारे अनेक जाहीरनामे प्रसिद्ध केले आहेत, त्याप्रमाणे 'आधुनिक जीवनाचा आत्मा चित्रित करणे' हा तिचा हेतू. "पोलाद, आत्यंतिक आवेश, मनस्वीपणा आणि कमाल वेगवानता" ही या जीवनाची प्रकृती. ती कलाभिव्यक्तीत यावी हा हेतू. अर्थात कलाभिव्यक्तीत यंत्रांचे—उदा., मोटारगाडी—चित्रण करणे हा त्याचा अर्थ नव्हता. तर यंत्रातून जी प्रचंड गती सूचित होते ती कलाभिव्यक्तीतून व्यक्त करावी हा त्याचा अर्थ होता. मनावर उमटणारा मानवी जीवनातील हा गतीचा ठसा कलेतून पकडला जावा हा या कलाभिव्यक्तीचा हेतू.

Kultura Mas या पत्राचा संपादक केले गेले. या पदावर असतांना 'माणूस आपली कातडी बदलतो' नावाची एक कादंबरी त्याने लिहिली. मनुष्याचे जन्मजात गुणधर्म बदलून टाकण्याच्या रशियन सिक्रेट पोलिसांच्या अंगच्या विशेष शक्तीचे वर्णन करणारे कित्येक काव्यमय परिच्छेद त्या कादंबरीत आहेत. ब्रुनो जेसिन्स्वीने मॉस्को राजवटीला व तिच्या कर्णधारांना खूष करण्यासाठी इतके जीवतोड प्रयत्न केले तरी शेवटी पॉवेल युडीन या गृहस्थाने त्याला खोटा ठरवून पोलिसांकरवी कैदही करविले. (१९३७) पुढे १९४१ मध्ये सोव्हिएट युनियनच्या कन्संट्रेशन कँपात तो मरण पावला. अॅलेक्झांडर वॅट हा आणखी एक क्रांतिवादी पोलिश कवी. हा पक्षसभासद नसतो. तरी साम्यवादी साहित्यिक मासिकपत्रिकेच्या संपादकपदावर होता. लोव्हमध्ये १९४० त त्याला कैद करण्यात आले. युद्धसमाप्तीनंतर तो पोलंडला परतला. परंतु बंदी आणि सुटकेच्या मधल्या काळात सोव्हिएट छळशिबिरात ज्या मानसिक व शारीरिक यातनातून त्याला जावे लागले होते त्या छळांनी त्याला मनाने कायमचे अपंग बनविले होते. तो पुरता मोडून गेला होता. काही काळानंतर पॅरिस येथे विजनवासातच मनाच्या एकाकी अवस्थेत तो मृत्यू पावला. आणखी तीन कम्युनिस्ट लेखक युद्धानंतरही पक्षाच्या हातून वाचून लोकांच्या पोलंडमध्ये महत्पदास चढले होते. आंद्रज स्तावर, स्टॅनिस्ला ब्यगांदस्की, इगोर नेवर्ली ही त्यांची नावे. या तिघातील पहिला पॅरिस येथे मरण पावला. पॅरिस येथील निर्वासितांसाठी असलेल्या Kultura नावाच्या मासिकातून कम्युनिस्ट राजवटींना बदनाम ठरविणारे पुस्तक छापले होते. दुसरा इस्राएलला जातो. १९६८त झीओनिस्ट किंवा ज्यू–राष्ट्रवादी म्हणून त्याचा छळ करण्यात आला होता. तिसऱ्याने उदारमतवादी बुद्धिवादी मंडळींचे पुढारीपण घेतले. क्रांती होण्याआधीं क्रांतीच्या हिरीरीने पुरस्कार करू पाहणाऱ्या, क्रांतिलढयात मनापासून भाग घेणाऱ्या आणि क्रांतिसरकारच्या राजवटीत सरकारी हस्ते प्राणास मुकलेल्या किंवा छळामुळे आत्महत्या केलेल्या अशा अनेक लेखक–कवींची उदाहरणे पूर्व युरोपातील इतरही क्रांतिवादी राष्ट्रांच्या दफ्तरातून काढून दाखविता येतील. या सर्वांना क्रांतिसरकारांची उबग येत होती. आपण केले काय आणि झाले काय याचा पश्चाताप वाटत होता. ज्याच्यासाठी आपण झगडलो, त्रास सहन केला, रक्त आटविले, ज्याची स्वप्ने आपण पाहिली, ते हे नव्हे हे ओळखून निराशा येत होती. निराशेने, वैफल्याने आणि संतापाने ते पक्षाबरोबरचे संबंध तोडावयास उद्युक्त होत असत. मग त्यांच्या नशिबी विजनवास, विजनवासातील अपघाती



अनुक्रमणिका

मृत्यू, आत्महत्या किंवा अनामिकाचे एकाकी, वहिष्कृत जीवन येत होते. प्रत्येक ठिकाणी क्रांतीच्या प्रारंभी पक्षावरोवरचे धनिष्ट सहकार्य आणि मागाहून पक्षाचे एकूण धोरण व व्यवहाराची दिशा पाहिल्यानंतर भ्रमनिरास होऊन पक्षत्याग हा एकच आकृतिबंध आपणास या बुद्धिवाद्यांच्या व साहित्यिकांच्या जीवनात आढळून येतो. हंगेरीच्या ॲटिल्ला जोजेफ या ज्या थोर कवीने नंतर आत्महत्या करून आपले आयुष्य संपविले होते तो थोर कवी प्रारंभी कम्युनिस्ट पक्षात होता व मागाहून त्याने पक्षावरोवरचे संबंध तोडून टाकले होते. जे हंगेरीमध्ये घडले होते तेच झेकोस्लोव्हाकियातही घडले होते. झाविस कालांद्रा या कवीला व लेखकाला त्याने ट्रॉटस्कीवादाचा पुरस्कार केला म्हणून १९४८ पकडण्यात येऊन तेथे फाशी दिले गेले होते. क्रांती होण्यापूर्वी कम्युनिस्ट राज्यपद्धतीचा पाठपुरावा करू पाहणाऱ्या अनेक लेखक-कवींचा त्या राजवटी प्रत्यक्ष अनुभविल्यावर अपेक्षाभंग, नव्हे संपूर्ण भ्रमनिरास होत गेला. Irodalmi Ujsag आणि Literarni Noviny या पत्रातून प्रारंभिक;लिखाण करणाऱ्या व नंतर त्या पत्रांकडे पाठ फिरविणाऱ्या लेखकांच्या नावांची लांवचलांब यादी या सत्याला साक्षीदार आहे.

वरील विवेचनावरून वाचकांचा असा गैरसमज व्हायचा की ज्यांचे संपूर्ण सांस्कृतिक व बौद्धिक शिक्षण कम्युनिस्टपूर्व राजवटीतून झालेले असते व मागाहून त्या राजवटीला कंटाळून जे कम्युनिस्टप्रेरक क्रांतिकार्याकडे वळलेले असतात, तेच पुन्हा एकदा नवीनही राजपद्धतीविषयी भ्रमनिरासित होऊन त्याही राजवटीविरुद्ध उलटतात. थोडक्यात त्यांचा पिंडच असमाधान्याचा असल्याने त्यांना काहीच पसंत पडत नाही. जुनी राजवट त्यांना पसंत पडत नाही तशीच नवी राजवटही पसंत पडत नाही. खरी गोष्ट तशी नाही. युद्धोत्तर पूर्व युरोपातील कम्युनिस्ट राजवटींसंबंधी भ्रमनिरास झाला होता ते सर्व त्या क्रांत्यातून भाग घेतलेले केवळ जुने लेखक–साहित्यिक नव्हते. त्यात नवीन लेखक, कवीसुद्धा होते. ज्यांचे शिक्षण कम्युनिस्टपूर्व राजवटीत झालेले होते, म्हणजे ज्यांचे मन मुळातच कित्येक पूर्वग्रहांनी दूपित होते असे शिक्षितच त्यात नव्हते, तर कम्युनिस्ट राजवट प्रस्थापित झाल्यानंतर ज्यांचे बौद्धिक व इतर शिक्षण झाले आहे असेही अनेक त्या भ्रमनिरासितात होते. तेव्हा कम्युनिस्ट राजवटींच्या बावतीत भ्रमनिरास होणारात जुने आणि वयस्कर बुद्धिजीवी आणि तसेच नवे आणि तरणेबांड बुद्धिजीवी असा भेद करण्यात अर्थ नसतो. त्यात दोन्हीही प्रकारचे लोक येतात. उदा., पोलंडमधील व्हास्को आणि म्रोझेक, पूर्व जर्मनीतील विएरमन, झेकोस्लोव्हाकियातील कुंडेरा व हावेल



अनुक्रमणिका

आणि इतरही कित्येक नवकवी व नव-लेखक या भ्रमनिरासितात आहेत. स्टॅलिननंतर स्टॅलिनवादाच्या उच्चाटणकाळात क्रांतीच्या तत्त्वज्ञानाविषयीच्या भ्रमनिरासाची परिणती जीवनाविषयीच तुच्छता निर्माण होण्यात होत असे. नेहमीच नव्हे, पण अनेकदा. क्रांतीचे तत्त्वज्ञान स्वीकारणारे स्टॅलिनवादाविषयीच्या भ्रमनिरासामुळे सर्वच बाबतीत भ्रमनिरासित होत. विशेषतः क्रांतीच्या नौबत नगाऱ्यावर जे आघाडीवर असतात पण नव-विचारवान (New think) जे सामील होऊ शकत नाहीत, म्हणजे त्यांच्या धोरणावर ज्यांचा विश्वास बसू शकत नाही त्यांची तर हीच परवड झालेली आढळते. क्रांतीविषयी भ्रमनिरास होणे व जीवनाविषयी तुच्छता निर्माण होणे हा त्यांचा विशेष गुणधर्म आढळतो.

× × × ×

पौर्वात्य[1] आणि पाश्चात्य बुद्धिवाद्यांच्या धारणांना नेहमी समान लेखले जाते. परंतु साम्यापेक्षा त्यांच्यातील भेदच अधिक लक्षणीय आहेत. पौर्वात्य आणि पाश्चात्य बुद्धिवाद्यांच्या धारणा समान मानतात. आपण एक महत्त्वाची गोष्ट नेहमी विसरू पाहतो. ती ही की अनुभवाची वाण कशानेही भरून येत नसते. अनुभव आणि केवळ बौद्धिक अभ्यास या दोन्ही गोष्टी एकच नव्हत. या दोन्ही गोष्टी एकच मानण्याइतकी मोठी गफलत मनुष्याच्या आयुष्यात दुसरी कोठलीही नसेल. क्रांती आणि आदर्श कल्पलोकाचे स्वप्न यांच्या रस्सीखेचीत गवसलेल्या लेखकाला कळून चुकते की संसारात बौद्धिक वेश्यापण किंवा हौतात्म्य यापैकी एकाची निवड करणे भाग आहे. दोन्ही सांभाळता येणार नाहीत. प्रत्यक्ष व्यवहारात क्रांती आली म्हणजे बौद्धिक स्वातंत्र्य आले असे नव्हे. तर नवे राज्यकर्ते जे सांगतील त्याप्रमाणे आपली बुद्धी वापरावयास तयारी दाखविणे अथवा त्यांना विरोध करून हुतात्मा बनणे हे दोनच पर्याय तिथे खुले असतात. प्रत्यक्ष क्रांती अद्याप यावयाची आहे तिथे बौद्धिक पातळीवर असली समस्या नसते. तिथे ही निवडीची समस्याच अद्याप आलेली नसते. जिथे क्रांतिसरकारे प्रस्थापित होतात तिथे ही निवड टाळता येत नसते. नव्हे तिथे ही निवड समोरासमोर सोडवावीच लागते. क्रांतीच्या प्रत्यक्ष व्यवहारात सापडलेल्यांना हे बरोबर जाणवते. क्रांतीत गवसलेल्या अनेकांना जिवंत

---

१. पौर्वात्य हा शब्द या ठिकाणी रशियासंबंधी आहे.



अनुक्रमणिका



राहण्यासाठी अनेक क्लृप्त्या वापराव्या लागतात. कधी मन मारून बौद्धिक तडजोडीस तयार व्हावे लागते. कधी अनेक प्रकारचे वंचक युक्तिवाद लढवावे लागतात. अगदी आत्मवंचनेपासून ते तहत नवभाषा आत्मसात करीपर्यंत अनेक उपद्व्याप जीव वाचविण्यासाठी करावे लागतात. सोल्झेनित्सिनसारखे उघड हौतात्म्य पत्करणारे वीर एकंदरीत विरळाच! या सर्व प्रकरणात खरे आश्चर्य आणि खंत करण्यासारखी गोष्ट ही की हे हौतात्म्य तुलनात्मक दृष्ट्या अगदीच क्षुल्लक हक्कासाठी त्यांना पत्करावे लागत असते. लेखकाला जे भावते ते जसेच्या तसे लिहिण्यासाठी हे हौतात्म्य त्यांना पत्करावे लागत आहे. म्हणजे स्वतःबरोबरची निष्ठा अबाधित राखता यावी, स्वतःच्या भूमिकेशी व धारणांशी प्रामाणिक राहता यावे म्हणुन त्यांना ही वीर्यवृत्ती दाखविणे भाग पडत आहे. वास्तविक लेखनात लेखकाची स्वतःबरोबरची निष्ठा यावी, लेखन खोटे व दांभिक असू नये हा तर उत्तम लेखनाचा मानदंड आहे. परंतु स्वेच्छेने स्वीकारलेल्या आपल्या पेशाचा हा एकमेव मानदंड पुरा करण्यासाठीही त्याला असामान्य, कधीकधी तर अमानुष धैर्य दाखवावे लागते. कारण काय तर विशिष्ट प्रकारच्या मतप्रणालीची घट्ट कातडी बंडी त्यांच्या बुद्धीवर चढवू पाहणाऱ्या व एका विशिष्ट दिशेनेच आपली सर्जनात्मक अभिव्यक्ती तुम्ही वापरावी असा जुलूम करू पाहणाऱ्या शासनालाच त्याना या प्रकरणात आव्हान द्यावयाचे असते.

स्वतःला जे व जसे भावते, ते व तसे सांगता यावे म्हणून, तसे सांगता येण्यावर बंदी असणाऱ्या देशात जीवावर उदार होऊन जेव्हा एखादा लेखक प्रयत्नशील असतो तेव्हा त्याचे शत्रू आणि मित्र त्याच्या लिखाणाविषयी उदासीन राहू शकत नाहीत. त्यांना त्याच्या लिखाणाचा विचार विशेष गांभीर्याने करावाच लागतो. जिथे विचारस्वातंत्र्यावर, विचार व्यक्त करण्यावर अशा प्रकारची बंदी नाही तिथे साहित्यविषयक इतकी सखोल कदर अभिप्रेत नसते. त्याचमुळे की काय पण मेरी मॅकार्थी किंवा ग्रॅहम ग्रीनसारखे लेखक काहीशा मत्सराने म्हणू लागतात की "कम्युनिस्ट देशातील लेखकाच्या साहित्याचा विचार अधिक गंभीरतेने केला जातो." येथे तसा विचार होत नाही. या विचारसरणीत चूक ही आहे की दोन्ही परिस्थितीत जो फरक आहे तोच ते लक्षात घेत नसतात. एकीकडे स्वतंत्र विचारसरणीच्या लेखकाच्या लिखाणाचा विचार अधिक गांभीर्याने केला जातो. कारण स्वतःचे प्रामाणिक अनुभव प्रामाणिकपणे सांगता येण्यावरच तेथे शासकीय बंदी आहे, शासनाची तसे करण्याची परवानगी नसतानाही तो ते धाडस करीत असतो.

ते करण्यासाठी स्वतःचा सुखी जीव त्याला धोक्यात लोटावा लागलेला असतो. दुसरीकडे प्रामाणिक विचारांचे प्रकटन ही एक नैसर्गिक गोष्ट आहे. लेखकांचे स्वातंत्र्यही तेथील एक स्वाभाविक स्थिती आहे.

पूर्व आणि पश्चिमेच्या बुद्धिवाद्यातला फरक खरोखर लक्षणीय असाच आहे. हा फरक त्या दोघांच्या जीवनानुभवातल्या फरकातून निर्माण झालेला आहे. एकाने विशिष्ट अशा जीवनाचा प्रत्यक्ष अनुभव घेतला आहे. तर दुसरा त्याच जीवनाकडे केवळ सैद्धांतिक कल्पनेच्या दृष्टीतून पाहत आहे. उदा., सुसां झोटांग या विद्वान बाईचे क्रांत्युत्तर आयुष्याविषयीचे भाष्य पाहा. या बाईनी क्रांती व क्रांतीनंतरचे जीवन हे सर्व फक्त कल्पनेत पाहिलेले आहे. त्यामुळे क्रांती या कल्पनेविषयी त्यांना अतोनात औत्सुक्य व आदर आहे. येताजाता त्या "क्रांतीच्या वैचित्र्यपूर्ण कल्पनेची" आळवणी करीत असतात. पण ज्यांना क्रांतीत राहावयास भाग पाडले गेले आहे असे अनेक लेखक क्रांतीच्या वैचित्र्यपूर्णतेविषयी तितकेसे उत्साही नसतात. क्रांती ज्यांनी पाहिली नाही पण क्रांतीवर जे लट्टू आहेत आणि ज्यांनी क्रांती अनुभविली आहे नि त्यामुळे जे क्रांतीविषयी अनुत्सुक आहेत अशा दोन्ही प्रकारच्या लेखकांची कितीतरी उदाहरणे देता येतील. परंतु अमेरिकेतील व इतर ठिकाणचेही तथाकथित नवडावे किंवा नव डावेपणाचे प्रतिनिधी आणि चेकोस्लोव्हाकियाची राजधानी प्राग येथील प्राग स्प्रिंग कॉलनीचे प्रतिनिधी यांच्यातील क्रातीच्या विषयासंबंधीच्या वादाइतका दुसरा कोठलाही वाद बौद्धिकदृष्टया अधिक विनोदी (किंवा अनुकंपनीयसुद्धा) असू शकणार नाही. यातील पहिले कल्पनेत राहत असतात. त्यांना क्रांतीच्या फक्त कल्पनेशी कर्तव्य आहे. तर दुसरे क्रांतीचा अनुभव घेऊन असल्याने क्रांतीचा व्यवहारातला चेहरा "मानवी नाही" म्हणून व्यथित आहेत. त्यांना या मानवी चेहऱ्याशी कर्तव्य आहे.

क्रांतीविषयीचा किंवा क्रांतीच्या तत्त्वज्ञानाविषयीचा उत्साह आणि आशावाद दोन ठिकाणी अभंग राहत असतो. जेथे क्रांती झालेली नाही तेथे क्रांतीच्या कर्तृत्वावरील विश्वास अभंग असतो. किंवा क्रांतीचे परिणाम जिथे विसरता येतात अथवा क्रांतीनंतरच्या राजवटीत जे काही घडलेले आहे त्याकडे जेथे सोयीस्कर डोळेझाक करता येण्यासारखी आहे अशाही ठिकाणी हा विश्वास अभंग राहू शकतो. उदा., चेकोस्लोवाकिया देशात किंवा पोलंड-सारख्या देशात, की जेथील लोकांनी क्रांतीच्या प्रत्यक्ष व्यवहाराचा मासला पाहिला आहे, तेथे क्रांतीच्या कर्तृत्वाच्या कल्पितावर विश्वास ठेवता येणे सोपे



अनुक्रमणिका

नसते. परंतु स्टॅनफर्ड युनिव्हर्सिटीच्या परिसरासारखा परिसर, की जेथील रहिवाश्यास क्रांतीच्या वहिवाटीचा उपद्रव पोचलेला नाही व क्रांत्युत्तर राजवटीत काय घडते हे चक्षुर्वे जिथे पाहिले गेलेले नाही, तिथे क्रांतीच्या वैभवाचे कल्पित सहज टिकून राहू शकते. तात्पर्य स्टॅनफर्डसारख्या ठिकाणच्या क्रांतिभक्तांची अथवा क्रांतीच्या सच्च्या अनुयायांची संख्या चेकोस्लोवाकिया किंवा पोलंडसारख्या देशातील भक्तांपेक्षा वा सच्च्या अनुयायांपेक्षा नेहमीच कितीतरी परींनी अधिक असते.

× × × ×

क्रांतीचा प्रत्यक्ष अनुभव ज्यांना नाही, क्रांत्युत्तर सरकारे आपापल्या नागरिकांशी कशी वागतात याची ज्यांना माहिती नाही किंवा माहिती असल्यास ती उडवून लावण्याइतकी ज्यांच्या मनाची तयारी आहे, ते लोक क्रांतीच्या कल्पितावर प्रेम व विश्वास दाखवू शकतात ही गोष्ट बरोबर आहे. परंतु तरीही इतक्या दीर्घकालपर्यंत क्रांतीची कल्पना चालू राहावी ही देखिल एक विचार करण्यासारखीच बाब आहे. इतक्या दीर्घकाळपर्यंत या कल्पनेने स्वतःचे आकर्षण टिकवून ठेवावे ही आश्चर्याचीही बाब आहे. ऐतिहासिक वस्तुस्थितीच्या स्पष्टीकरणाचे अनेक मार्ग आहेत. उदा., हेगेल किंवा मार्क्स किंवा माओ वा मारक्यूज यासारख्या तत्त्ववेत्त्यांनी सूचित केलेल्या सिद्धांतांच्या आधारे ऐतिहासिक वस्तुस्थितीचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न नेहमी होत असतो. त्या वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण अशा प्रकारच्या " ऐतिहासिक कायद्यांच्या " तत्त्वातून मिळविले जाते. परंतु ही पद्धती या ठिकाणी उपयोगी पडत नाही. कारण " इतिहासाच्या कायद्यांच्या " मदतीने क्रांतीच्या कल्पिताचे इतिहासातील असंख्य चढउतार नि अगणित कायाकल्प समजून येऊ शकत नाहीत. मग हे कायदे मार्क्सप्रणीत असोत, हेगेलप्रणीत असोत अथवा लेनिन किंवा माओ किंवा मारक्यूज यांच्यापैकी कोणीही लिहिलेले असोत. आत्मबोध घेण्याकरिता चेतनाने घडविलेली स्वतःची अभिव्यक्ती म्हणजे इतिहासाची प्रक्रिया हे हेगेलचे प्रमेय घ्या किंवा याच धर्तीची मार्क्स, लेनिन, माओ, मारक्यूज यांची प्रमेये घ्या, क्रांतीची कल्पना अबाधितपणे इतका दीर्घकाळपर्यंत टिकून आहे ती का याचा काही ती उलगडा करू शकत नाहीत. कित्येक धर्मविषयक आणि देवदेवतांविषयीच्या धारणा यांचे जसे स्पष्टीकरण मार्क्सप्रणीत ऐतिहासिक भौतिकवादाच्या सूत्राने गवसत नाही तशाच प्रकारे क्रांतीच्या तत्त्वाच्या अबाधितपणाचीही कारण-

मीमांसा त्यातून गवसत नाही. आयुष्याचे स्पष्टीकरणही " ऐतिहासिक भौतिकवादाने " मिळत नाही.

सामाजिक क्रांती ही कल्पना मानवी इतिहासात प्रथम सोळाव्या शतकामध्ये वापरात आली. ग्रहगोलांच्या चक्राकार गतीच्या नमुन्यावर सामाजिक चळवळींच्या हालचालींचे गणित बसविण्याच्या प्रयत्नात या कल्पनेचा जन्म आहे. Revolution हा शब्दच मुळी खगोलशास्त्रावरच्या कोपर्निकसच्या प्रबंधावरून घेतला गेला आहे. ग्रहगोलांच्या हालचालीसंबंधाचा जो प्रबंध कोपर्निकसने लिहिला होता त्याचे शीर्षक De Revolutionibus Orbium Caelestium हे होते. ग्रहगोल नेहमी चक्राकार गतीने फिरत असतात. तेव्हा पुन्हा पुन्हा ते समान अवस्थेतून जात असतात. या नैसर्गिक स्थितीच्या अवलोकनावरून सामाजिक स्थितीतही अशीच चक्राकार स्थित्यंतरे होत असली पाहिजेत असा एक तर्क साहजिकच मांडला गेला. ग्रहगोलांच्या चक्राकार गतीची उपमा सामाजिक उलथापालथीस लावण्यातून Revolution ची कल्पना आकारास आली आहे. मांतेन्य या फ्रेंच तत्त्ववेत्त्याने नेमक्या याच अर्थाने हा शब्द पूर्वी वापरलेला होता. परंतु Revolution म्हणजे राज्यक्रांती हा या शब्दाचा अर्थ क्रॉम्वेलकृत ब्रिटिश राज्यक्रांतीनंतर त्या शब्दाला आला आहे. क्रॉम्वेलची राज्यक्रांती ही Glorious अथवा दैवी Revolution होती. क्रॉम्वेलच्या काळातसुद्धा लोकांच्या राजकीय आशाआकांक्षा आणि हेतू धार्मिक परिभाषेत व्यक्त करण्याची वहिवाट असे. क्रॉम्वेलच्या सैनिकांनी एका हातात बायबलची प्रत घेऊन कूच केलेले होते. क्रॉम्वेलच्या प्युरिटन क्रांतीच्या काळातील Fifth Monarchy हा पंथ आध्यात्मशास्त्राच्या परिभाषेतच राजकीय–सामाजिक प्रश्नांबाबत वाद चालवीत असे. Fifth Monarchy वाल्या मंडळींचे लक्ष्य ऐहिक सुखसमृद्धीच्या राज्याचे अवतरण हे नसून डॅनिएलच्या प्रारंभिक प्रतिख्रिस्ती युगानंतर येऊ घातलेले ख्रिस्तयुग हे होते. तात्पर्य त्यांची आदर्श राज्यव्यवस्थेची कल्पना राजकीय तत्त्वांवर बेतलेली नव्हती. ती आध्यात्मिक व धार्मिक तत्त्वांवर बेतलेली होती. क्रांतीनंतर येणार असणारे राज्य हे परमेश्वरी राज्य होते. मनुष्याचे राज्य नव्हे. त्या राज्याचा रंग पारलौकिक होता. ऐहिक नव्हे. मुळात धार्मिक–आध्यात्मिक स्वरूपात असणारी ही कल्पना लौकिक किंवा धर्मनिरपेक्ष बनली ती क्रॉम्वेलची क्रांती आणि फ्रेंच राज्यक्रांती या दोन राजकीय उलथापालथींच्या दरम्यान. या दोन क्रांत्यांच्या दरम्याने मूळात धर्मस्वरूपाची असणारी ही क्रांती व तदनंतरच्या आदर्श कल्पलोकाच्या प्रस्थापनेची कल्पना

धर्मातीत बनली. या काळात तत्पूर्वीच्या काळातील देवाच्या नगरीचे शोधाचे (सेंट आगुष्टीन The City of God) किंवा **'नव्या जरुसलेमच्या'** शोधाचे रूपांतर **मानवाच्या नगरीच्या** शोधात झाले. क्रांतीच्या कल्पनेमध्ये ही जी सामाजिक स्वरूपाची स्थित्यंतरे घडून आली त्यानाच उद्देशून Melvin J. Lasky हा लेखक "Revolutionची संकल्पना खगोलशास्त्राच्या विषयाकडून सामाजिक विषयांकडे सरकली आणि आदर्श रामराज्याची वा कल्पलोकाची कल्पना पारलौकिक व देवदेवतांविषयाकडून राज्यविषयाकडे सरकली" असे लिहितो. एकोणिसाव्या शतकामध्ये क्रांतीच्या कल्पनेमध्ये आणखी कित्येक स्थित्यंतरे घडून आली. आता क्रांतीच्या कल्पनेचा संबंध ऐतिहासिक परिवर्तनांच्या घडामोडींशी जोडला जाऊ लागला. (दुसऱ्या शब्दात हीच गोष्ट मांडायची तर अशी मांडता येईल की एकोणिसाव्या शतकामध्ये इतिहासाच्या घटनेने परमेश्वराचे स्थान घेतले.) क्रांत्यांच्या परिवर्तनाची कल्पना ऐतिहासिक परिवर्तनाच्या कल्पनेशी जोडली गेली म्हणजे ऐतिहासिक परिवर्तने म्हणजे क्रांती असे मानले जाऊ लागले. उदा., व्हिको नावाचा इतिहासाचा तत्त्वज्ञ असे प्रतिपादन करतो की, "ऐतिहासिक घडामोडींच्या मागे परमेश्वरी योजना कार्य करीत असते." हेगेल हा इतिहासाचा दुसरा तत्त्वज्ञ म्हणतो की "इतिहास म्हणजे दुसरे काही नसून ते सुप्त अशा चेतनतत्त्वाचे (स्वसंवेद्यतेचे) कलेकलेने होत असलेले प्रकटीकरण आहे." हेगेलच्या मताप्रमाणे "इतिहासाचा प्रश्न संवेद्यतेचा प्रश्न असतो." मार्क्सदेखिल याच इतिहासाच्या प्रश्नाला महत्त्व देतो. मार्क्सच्या मताप्रमाणे क्रांती (किंवा ऐतिहासिक परिवर्तनाची प्रक्रिया) ही एक "नैसर्गिक अशी प्रक्रिया असून ती अपरिहार्य व अबाधित अशा कायद्यांना अनुसरून घडत असते." व्हिकोच्या तत्त्वज्ञानामध्ये इतिहासाची प्रक्रिया चक्राकार घडते असे होते. इतिहासविषयीच्या किंवा ऐतिहासिक परिवर्तनांच्या जुन्या दृष्टिकोनात या बाबतीत त्याने कसलाही बदल केला नव्हता. मॉंतेन्य वगैरे तत्त्ववेत्त्यांचीच सामाजिक स्थित्यंतरे चक्राकार पद्धतीने घडतात हे मत त्याने आपल्या तत्त्वज्ञानात कायम राखले होते. हेगेल या मतामध्ये बदल करतो. हेगेल इतिहासाची गती प्रगतीशील मानतो. त्याच्या मताप्रमाणे इतिहास हा ऊर्ध्वगामी रेषेप्रमाणे वरवर किंवा पुढे–पुढे जात आहे. हे सारे विश्व म्हणजे अप्रकट स्वरूपातील चेतनाचे किंवा बोध वा जाणिवेचे तत्त्व असून, कलेकलेने ते तत्त्व उलगडत जात असून ही क्रिया पुढेपुढे जाणाऱ्या रेषेसारखी घडत आहे. चेतन एका स्तरावर सूक्ष्म आणि सुप्त आहे. पण पूर्व स्वसंवेद्य होणे ही त्याची ऊर्मी आहे.



अनुक्रमणिका

चेतनाच्या पोटात संस्कृती, कायदा, वाङ्मय, तत्त्वज्ञान इत्यादि विविध अंगे सुप्त रूपाने वसत आहेत. ही अंगे क्रमाक्रमाने बाहेर फेकली जाणार असतात, म्हणजे प्रकट रूपास येणार असतात. ती प्रकट झाली की चेतनाला तितक्या प्रमाणातील स्वसंवेद्यता प्राप्त होणार असते. चेतनाची एकमेव ऊर्मी संपूर्ण स्वसंवेद्यताप्राप्ती ही असल्याने चेतनाची सर्व अप्रकट अंगे प्रकट होईस्तवर ही प्रक्रिया चालूच राहणार असते. ही अंगे प्रकट होण्याची प्रक्रिया विरोध-विकासात्मक किंवा वादप्रतिवादात्मक स्वरूपाची आहे. म्हणजे प्रथम चेतनाचे एक अप्रकट अंग प्रकट होणार असते. हे अंग प्रकट झाले की त्याला छेद देण्यासाठी नेमकी त्याची विरूद्ध बाजू दर्शविणारे अंग प्रकट होते. काही काळ-पर्यंत या दोन अंगात वाद-प्रतिवादात्मक संघर्ष होतो. एक अंग दुसऱ्याला खाऊन टाकण्यासाठी झगडते. यातून वाद-प्रतिवादातील काही अंशाचा निचरा होऊन शिल्लक अंगांचा समन्वय अधिक उच्च पातळीवर प्रकट होतो. भाव-अभाव-समन्वय अशी ही उर्ध्वगामी प्रगती आहे. मार्क्सच्या तत्त्वज्ञानातसुद्धा इतिहास ही वाद-प्रतिवादात्मक प्रक्रिया आहे हे तत्त्व कायम आहे. हेगेल आणि मार्क्स यांच्या दृष्टिकोनात फरक इतकाच की मार्क्सने हेगेलला त्याच्याच डोक्यावर उभे केले आहे. म्हणजे असे की हेगेलच्या इतिहासाच्या तत्त्वज्ञाना-तील मध्यवर्ती कोटी 'चेतन' ही आहे. चेतन ही काहीशी अध्यात्मवाद्यांच्या व गूढवाद्यांच्या जुन्या परमेश्वरी कोटीसारखी कोटी आहे. मार्क्स वादप्रतिवादात्मक पद्धतीने होणारे ऐतिहासिक परिवर्तन चेतनासारख्या गूढ आणि अज्ञात कोटीचे परिवर्तन न मानता, मानवासारख्या किंवा मानवजातीसारख्या ज्ञात आणि वस्तुनिष्ठ कोटीचे परिवर्तन समजतो. हेगेल ज्याला चेतन समजतो आणि ज्या ऐतिहासिक प्रक्रियेला विरोधविकासातून होणारी चेतनाची प्रगती म्हणतो त्यालाच मार्क्स विरोधविकासातून होणारी मानवजातीची प्रगती समजतो. तात्पर्य हेगेलच्या चेतनाच्या प्राथमिक कोटीच्या जागी मार्क्स मानवाच्या प्राथमिक कोटीची स्थापना करतो हेच हेगेलला त्याच्याच डोक्यावर उभे करणे. असो.

इतिहासाकडे पाहण्याच्या मनुष्याच्या दृष्टिकोनात मार्क्सने आमूलाग्र क्रांती घडवून आणली असा एंगल्स या मार्क्सच्या सहकाऱ्याचा दावा आहे. मार्क्सच्या अन्तेष्टीप्रसंगी एंगल्सने जे भाषण केले त्यात तो म्हणतो की डार्विनने जीवशास्त्रासाठी जे केले ते मार्क्सने इतिहासशास्त्रात केले आहे. एंगल्सच्या म्हणण्याचा भावार्थ असा की मनुष्याची उत्क्रांती एकपेशी जीवाणूपासून झाली आहे असे दाखवून डार्विनने जशी जीवशास्त्रीय ज्ञानात क्रांती घडवून आणली होती, तशीच क्रांती मनुष्याचा इतिहास म्हणजे अर्थप्राप्तीसाठी मनुष्यजातीने

जे प्रयत्न केले होते त्या प्रयत्नात विरोधविकासाच्या पद्धतीने घडत गेलेल्या स्थित्यंतराचा आलेख, असे सांगून मार्क्सने केली आहे. एंगल्सच्या म्हणण्याचे तात्पर्य हे की इतिहासाच्या दृष्टिकोनात मार्क्सने आमूलाग्र नवी दृष्टी आणली आहे. जीवशास्त्रामध्ये डार्विनने जी भर टाकली तिचे आधुनिक दृष्टीने काय महत्त्व असेल ते असो; पण मार्क्सच्या तत्त्वज्ञानातील मुळातल्या वैचारिक गाठोड्याला टाकून द्यावे लागले आहे यात मुळीच शंका नाही. उदा., मार्क्सवादाच्या मूळ तर्जुम्यात कमालीचे आकृतीवदल आणि कायापालट घडून आल्याचे दिसून येते. हे सगळे तात्त्विक कायापालट आणि आकृतीवदल जर विचारात घेतले, तर जगात या तात्त्विक विचारांचा एवढ्या मोठ्या प्रमाणावरील प्रसार व्हावा आणि क्रांतीला स्फूर्ती देणारे तत्त्वज्ञान म्हणून त्या तत्त्वज्ञानाला सतत एवढा मोठा भाव असावा ही गोष्ट कळूच शकत नाही. कारण या तत्त्वज्ञानात तर्कशास्त्राचे फार मोठे गुणधर्म आहेत असे नाही. किंवा. निश्चित काही मिळवून देण्याची शक्ती त्याच्या अंगी आहे असेही नाही. मग या प्रकारची neuristic शक्ती या तत्त्वज्ञानाच्या अंगी नसतानाही या तत्त्वज्ञानाचा इतिहास एवढा ऐतिहासिक प्रसार व्हावा आणि क्रांतीचा धर्म म्हणून सातत्याने मनुष्ये त्याकडे आकर्षित होत राहावीत ते का ? मला वाटते की कल्पिताला चालना देण्याच्या त्याच्या शक्तीत हे आकर्षण अंतर्भूत असावे. मार्क्सच्या तत्त्वज्ञानामुळे मनुष्यामध्ये कल्पित निर्माण करण्याची जी एक उपजत प्रवृत्ती आहे त्या प्रवृत्तीला चालना मिळत असली पाहिजे. व त्या प्रवृत्तीमुळे या तत्त्वज्ञानाचा एवढा प्रसार होत राहिला असावा आणि त्याने पिढ्यानपिढ्या लोकांची मने क्रांतीसाठी भारली असावीत. मनुष्य हा स्वभावतःच कवी आहे. त्याला मिथस् किंवा कल्पिते रचणे मनापासून आवडते. कल्पिते रचण्याची आवड त्याच्या अंगी जन्मतःच आलेली आहे. त्यामुळे उत्तेजक अशी कल्पनाचित्रे रचल्यावाचून आणि स्वतःच रचलेल्या त्या कल्पितांनी भारून जाण्यावाचून व त्यानुसार कृती केल्यावाचून त्याला जवळजवळ राहवतच नाही. कल्पिते रचण्याची प्रेरणा त्याच्या अंगी उपजतच असावी; एवढेच नव्हे तर मानवजातीच्या वाल्यावस्थेपासून ही प्रवृत्ती त्याच्या ठायी वसत असावी. या शक्तीला यत्किंचितही चालना मिळू शकली तरी मानवजात त्या चालनेवरोवर वाहत असावी. कारण कल्पितरचनाचे कार्य मनाच्या अवोध स्तरावर घडत असावे. मार्क्सच्या एकूण तत्त्वव्यूहामध्येच असे काही अज्ञात विशेष असावेत की जे मानवजातीच्या अंगी असणाऱ्या कल्पित-रचनाच्या शक्तीला उत्तेजित करू शकत असावेत. जर तसे नसते तर इतका दीर्घ काळपर्यंत या तत्त्वज्ञानाने मनुष्याच्या पिढ्यांना मोहिनी घातली नसती,



अनुक्रमणिका

सुरुवातीला उत्पादनशक्तींमधील विकासामुळे निर्माण होणाऱ्या सामा-जिक परिवर्तनांचे भाकित सांगणारे ते तत्त्वज्ञान होते. सुरुवातीच्या मार्क्स-वादात असे सांगितले जात असे की उत्पादनशक्तींमध्ये प्रगती होऊन त्या विकासाच्या एका विशिष्ट पातळीला पोचल्या की पुढील प्रगतीसाठी विशिष्ट अशी सामाजिक परिस्थिती निर्माण होणे आवश्यक होऊन बसते. जोवर ही सामाजिक परिस्थिती निर्माण होत नाही तोवर त्या शक्तीही विकासाचा पुढील टप्पा गाठू शकत नाहीत. मार्क्सच्या या प्रतिपादनाचा गर्भित अर्थ असा की ज्या देशात औद्योगिक विकासाने विशिष्ट इतकी पातळी गाठली आहे तेथेच सामाजिक व राजकीय क्रांतीची शक्यता असू शकेल. परंतु क्रांतीच्या घडामोडीचा हा मार्क्सवादी कायदा जगात खरा होण्याऐवजी खोटाच अधिक झाल्याचे दिसते. श्रमिक क्रांती करणार आहेत, कारण श्रमिकांनी क्रांती करून उत्पादन शक्तींवर आलेले "भांडवलशाहीचे कवच" फोडुन टाकल्यावाचून उत्पादनशक्तींचा अधिक विकास होणार नव्हता आणि उत्पादनावरील हे बंध मार्क्सवादामुळे तटातट तुटणार होते. हा मार्क्सचा प्रबंध जिथे उत्पादनाचा विकास झाला होता त्या देशात खरा न होता, उत्पादन जिथे मागासलेले होते तिथे खरा झाला आहे. थोडक्यात मार्क्स-वादाची वाढ मार्क्सवादाच्या मूलभूत प्रमेयाशी विसंगत प्रकारे झालेली आहे. मार्क्सवादापासून सुरुवात झालेल्या व मार्क्सवाद्यांच्या अनेक पिढ्या ज्यावर पोसल्या होत्या, ज्यांना मार्क्सवाद्यांच्या अनेक पिढ्यांनी मोठ्या प्रेमाने व आशेने स्वतःच्या हृदयाशी कवटाळून धरले होते, त्या सामाजिक व राजकीय अपेक्षा नि आशा पाश्चात्य औद्योगिक देशांच्या इतिहासाने खऱ्या न ठरविता खोट्या ठरविल्या. रशियामध्ये तर लेनिनने मार्क्सवादात संपूर्णच फिर-वाफिरव केलेली आहे. रशियामध्ये मार्क्सवादात समूहवादी इच्छाशक्तिवादी पालट लेनिनने घडवून आणला. मूळ कर्मठ मार्क्सवादात इच्छाशक्तीच्या तत्त्वाला वाव नव्हता. तिथे आर्थिक-सामाजिक प्रगती ही नेहमी आर्थिक विकासांच्या टप्प्याटप्प्याच्या अनुक्रमाने घडायची असते. तिथे इच्छा-शक्तीला कार्य नाही. कारण इच्छाशक्ती या अनुक्रमात काहीच बदल करू शकणार नसते. तेव्हा मार्क्सवादात आर्थिक विकासाचे हे निश्चित टप्पे आहेत नि ते गाळता येत नाहीत. लेनिन हा पहिला बुद्धिवादी की, मार्क्स-वादातल्या कर्मठ प्रबंधापासून ज्याने पहिली क्रांतिकारी उडी बाजूला घेतली. मार्क्सप्रणीत विकासाच्या अवस्था रशियात प्रत्यक्षात येण्याची त्याने मुळी वाटच पाहिली नाही. कट्टर मार्क्सवादी सूत्रांची कदर न करताना प्रारंभीच

त्याने शेवटची, सत्तेची सूत्रे हाती घेण्याची अवस्था गाठली होती. मार्क्स-वादापासून दूर जाणारे हे पहिले पाऊल व मार्क्सवादात फिरवाफिरव करणारा लेनिन हा पहिला असामी. १९१७ पासून या प्रकारच्या उडयांची संख्या आणि क्षेत्र वाढतेच आहे. मार्क्सवादाला छेद देणाऱ्या व मार्क्सवादा-पासून दूर जाणाऱ्या अनेक उडया एव्हाना घेतल्या गेल्या आहेत. मार्क्सच्या हयातीत मार्क्सप्रणीत प्रबंधांविषयी वाद होत असत. परंतु त्याचे स्वरूप पंडिती असे. उदा., तेव्हाच्या वादातला वादग्रस्त प्रश्न कोठल्या देशात सर्वात आधी क्रांती होणार आहे ? अमक्या देशात ती होणार आहे काय ? इत्यादि विद्वत्ताप्रचुर वाद तेव्हा होत असत. आता असल्या चर्चा कायमच्या बंद झाल्या आहेत. आता कोठला देश क्रांतीसाठी पक्व झाला आहे व कोठला नाही या जातीच्या प्रश्नात कोणालाही रस नसतो. आजकाल कोठलाही देश, मग औद्योगिक प्रगतीच्या बाबतीत तो कितीही अपरिपक्व असो. साम्यवादी क्रांती करणारासाठी सारेच काळ सारखेच लायक असतात. निदान साम्यवादी क्रांतीच्या पाठिराख्यांचे आजच्या दिवसाचे हे आवडते सूत्र आहे. पूर्वी म्हणजे मार्क्स वगैरेंच्या काळात क्रांती होण्यासाठी किमान विशिष्ट आर्थिक स्थितीची अट पुरी होणे आवश्यक असे. आता तसल्या अटी उरलेल्या नाहीत. कोठलाही समाज आणि कोठलाही क्षण क्रांतीसाठी परिपक्व समाज व काळ असू शकतो. आजच्या सैद्धांतिक भूमिकेप्रमाणे कसल्याही सामाजिक गर्भात ‘ क्रांतीचे गर्भधारण ’ होऊ शकते. सारांश – आजची ताजी खबर. मंगोलियातील भटक्या जमातींच्या प्रजासत्ताक राजवटीपासून ते तहत टोळीवाल्या कांगो जनप्रजासत्ताक राजवटीपर्यंत सर्व प्रकारच्या राज्यव्यव-स्थामध्ये मार्क्सवादी क्रांती घडून यावयाची असते. – स्टॅलिनच्या कारकीर्दीत तर मार्क्सवाद या शब्दाचा अर्थच पार बदलून टाकण्यात आला. स्टॅलिन राजवटीने मार्क्सवाद म्हणजे आर्थिक विकासाच्या टप्प्यांचा आणि त्यातून घडणाऱ्या सामाजिक–राजकीय स्थित्यंतराचा कायदा हा मार्क्सवादाचा मूळ अर्थ टाकून दिला आणि औद्योगिक विकास व अर्थकारण यांच्या बाबतीत मागासलेल्या अर्थव्यवस्थांचे सक्तीचे औद्योगिकरण असा नवा सुधारित अर्थ रूढ केला. अर्थात सांप्रदायिक मार्क्सवादामध्ये या सुधारणा बसू शकत नसतात म्हणा. पण त्याचे काय ?

प्रारंभी मार्क्सवादाचे स्वरूप बुद्धिनिष्ठ आणि वैचारिक होते. पण जसजसा काळ उलटत गेला आणि नव-मार्क्सवादाचा प्रचार, प्रसार नि प्रभाव वाढला तसतशी मार्क्सवादातील बुद्धिनिष्ठा आणि वैचारिकता लोप पावू



अनुक्रमणिका



लागली. तेही ठीकच होते म्हणा. प्रत्येक देशाची सामाजिक-आर्थिक परिस्थिती वेगळी. त्या परिस्थितीशी जमेल अशा प्रकारचे बदल मूळ संहितेत केल्याविना या ठिकाणी गत्यंतरच नव्हते. एवंच वदल घडत होते. स्थानिक गरजांनुसार मार्क्सवादाच्या मूळ तत्त्वज्ञानात भर पडत होती. काटछाट होत होती. युक्ति-वादाला वळण दिले जात होते. परिणामी मूळ एका मार्क्सवादाचे रशियन मार्क्सवाद, चिनी मार्क्सवाद, लॅटिन-अमेरिका मार्क्सवाद असे नाना प्रकार तयार होत गेले. थोडक्यात मार्क्सवादाचा धर्म देशोदेशी पसरत होता. पण त्याजबरोबर त्याचे स्थानिकीकरण घडत होते. रशियात त्याचे रशियीकरण झाले. चीनमध्ये चिनीकरण आणि लॅटिन-अमेरिकेत लॅटिनीकरण. मूळ मार्क्सवादाच्या देशकालपरिस्थितीनुसार नाना परी घडल्या. पण याचा परिणाम मार्क्सवादातील सिद्धांतांच्या बाबतीत काय घडत होता ? तर मार्क्सवादात जी गर्भित बौद्धिक सूत्रे होती ती हळूहळू संपुष्टात येत होती. त्यात जी तात्त्विक सुसूत्रता व एकात्मता होती ती खतम् होत होती. तेव्हा शेवटी मार्क्सवादाची अवस्था इतर धर्मपंथांच्या अवस्थेसारखीच झालेली आहे. धर्मपंथात कालांतराने ज्याप्रमाणे असंख्य उपपंथ निर्माण होतात आणि प्रत्येक उपपंथ ज्याप्रमाणे स्वतःलाच एकमेव मूळ व सनातन पंथ म्हणवून घेऊ लागतो त्याप्रमाणे मार्क्स-वादातही अनेक पंथोपपंथ निर्माण झाले नि प्रत्येक पंथ स्वतःला मार्क्सवादाच्या मूळ संहितेचा रक्षक समजू लागला. स्वतःला एकमेव सार्वभौम पंथ मानू लागला आणि सत्य व सनातन म्हणवू लागला.

आपल्याला म्हणजे आपल्या मताला व प्रतिपादनाला सोयीस्कर वाटतील ते मार्क्सवादातील परिच्छेद घेऊन मार्क्सच्या वैचारिक दृष्टिकोनाचा विपर्यास करण्याचे हे प्रकरण आता अगदी हास्यास्पद अवस्थेला पोचले आहे. कोणीही उठतो व मार्क्सच्या अफाट लिखाणापैकी थोडे इकडचे थोडे तिकडचे परिच्छेद उधृत करून " पाहा, जे मी म्हणत आहे तेच मार्क्सनेही सांगितले आहे ' असा ओरडा सुरू करतो. आता चीनचेच उदाहरण पाहाना. चीनच्या लिऊ-शाओ-ची याने मार्क्सवादाचे प्रतिपादन करताना मार्क्सवादाशी सुसंगत असे काही एक प्रमेय पुढे केलेले असते. पण चीनच्या अधिकृत राजवटीस ते मानवण्या-सारखे नसते. झाले, सरकारी माओ-पत्रे लिऊ-शाओ-चीच्या विरुद्ध उठली. त्यांनी लगेच सांगून टाकले की लिऊ-शाओ-ची याचे मार्क्सच्या सिद्धांताविषयीचे प्रतिपादन हा साक्षात मार्क्सवादावरच घाला आहे. हे प्रतिपादन म्हणजे मार्क्स-वादाविरुद्धचे मोठेच गहजब आहे. आता पाहा. माओ-पत्रांचे म्हणणे होते की " लिऊ-शाओ-ची याने प्रतिपादिलेली उत्पादनशक्तींच्या कार्यांविषयीची

उपपत्ती संपूर्णतः प्रतिगामी आहे . . " या उपपत्तीप्रमाणे सामाजिक विकास हा प्रामुख्याने उत्पादक-शक्तींच्या विकासावर, विशेषतः उत्पादन साधनातील विकासावर व सुधारणांवर अवलंबून असतो. आता माओवाद्यांच्या लिऊ-शाओ-चीच्या वरच्या टीकेला काय म्हणायचे ? लिओ-शाओ-चीने दिलेला मार्क्सवादाचा अर्थ मार्क्सवादाप्रमाणेच होता. अगदी मार्क्सवादाच्या अधिकृत संहितेला धरून होता. पण माओ–पत्रांना त्याचे काय ? त्यांनी लिऊ-शाओ-चीला वेकाम ठरविला. मार्क्सच्या सिद्धांतांची मार्क्सवाद्यांकडून ही जी ओढाताण चालू आहे त्यामुळे उद्या कदाचित खुद्द मार्क्स जर माओच्या चीनमध्ये गेला आणि आपल्या तत्त्वज्ञानाचे विवेचन वगैरे करू लागला तर त्याला देखिल खोटे ठरविण्यात येईल नि त्याच्यावर मोठा अनवस्था प्रसंग गुदरेल !

चीन म्हणजे अतिपूर्व... या अतिपूर्वेकडून अमेरिकेच्या अतिपश्चिमेकडे ( wild west ) आले तरी तिथेही मार्क्सवादाचे पुनरुज्जीवन होत असलेले आढळून मन चकित होण्याची पाळी येते. वास्तविक हा पराकोटीच्या औद्योगीकरणाचा भाग. आणि वर आपण पाहिले की मार्क्सवादाचा प्रभाव औद्योगिकदृष्ट्या अप्रगत व शेती वगैरे मागास उद्योगांच्या राष्ट्रातून अधिक आहे. तेव्हा औद्योगिकदृष्ट्या चढत्या कमानीच्या या ' हाणामारी देशात ' मार्क्सवाद न यावा. पण नाही. येथेही मार्क्सवादाला नवा भाव आहे. मात्र प्रगत औद्योगिक देशातल्या या मार्क्सवादाचा संबंध मार्क्सच्या तत्त्वज्ञानातील प्रमेयांशी व सिद्धांतांशी काडीमात्र नाही. जेथे औद्योगीकरण पराकोटीला पोचले असून जेथे भांडवलदारांकडून श्रमजीवीवर्गाची पिळणूक व लुबाडणूक होते, तेथे मार्क्सवादाचा उदय होतो हे जरी मार्क्सच्या तत्त्वज्ञानातील गृहीत असले, तरी अतिरिक्त औद्योगिकरणाच्या या देशात घडून आलेल्या या मार्क्सवादी पुनरुज्जीवनाशी मूळ मार्क्सवादाचा काही संबंध असलाच तर तो आडमार्गाचा आहे. सरळ मार्गाचा नाही. येथील मार्क्सवाद जीव धरवून ठेवण्यात आला आहे तो हेगेलवादाच्या ताकदीच्या औषधांच्या सुया अंगात टोचल्यामुळे ! या सुया जर अंगात टोचल्या गेल्या नसत्या तर अमेरिकी मार्क्सवादाने केव्हाच राम म्हटला असता. हे वैद्यराज आहेत हर्बर्ट मारक्यूज ! त्यानी म्हणवून ठेविले आहे की मार्क्सवाद हे " सामाजिक टीकेचे हत्यार " आहे. पश्चिमेतला मार्क्सवाद हा अशा प्रकारे अर्थ–समाजकारणाचा प्रबंध म्हणून जिवंत नसून " समाजाच्या दोषांची चिकित्सा करणारी एक विवेचक पद्धती " म्हणून जिवंत आहे. पश्चिम देशात ( म्हणजे अमेरिका खंडात ) मार्क्स–



अनुक्रमणिका

वादाला पुन्हा जिवंत करणारे मारक्यूज हे भिषकराज केवळ हेगेलपर्यंतच मागे जाऊन थांबलेले नाहीत तर ते थेट फ्रान्सच्या रूसोपर्यंत पोचले आहेत. इतकी लांब मागे उडी कशासाठी ? तर जे मार्क्स म्हणतो ते नवे सत्य नसून ते सनातन सत्य आहे हे सर्वत्र मंडळींस पटवून देण्यासाठी. उदा., Eros and Civilization नावाच्या आपल्या एका ग्रंथात हे मारक्यूज लिहितात की प्लेटोपासून रूसोपर्यंत (मानवजातीच्या सामाजिक दुःखांवर फक्त) एक उत्तर सुचविण्यात आले आहे. ते हे की मानवजातीचे भले काय याचे ज्ञान आले आहे अशी ज्यांच्याविषयी सर्वसामान्य समजूत आहे, अशा लोकांच्या हाती सर्वंकष सत्ता सुपूर्द होणे व शिक्षक जसे विद्यार्थ्यांच्या हिताची काळजी घेऊन त्याप्रमाणे आपले शिक्षकी कर्तव्य बजावितात तशा प्रकारे त्यांनी ती राबविणे. एका शब्दात शिक्षकी थाटाची हुकूमशाही हे या सर्व सामाजिक दुःखांवरचे उत्तर आहे. दुर्दैवाने प्लेटोपासून रूसोपर्यंत सतत सूचित होत गेलेले हे उत्तर जगाकडून विसरले गेले आहे. काय आश्चर्य पाहा ! आमच्या या तत्ववेत्त्या मंडळींना इतर सर्वांपेक्षा नेहमीच अधिक कळत आले आहे. म्हणजे अखिल मानवजातीसाठी अधिक चांगले काय हे कळत आले आहे. आमचे हे लुकाक्स, आमचे हे ब्रेख्ट, आमचे हे मारक्यूज. या मंडळींना या पूर्वनिश्चित इतिहास–फलिताच्या धर्मातील जाणकारांना, या हेगेलवादी ज्ञानमहात्म्यांना, ऐतिहासिक प्रक्रियांच्या कायद्यांच्या या मार्क्सवादी ज्ञानविदांना मानवजाती–साठी सर्वात चांगल्या गोष्टी कोणत्या याचे ज्ञान इतर कोणाहीपेक्षा अधिक आहे पण मानवजातीसाठी चांगले काय याचे ज्ञान जरी याना असले तरी त्या चांगल्याची व्याख्या यांनी केलेली नसते. ती व्याख्या कोणी एक लेनिन, किंवा स्टॅलिन किंवा माओ, यांना देतो. तेव्हा आमच्या या ज्ञानविदांच्या ज्ञानाचा मानवजातीसाठी उपयोग काय ? त्यांच्या ज्ञानाचे नियंत्रण आणि मार्गदर्शन करणार कुणी दुसराच ! हा दुसरा मानवजातीसाठी चांगले काय याची व्याख्या करणार ! आमचे लुकाक्स, आमचे ब्रेख्ट किंवा आमचे मारक्यूज ती व्याख्या करीत नाहीत.

आता मारक्यूज यांचीच गोष्ट पाहा. ल्यूसीएं गोल्डमन हे लेखक म्हणतात की " मारक्यूज यांनी " **चिकित्सेची तात्त्विक उपपत्ती** " ( मारक्यूज यांनी मार्क्सवादाला दिलेले दुसरे नाव ) आणि कल्पलोक-कल्पना ( युटोपिया ) यांची पुन्हा एकदा सांगड घातली. " ठीक आहे. पण प्रश्न असा आहे की मारक्यूज यांनी ही जी " चिकित्सावादी उपपत्ती " सूचित केली आहे व ज्याला ते मार्क्सप्रणीत हे विशेषण लावतात ती कितपत

मार्क्सवादी आहे आणि कितपत चिकित्सक आहे ? ती मार्क्सवादी कशी आणि चिकित्सक कशी ? म्हणजे या दोन प्रश्नांचा विचार प्रथम केला जावा. आणि मग मार्क्स वादाचा तो भाग म्हणून टाळचा पिटल्या जाव्यात. खुद्द मार्क्सदेखिल मारक्यूज यांची ही मार्क्सवादी उपपत्ती स्वतःची म्हणून ओळखू शकणार नाही. नव्हे मारक्यूज यांच्या उपपत्तीचे आपल्या प्रतिपादनाशी पुत्रत्वाचे सोडाच, पण पणतूपणाचे नाते आहे हेदेखिल तो मान्य करायचा नाही. मग स्वतः मारक्यूज यांचे त्या बाबतीतील म्हणणे काहीही असो. मारक्यूज यांच्या वतीने गोल्डमन आम्हाला हमी देतात– अर्थात काहीशा बचावात्मक पवित्र्यात– की " उत्पादनाचे तत्त्व हे आजच्या समकालीन समाजातील वास्तव तत्त्वाचा मूर्त आविष्कार आहे असा मारक्यूज यांचा ठाम विश्वास आहे. " गोल्डमन यांच्या या प्रतिपादनात थोडा घोटाळा आहे. कारण मारक्यूज उत्पादनशक्तींना सामाजिक प्रक्रियेत मध्यवर्ती व प्रमुख स्थान कधीही देत नाहीत. फिरून दुसरी गोष्ट अशी की मारक्यूज यांच्या संबंधात " वास्तव तत्त्व " ( Reality Principle ) नावाने वापरलेले गोल्डमन यांचे शब्द सरळसरळ फ्रॉईडप्रणीत सायको ॲनलिसिसशास्त्रातले असून मारक्यूज यांना त्या तत्त्वाच्या वापरातून काही चांगले घडत आहे असे सूचित करायचे असावे असे गोल्डमन यांच्या त्या शब्दाच्या वापरावरून ध्वनित होते. मारक्यूजना Reality Principle चें तसले कार्य बिलकूल मान्य नाही. मारक्यूज यांच्या मार्क्सवादाविषयीच्या अन्वेषणासंबंधी गोल्डमन यांची समजूत काहीही असो लिऊ-शाओची प्रमाणे मार्क्सवादाचा असा प्रतिगामी बुरसटलेला आणि चूक अर्थ निदान मारक्यूज[1] तरी स्वीकारणे कसे शक्य आहे ? मारक्यूज असे करू शकत नाहीत. त्यानीं लावलेला मार्क्सवादाचा अर्थ हा नेहमी पुरोगामीच असावयास हवा. मारक्यूज उत्पादनशक्तींना सामाजिक प्रक्रियेत मध्यवर्ती स्थान तर देत नाहीत परंतु उत्पादनशक्तीच्या प्रमेयाला मार्क्सवादातील मध्यवर्ती स्थानावरून हुसकावून मात्र लावतात. अर्थात उत्पादनशक्तींच्या ( forces of production ) प्रमेयाला मार्क्सवादाच्या सिद्धांतामधून बाद ठरविण्याचे मारक्यूज यांचे कारण माओच्या कारणापेक्षा सर्वस्वी भिन्न आहे हे कोणी विसरू नये.

---

१. मारक्यूज एके ठिकाणी म्हणतात की, " विसाव्या अथवा एकविसाव्या शतकात जी क्रांती येणार आहे, यापुढे जी क्रांती होणार आहे तिच्यासाठी मानवजातीच्या गरजा आणि अपेक्षा, तिची स्वविषयक जाणीव आणि संवेदनाक्षमता यात मूलभूत परिवर्तन घडवून आणावे लागेल...ही जी नवीन

उदा., मार्क्सवादातील उत्पादनशक्तीच्या प्रमेयाला माओ डावलतो; कारण उत्पादनशक्तींची विशिष्ट इतकी प्रगती झाल्यावाचून श्रमजीवींची पिळवणूक व क्रांतीकरिता त्यांची मानसिक तयारी या दोन्हीही गोष्टी अस्तित्वात येऊ शकत नाहीत हे मार्क्सचे प्रमेय तो ज्या देशाचे प्रतिनिधित्व करीत होता त्या चीनच्या देशात अतिशय गैरसोयीचे होते. तेव्हाचा चीन औद्योगिक दृष्ट्या फारच मागासलेला होता. आणि मार्क्स तर म्हणतो की किमान इतकी औद्योगिक प्रगती झाल्यावाचून कामगारक्रांती होत नसते. असा शृंगापत्तीत सापडल्यावर औद्योगिक प्रगतीच्या विशिष्ट पातळीचे तत्त्व आपल्या विचारातून गाळल्यावाचून माओला गत्यंतर नव्हते. त्याच्या उलट स्थिती मारक्यूज यांची आहे. ज्या समाजाचा ते विचार करतात तो समाज औद्योगिक प्रगतीच्या बाबतीत मागासलेला नाही. उलट सर्व दृष्टींनी तो अगदी पुढारलेला आहे. भौतिक समृद्धीची तेथे रेलचेल आहे. त्यामुळे उत्पादकशक्तींना विमुक्त करण्याची भाषा तेथे उपयोगी ठरणार नसते. तेव्हा मारक्यूज दुसऱ्याच बाजूने

---

प्रकारची संवेदनाक्षमता आहे ती उत्पन्न झाली की तिचा पहिला परिणाम म्हणून बहुधा उत्पादनक्षमतेत घट येणार आहे." या प्रतिपादनामागील मारक्यूज यांची तात्त्विक भूमिका अशी. औद्योगिक समाजामध्ये विशिष्ट अशा प्रकारची आर्थिक-सामाजिक व्यवस्था आज कार्यान्वित आहे. या व्यवस्थेमध्ये मनुष्याला यंत्रासोबत काम करणारे एक उपयंत्र म्हणून जगावे लागत आहे. मानवजातीच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने ही परिस्थिती अतिशय लाजिरवाणी आहे. माणूस हा माणूस म्हणून जगावयास हवा. त्याचे यंत्राचे उपयंत्र बनू नये. आपण मनुष्य राहिलो नसून प्रचंड यंत्रातील एक छोटे उपयंत्र बनलो आहोत ही जेव्हा जाणीव मनुष्यप्राण्याला होईल आणि त्याजबरोबर त्याच्या मनुष्यत्वाची पूर्ती करणाऱ्या गुणधर्मांची ओळख त्याला होईल तेव्हा त्या स्वतःच्या सद्यस्थितीविषयी विलक्षण तिटकारा वाटू लागेल. त्याला स्वतःविषयीचा, तो ज्या उत्पादनव्यवस्थेत भाग घेतो त्या उत्पादनव्यवस्थेचा अत्यंत संताप येईल. तो उत्पादन-प्रक्रियेविषयी उदासीन बनेल. परिणामी उत्पादन घटेल. तेव्हा सांगायची गोष्ट ही की Reality Principle सद्यकालीन अर्थव्यवस्था, ती अर्थव्यवस्था ज्यावर अवलंबून आहे ती विशिष्ट प्रकारची उत्पादनव्यवस्था आणि त्या उत्पादनव्यवस्थेच्या भिन्नभिन्न अंगांचा परस्परांबरोबरचा संबंध ही गोष्ट मारक्यूज यांना कौतुकाची वाटत नसते. ती त्यांना तिरस्करणीय वाटत असते.



अनुक्रमणिका

क्रांतीची उपयोगिता व आवश्यकता प्रतिपादू पाहतात. ते म्हणतात की भौतिक समृद्धी हीच एका वेगळ्या प्रकारची कुचंवणा व प्रतिषेध आहे. कारण समृद्धीमुळे मनुष्य त्याच्या जीवनाच्या सार्थकतेला मुकतो. तो केवळ अधिकाधिक समृद्धीच्या मागे लागतो व त्याचे व्यक्तिमत्व रिक्त बनत जाते. अतिरिक्त समृद्धीच्या देशातील उत्पादक-शक्ती म्हणजे भांडवलदार व कामगार जणू काही कट करून तिसऱ्या ग्राहकशक्तीची लुबाडणूक व कोंडी करतात. त्या शक्तीला जबरदस्तीने दडपून टाकतात. भांडवलदार व कामगार मिळून भरपूर उत्पादन करतात व स्वतःसाठी भरपूर नफा मिळवितात व तसा नफा मिळविण्यासाठी प्रचाराची सर्व साधने वापरून ग्राहकजनतेच्या मनात असे भरवून देतात की या वस्तू तुम्ही विकत घेतल्या नाही तर तुमचे लौकिक जीवन अयशस्वी राहणार आहे; त्यात कमतरता येणार आहे. याजबरोबर दुसरीकडे ते ग्राहकजनतेला असेही सुचवितात की थोडे अधिक तास तुम्ही श्रमला तर या सर्व सुखसोयीच्या वस्तू तुमच्या मालकीच्या होणार आहेत. तात्पर्य, कामगार आणि मालक यांची संघटना एकत्रित येऊन व कट करून तिसऱ्या ग्राहकशक्तीला ओझ्याचा बैल बनवितात. सुखसोयींचा गुलाम करतात. त्याची सांस्कृतिक—आध्यात्मिक वाढ होऊ देत नाहीत. मारक्यूज यांच्यावर कुचंबलेल्या आर्थिक व उत्पादक शक्तीना विमुक्त करण्याची जबाबदारी नाही. त्यांच्यावर जबाबदारी आहे ती विपुल उत्पादनाच्या देशात सुखसोयीच्या साधनांच्या आहारी जाऊन त्यांचा व पुंजीपतींचा गुलाम बनलेल्या ग्राहकजनतेच्या सोडवणूकीची. पुंजीपतींच्या स्वार्थी धोरणामुळे ज्यांच्या अधिक विकासात व्यत्यय आला आहे अशा उत्पादक-शक्तीना पुंजीपतींच्या कचाट्यातून सोडविण्याचा भार मार्क्सवर असल्याने तो ज्या प्रकारची सैद्धांतिक योजना पुढे करतो ती मारक्यूज याना उपलब्ध नाही. म्हणून मारक्यूज क्रांतीच्या बाजूने हा नवीन युक्तिवाद पुढे करतात.

मार्क्सपुढे भांडवलशाही समाजाविषयी जो प्रश्न होता तो शोषित श्रमिकशक्ती आणि प्रतिषेधित उत्पादक-शक्ती ( विशेषतः श्रमिकशक्ती ) याना भांडवलरूप प्रतिषेधक आणि कुचंबणा करणाऱ्या ( Repressive ) शक्तींच्या कचाट्यातून कसे बाहेर काढावे हा प्रश्न होता. तेव्हा तो उत्पादक-शक्तीना विमुक्त करण्याच्या गोष्टी करतो. मारक्यूज यांची समस्या यापेक्षा सर्वस्वी भिन्न आहे. त्यांच्या पुढची समस्या "अतिरिक्त उत्पादनापायी" ( Surplus Production ) होणारी "अतिरिक्त कुचंबणा". ( Surplus Repression ) व त्या कुचंबणेवर मात कशी करता येईल ही आहे.



अनुक्रमणिका

मारक्यूज यांचे प्रतिपादन असे की, उत्पादन कमालीचे वाढले की उत्पादनाची पातळी कायम राखण्यासाठी उत्पादित वस्तूंचा खपही वाढवावा लागतो. हा खप वाढविण्यासाठी, या वस्तू तुम्ही खरेदी करा नाहीतर तुमच्या आयुष्यात काहीतरी कमतरता राहील या प्रकारचा विचार ग्राहकजनतेच्या मनावर बिंबवावा लागतो. लोकांना अधिक पैशासाठी आपले जीवन विकावयास प्रवृत्त करावे लागते. त्यांचे आयुष्य काही मोजक्याच हालचालींशी जखडून टाकावे लागते. पैशाची कमाई व उपभोग्य वस्तूंची त्या पैशांनी केलेली खरेदी याव्यतिरिक्त मानवी जीवनाला काही इतर प्रयोजने आहेत याची विस्मृती घडवून आणावी लागते. हीच मारक्यूज प्रणीत मनुष्याच्या "अतिरिक्त वैभवातून येणारी अतिरिक्त कुचंबणा." मार्क्सच्या बाबतीत उत्पादक-शक्तींच्या मार्गात भांडवलशाहीने निर्माण केलेल्या अडचणी व त्या शक्तींची त्या अडचणीतून सुटका ही समस्या होती. मारक्यूज यांच्यापुढे भांडवलशाही समृद्धीने चालविलेल्या मानवाच्या नवीन प्रकारच्या कुचंबणेतून मानवाची सुटका ही समस्या होती. मारक्यूज ज्या विमुक्त समाजाचे चित्र स्वतःशी पाहतात त्या समाजात मनुष्याच्या सगळ्या उपजत प्रवृत्ती संपूर्णपणे व्यक्त होऊ शकणार आहेत व सगळीकडे उपजत प्रवृत्तींचा "निर्दमित व अकुंठित संतोष" अवतरणार आहे. थोडक्यात मारक्यूज यांच्या आदर्श समाजव्यवस्थेत उपजत प्रवृत्तींचे" "अदमित उदात्तीकरण" घडून यायचे आहे. या ठिकाणी गंमत ही की, मारक्यूज यांची ही विचारसरणी खुद्द मार्क्सच्या विचाराशी तर विसंगत आहेच परंतु मार्क्सने या प्रकारच्या विचारसरणीचा अतिशय कठोर शब्दात उपहासही केलेला आहे. मार्क्सचा एक समकालिन व स्नेही मॅक्स स्टर्नर याने Ego and Its Own या नावाचे एक पुस्तक लिहिले असते. त्या पुस्तकाचा मुख्य प्रबंध हा होता की, मानवी समाजात मनुष्याच्या उपजत-प्रवृत्तींचा अगदी कोंडमारा होतो. त्याना जर मुक्तता दिली तर प्रत्येक जीवन स्वतःचा परिपूर्ण विकास साधू शकेल. मॅक्स स्टर्नरच्या या तत्त्वज्ञानासाठी मार्क्सने त्याला "संत मॅक्स" अशी औपरोधिक पदवी बहाल केलेली असते व संत मॅक्सच्या शिकवणुकीची अगदी परखड शब्दात खरड काढलेली असते. ( The German Ideology ) असो. मारक्यूज यांच्या विचारांचा अधिक काथ्याकूट या ठिकाणी सर्वस्वी अनावश्यक आहे.

मात्र क्रांतीच्या कल्पनेने आता नवीन स्वरूप घेतलेले होते. मुळातल्या अर्थशास्त्रीय स्वरूपाच्या जागी क्रांतीचे स्वरूप आता सायकोॲनालसिसवादी बनले होते. मार्क्सकडून क्रांतीची कल्पना आता फ्रॉईडकडे (आणि फ्रॉईडच्याही

पलीकडे ) गेली होती. क्रांतीच्या मूळ कल्पनेत येऊ घातलेल्या आदर्श कल्प-लोकांचे चित्र अर्थशास्त्रीय प्रमेयावर आधारित होते. मारक्यूज वगैरेंनी क्रांत्युत्तर ज्या आदर्श कल्पलोकांचे चित्र रंगविले त्यात आर्थिक घटकांऐवजी मानसिक घटकांना प्राधान्य असते. " इतिहासाच्या प्रक्रियेत एक बुद्धितत्त्व अदृश्यपणे कार्य करीत असते. या मार्क्सच्या " भौतिकवादी इतिहासाच्या कल्पनेच्या खरेपणाविषयी " मारक्यूज साशंकच आहेत. अशा प्रकारचे कोठलेही अमूर्त तत्त्व इतिहासाच्या प्रक्रियेत कार्य करीत असेल असे त्याना वाटत नाही. मार्क्सने मांडलेल्या या तत्त्वावर जसा त्यांचा विश्वास नाही तसाच इतिहासाच्या पुढील हालचालीत श्रमजीवींचा वर्ग काही विशेष कार्य बजाविणार आहे याही मार्क्सच्या प्रमेयावर त्यांचा विश्वास नाही. " उत्पादक-शक्तींचे " प्रमेय तर त्यानी पूर्वीच टाकून दिलेले आहे. त्यामुळे श्रमजीवींचा वर्ग हा क्रांतीच्या कामगिरीवर इतिहासाने खास नियुक्त केलेला वर्ग असून मुक्तीचे ते इतिहासविशिष्ट हत्यार आहे याही तत्त्वाला त्यांना चाट द्यावी लागते. क्रांतीसाठी योग्य भूमी उत्पादक–शक्ती तयार करतात. क्रांतीचा लढा " औद्योगिक प्रोलिटॅरिएटचा " वर्ग देतो. इतिहासानेच क्रांतीपूर्ण मुक्तीचे ते इतिहासविशिष्ट हत्यार आहे याही मार्क्सच्या प्रमेयाला त्याना नकार द्यावा लागला आहे. क्रांतीकरिता सुयोग्य भूमी उत्पादक–शक्तींच्या विशिष्ट वर्तना-तून तयार होते. क्रांतीचा लढा " औद्योगिक प्रोलिटॅरिएट वर्ग " देतो. इति-हासानेच त्याची नियुक्ती या खास कामगिरीवर केलेली असून हा वर्ग हे क्रांतीपूर्ण मुक्तीचे हत्यार असते ही तर मार्क्सची मूलभूत धारणा. ही धारणाच टाकून दिल्याने मार्क्सप्रणीत वर्गविग्रहाची भूमिकाच मारक्यूजना टाकून द्यावी लागते. उदा., सामाजिक उद्धारासंबंधी किंवा मार्क्सवाद्यांच्या भाषेतील सामा-जिक मुक्तीसंबंधी बोलताना मारक्यूज लिहितात की, " प्रस्थापिताच्या निरा-करणाची शक्ती कोठल्यातरी एका वर्गाच्या हाती एकवटली आहे असे आज म्हणता येत नाही. प्रस्थापिताला नकार देऊ शकणारा असा जो काही विरोध आज आहे, त्या विरोधाचे स्वरूप एकरंगी व एकात्म नसून ते विस्कळित आणि अराजकी आहे. मग हा विरोध राजकीय स्वरूपाचा असो अथवा नैतिक स्वरूपाचा असो. बुद्धिवादी स्वरूपाचा असो अथवा स्वाभाविक स्वरूपाचा असो, एकजूट करावी आणि धडक द्यावी ही इच्छा तिथे नाही. विरोधाला एक ठाम भूमिका आपण स्वीकारावी हीही इच्छा तिथे नाही. तेथे फक्त भौतिक समृ-द्धीविषयीचा तिटकारा नि उबग आहे. किंवा निषेधाची, विरोधाची उपजत ऊर्मी,



अनुक्रमणिका



जबरदस्त सक्ती तेथे आहे."[१] मनुष्याच्या वासनागंडाची सर्व प्रकारच्या दडपणातून सुटका आणि सामाजिक, आर्थिक, मानसिक, नैसर्गिक परिस्थितीबरोबरचे त्याचे समायोजन या दोन बाबींची एकत्र सांगड कशी घालावयाची किंवा

---

१. आर्थिक सुखाच्या स्वर्गलोकाची कल्पना आणि मानसिक सुखाच्या स्वर्गलोकाची कल्पना. – मारक्यूज आणि मारक्यूज यांच्याच विचारसरणीचे नॉर्मन ओ ब्राऊन, आर डी लँग इत्यादि त्यांचे विचारबंधू, आर्थिक सुखाच्या भूस्वर्गाच्या कल्पनेऐवजी मानसिक सुखाच्या भूस्वर्गाची कल्पना मांडीत असतात. मार्क्सप्रणीत भूस्वर्गात आर्थिक सुबत्ता, न्याय व समता आहे. तर मारक्यूज इत्यादींच्या भूस्वर्गलोकात मानसिक शांती व मानसिक समतोलाची सुबत्ता आहे. कल्पना म्हणून मानसिक समतोलाच्या भूस्वर्गलोकाची ही विचारसरणी ठीक असली तरी आर्थिक भूस्वर्गलोकाच्या कल्पनेने जशी सहज प्रकारे सामाजिक चळवळीला चालना मिळू शकते तशी चालना मानसिक भूस्वर्गलोकाच्या कल्पनेने मिळू शकत नाही. या विशिष्ट बाबतीत आर्थिक भूस्वर्गलोकाची कल्पना अधिक सामर्थ्यशाली ठरते. आर्थिक भूस्वर्गलोकाची कल्पना सामाजिक क्रांतीला फार लवकर प्रेरणा देऊ शकते. मानसिक भूस्वर्गलोकाची कल्पना ही अधिक आतील वर्तुळाची, काहीशी गूढ अशी कल्पना आहे. सहजासहजी लोक लोकप्रिय होऊ शकणारी अशी ती कल्पना नव्हे व त्याचमुळे ती अल्पकालिकही ठरत असते. उदा., मार्क्सचा 'भांडवल' हा ग्रंथ सामान्यपणे सर्वसाधारण मनुष्याने मुळीच वाचलेला नसेल. परंतु आर्थिक प्रमेयावर आधारित असा जो 'अतिरिक्त मूल्याचा' सिद्धांत त्यात मांडला गेला आहे तो मात्र सर्वसामान्य मनुष्यापर्यंतही पोचू शकला आहे. कारण 'अतिरिक्त मूल्याचा' सिद्धांत अगदी सहजपणे सामान्य लोकांच्या भाषेत मांडता येतो. त्यात जे काही सूचित होते ते सर्वसामान्य सूचक शब्दात सांगता येते व लोकांना ते पटू शकते. सामान्य मनुष्याला 'अतिरिक्त मूल्य' म्हणजे काय हे जरी समजले नाही तरी 'अतिरिक्त मूल्याचा' सामान्य पर्याय 'लुबाडणूक किंवा गरिबांचे शोषण' हा शब्द अगदी लगेच समजतो व हृदयाला भिडतो. त्याच्या उलट "अतिरिक्त मानसिक कुचंबणा" (Surplus Repression) यासारख्या मानसवाचक कल्पना सूचक शब्दात मांडता येत नाहीत. त्यामुळे क्रांती घडवून आणायच्या दृष्टीने मार्क्सची कल्पना जितकी सामर्थ्यशील तितक्याच या मानसवाचक कल्पना दुबळ्या असतात. कृतीसाठी बहुजनसमाजाचे मन खेचून घेण्याच्या दृष्टीने प्राय: निरुपयोगी.



अनुक्रमणिका

नैतिक आचारविचारांच्या बाबतीत सैल शिस्तीचा समाज आणि ज्ञानी गुरुजनांची हुकूमशाही या दोन कल्पनांची सांगड कशी घालायची याचे कोठ-ल्याही प्रकारचे दिग्दर्शन मारक्यूज यांच्या कोठल्याही लिखाणात गवसत नसते. एकीकडे मारक्यूज म्हणतात की, मनुष्याचा वासनागंड दडपला जाता नये; त्याची हालचाल अविरोध होत जावी. परंतु समाज म्हटला की, तेथे कसली ना कसली बंधने आणि विधिनिषेध यांची व्यवस्था यावीच लागते. तेव्हा कोणी काही म्हटले तरी समाजवस्तूशी प्रत्येकाला जमवून घ्यावेच लागणार. यालाच Ecological Balance बाह्य वातावरणाने निर्माण केलेला सम-तोल म्हणतात. हा तोल विघडला तर सारेच संपत असते. म्हणून हा तोलही सांभाळायचा आणि वासनागंडाच्या हालचालींना मुक्त वावही द्यायचा ही तारेवरची कसरत कशा प्रकारे केली जावी याच्या व्यावहारिक सूचना मारक्यूज-साहेबांच्या तत्त्वज्ञानात दिलेल्या नसतात. आणखी एक गोष्ट अशी की, समाजामध्ये प्रत्येकाला त्याच्या स्वेच्छेप्रमाणे स्वातंत्र्य हवे असे एका बाजूला मारक्यूज म्हणतात तर दुसरीकडे सर्वहिताय जागरूक राहणाऱ्या गुरुजनांच्या हुकूमशाहीचीही भलावण करतात. तर या दोन्ही तलवारी एका म्यानात कशा राहाव्यात ? कदाचित असे असावे की, "लोकांचे मन मुर्दाड बनविणारी सामाजिक सोशिकता" असा ज्याचा उल्लेख मारक्यूज करतात, "ती मनुष्याचे मन दडपून टाकणारी परमतसहिष्णुता" नष्ट झाली म्हणजे मारक्यूज याना अभिप्रेत असणाऱ्या "विनादहशत आणि विनाक्रौर्य" क्रांतीचा उदय होणार असेल व अशी क्रौर्यहीन क्रांती घडून येताच हे जे काही डोकेखाऊ प्रश्न आपण उपस्थित केले ते आपोआपच सुटणार असावेत. त्याचमुळे अशा प्रश्नांचा कल्पनेतही विचार करावयास मारक्यूज वगैरे मंडळी आज तयार नसावीत. काही का असेना पण क्रांतीसारख्या प्रचंड घटनात अनुस्यूत असणाऱ्या व्यावहा-रिक प्रश्नांचा विचार आमची ही क्रांतीभोक्ती विद्वत्मंडळी करीत नाहीत एवढी गोष्ट खरी. एवढेच नव्हे तर उदारमतवादामध्ये परमत सहिष्णुतेचा गौरव असल्याने उदारमतवादाला एक सामाजिक ढोंग अशीही विरुदावली क्रांती (म्हणजे क्रांतीवादी) देत असतात. त्यांच्या म्हणण्याचा आशय हा की, अशा प्रकारची परमतसहिष्णुता समाजात नसेल तर तितक्या लवकर क्रांती घडून येईल. कारण लोकांच्या रागाची वाफ मग जाणार नाही.

वर अनेक प्रकारचे मार्क्सवादी बौद्धिक पांचपेच, उडवाउडवीचे प्रकार नि वाक्छल आपण पाहिले. या बौद्धिक पाचपेचात अनेक परस्परविरोध आहेत. त्यातील एकाचा मेळ दुसऱ्यास नाही. परंतु या विसंगती, ही उडवाउडवीची

उत्तरे आणि ह्या सर्व वाक्छल हे सगळे फक्त बौद्धिक पातळीवर कार्य करीत असतात. प्रत्यक्ष कृतीच्या क्षमतेवर त्यांचा काडीमात्रही दुष्परिणाम होत नसतो. त्यामुळे कृतीप्रवणतेच्या बाबतीत मार्क्सवादाची सुसंगतता सर्व काळी आणि सर्व स्थळी अभंग असते. या घडामोडीला कारण आहे ते मार्क्सवादी आवाहनाच्या तळाशी असणारे क्रांतीवादाचे आणि भूस्वर्गलोककल्पनेचे प्रच्छन्न आकर्षण. क्रांतीवाद आणि भूस्वर्ग लोकस्थापनेची आशा हे घटक जर मार्क्सवादामध्ये अदृश्य प्रकारे नसते तर त्यातील विसंगती लोकाना केव्हाच खटकल्या असत्या. पण क्रांतीवाद आणि भूस्वर्गलोक स्थापनाची आशा या दोन घटकांच्या अस्तित्वा-मुळे मार्क्सवादी साहित्य-मग ते कोणाही मार्क्सवाद्याचे असो आणि मूळ मार्क्स-वादाबरोबरची कितीही विसंगती त्यात असो–हे वाचणारास सलग व सुसंगतच वाटत राहणार असते. कारण कृतीचे तत्त्वज्ञान म्हणून जेव्हा मार्क्सवादी विचार जनतेसमोर मांडण्यात येतात तेव्हा केवळ या दोन घटकांच्या अस्तित्वामुळे जनतेला ते इतके मोहक वाटू लागतात की त्यातील आंतरिक विसंगतीकडे जनतेचे लक्षच जात नाही. किंबहुना या दोन घटकांच्या अस्तित्वामुळे–आणि सर्व प्रकारच्या मार्क्सवादी लिखाणात हे दोन घटक समान असतात–मार्क्सवादी तत्त्वज्ञाने एकच गोष्ट शिकवित आहेत असा खोटा आभासदेखिल निर्माण होतो. मार्क्सवादाच्या मुळाशी असणाऱ्या क्रांतीवादी आणि भूस्वर्गावतरणाची आशा दाखविणाऱ्या ह्या दोन घटकांची आकर्षणशक्ती जर आपण मार्क्स-वादाच्या सामर्थ्याचा विचार करताना हिशोबात घेतली नाही तर मार्क्स-वादाचा उदय, त्याचा प्रचंड प्रचार व प्रसार आणि अपवादात्मक चिवटपणा व टिकाऊपणा यांचा उलगडाच कधी होणार नाही. या विशिष्ट बाबतीत, म्हणजे आपल्या विचारात क्रांती व भूस्वर्गकल्पनावादी अवशेष वापरण्याच्या बाबतीत, मारक्यूज आणि मारक्यूज यांचे प्रोमिथ्यूसी पूर्वसुरी (म्हणजे कार्ल मार्क्स. मार्क्स स्वतःला प्रोमिथ्यूसचा नवा अवतार मानीत असे.) या दोघात काडी-मात्रही फरक नाही. मारक्यूज यांच्या तत्त्वज्ञानात आढळणारी काल्पनिक भूस्वर्गलोकाच्या तीव्र आकर्षणाची (आणि त्यांचे असामान्य बौद्धिक औद्धत्य) बरोबरी मार्क्सच्या तत्त्वज्ञानातील काल्पनिक भूस्वर्गलोकाविषयीचे असामान्य आकर्षण (आणि मार्क्सचे असामान्य बौद्धिक औद्धत्य) याच्याशीच फक्त होऊ शकेल. कम्युनिझम आला म्हणजे बहुजन समाजाची स्थिती काय असणार आहे याचे वर्णन करणारे ' एकनॉमिक आणि फिलॉसॉफिकल ' हस्तलिखितामधील पुढील उतारे वाचा म्हणजे मी काय म्हणतो ते आपल्या ध्यानात येईल. अथ-पासून इतिपर्यंत हे वर्णन काल्पनिक मनोराज्यानी भरलेले आहे. मार्क्स लिहितो



अनुक्रमणिका

की, " मनुष्या-मनुष्यामध्ये आणि निसर्ग आणि मनुष्यामध्ये आज तो तीव्र अशा प्रकारचा झगडा चालू आहे त्याचा निश्चित उलगडा तुम्हाला तेथे (म्हणजे कम्युनिझममध्ये) आढळेल. अस्तित्व आणि मनुष्याविषयीचे आदर्श समज; मनुष्याचे नि:सत्वीकरण आणि त्याचे निर्जीव वस्तुकीकरण आणि त्याचे पुन-र्स्वत्वसंपादन, मनुष्याचे स्वातंत्र्य आणि त्याच्या जीवनात कार्य करणारा अपरिहार्यतेचा कायदा व्यक्ती आणि जाती, आणि जाती–या सर्वांच्यामध्ये जो तीव्र स्वरूपाचा झगडा आज सुरू आहे त्याचा निश्चित उलगडा तेथे असेल. इतिहासाने जो कूटप्रश्न टाकला आहे त्या कूटप्रश्नाचे कम्युनिझम हे उत्तर आहे. एवढेच नव्हे तर मानवालाही इतिहासाने जे कोडे टाकले आहे. त्याचेही उत्तर तेथेच आहे. आणि आपणच ते उत्तर आहोत याचीही स्पष्ट जाणीव कम्यु-निझमला स्वत:ला आहे.

कार्ल मार्क्सच्या प्रतिपादनाचा भावार्थ हा—आज जगामध्ये सगळीकडे विरोधाचे साम्राज्य सुरू आहे. मनुष्या-मनुष्यात, मनुष्य आणि निसर्गात जिकडे –तिकडे आज विरोध आणि झगडा दिसत आहे. मनुष्याचे प्रचलित अस्तित्व आणि त्याच्या अस्तित्वाचा खरा धर्म, मनुष्याच्या अस्तित्वाचे आज दिसते ते प्रकट स्वरूप आणि त्याच्यातील खऱ्या स्वरूपाला प्रकट व्हावयास संधी मिळाली तर जे दिसेल ते स्वरूप, मनुष्याचे स्वातंत्र्य आणि त्याच्या आयुष्या-वरील नियतीचा कायदा, एक व्यक्ती म्हणून मनुष्य आणि त्याची संपूर्ण जाती –या सर्वांमध्ये आज ओढाताण आणि भांडण दिसत आहे. उद्या कम्युनिझमचा भूलोकीचा स्वर्ग एकदा निर्माण झाला की हे सगळे झगडे आणि तणाव एकदम नष्ट होतील.

एव्हाना क्रांती आणि त्या क्रांतीमागोमाग येणाऱ्या आदर्श आणि मानव-जातीला ललामभूत होणाऱ्या कम्युनिस्ट राजवटी जगात काही थोड्या आलेल्या नाहीत. तेव्हा ज्या ऐतिहासिक प्रक्रियेला उद्देशून मार्क्स " खरा आणि वास्तविक इतिहास " ही विशेषणे वापरतो किंवा इतिहासातील ज्या हालचालीना " इति-हासाची खरीखुरी चाल " असे म्हणतो त्या " इतिहासाच्या खऱ्याखुऱ्या चालीचा " निदान थोडा तरी प्रत्यक्ष अनुभव एव्हाना जगाला मिळालेला आहे. तथापि " या खऱ्याखुऱ्या चालीबरोबर " ज्या उदात्त आणि महान गोष्टी भूतलावर (म्हणजे भूतलावर जेथे कम्युनिझम येणार होता तेथे) अवतरणार होत्या त्या काही कोठेही अवतरलेल्या आढळत नाहीत. नव्हे त्या जवळपास आल्या आहेत असे वाटावे असाही कोठला पुरावा आढळात येत नाही मात्र



अनुक्रमणिका

मार्क्सप्रभृतीनी रंगविलेली धर्मातीत भूस्वर्गरचनेची कल्पनाचित्रे तशी प्रत्यक्षात येत नसली तरी वास्तवाशी त्यांचा कोणत्याही प्रकारे संबंध नव्हता व नसतो असे मात्र त्यांच्याविषयी म्हणता यावयाचे नाही. ही कल्पनाचित्रे बौद्धिक रचनांच्या जातीची असली तरी वास्तविक परिस्थितीशी त्यांचा संबंध आहे. विद्यमान ऐतिहासिक परिस्थितीत जे त्याज्य आणि गर्ह्य असते त्याचे उलट प्रतिबिंब या कल्पनाचित्रात उमटलेले असते. या कल्पनाचित्राना चालना प्रस्थापित परिस्थितीकडूनच मिळत असते. त्यात जी आदर्श व्यवस्था रंगविलेली असते तिचा आराखडा वर्तमान दुःस्थितीवरूनच सुचलेला असतो. सारांश विद्यमान सामाजिक आणि ऐतिहासिक परिस्थितीचे पडसाद या कल्पनाचित्रात अपरिहार्यपणेच आढळत असतात. ज्याप्रमाणे केवळ कल्पनाविलासी अशा प्रकारची स्वप्नस्थिती जगात शक्य नाही त्याचप्रमाणे केवळ कल्पनिक आदर्श अशाही प्रकारची बौद्धिक रचना कुणाला शक्य होत नाही. भूस्वर्गलोकांविषयीची ही कल्पनाचित्रे स्वप्नरंजने खरी परंतु वास्तवाच्या आधाराने रचली जाणारी ती स्वप्नरंजने आहेत. वास्तवाचा आधार पूर्णतः सोडलेली नव्हत. या प्रकारच्या कल्पनारंजनाशी वास्तवाचा संबंध असतो, एवढेच नव्हे तर बाहेर वास्तवात जी सामाजिक–ऐतिहासिक परिस्थिती अस्तित्वात असते त्या परिस्थितीच्या मर्यादांची मर्यादा या कल्पनारंजनावरही पडत असते. विद्यमान इतिहास आणि एकूण सामाजिक व्यवस्था यांचे अस्तित्वात असणारे स्वरूप पूर्णतः मनातून काढून टाकून अथवा नाकारून ही कल्पनारंजने बनविली जात नसतात. तर अस्तित्वातील या व्यवस्थांच्या विशेषाचे ध्यान ठेऊन ती रचली जात असतात. उदा., रूसोने त्याच्या तत्त्वज्ञानात रंगविलेला आदर्श भूस्वर्गलोक हा त्याच्या काळची सामाजिक स्थिती ध्यानात घेऊन रचला गेलेला आहे. रूसो ज्या काळात राहात होता तो काळ औद्योगिकीकरणपूर्व काळ होता. त्यामुळे रूसोची आदर्श भूस्वर्गलोकाची कल्पना ही उद्योगधंद्यांच्या प्रचंड वाढीनंतर येणाऱ्या प्रश्नांचा विचार हिशेबात न घेता रचलेली कल्पना आहे. आज औद्योगिकीकरणावर आधारित जीवनपद्धती आढळते तशा प्रकारची जीवनपद्धती रूसोला स्वप्नातही सुचणे शक्य नव्हते. तेव्हा रूसो "आदीम–मानवाकडे–रानमानवाकडे" वळला. रानटी अवस्थेतील मानवाच्या जीवनाचे त्याने आदर्शिकरण केले. आदर्श "रानटी मानवाची" रूसोची कल्पना ही अशाप्रकारे औद्योगिकीकरणपूर्व काळातच सुचू शकते. औद्योगिकीकरणानंतर नाही. "आदर्श रानटी मानवाचे व "निसर्गजीवनाचे" रूसोचे वर्णन अठराव्या शतकातील वर्णन आहे.



अनुक्रमणिका

या रानटी मनुष्याच्या जीवनात त्याला साधेपण, निरागसता आणि समाधान यांचे नंदनवन दिसले. रानटी मनुष्य त्याच्या सभोवतालच्या नैसर्गिक जंगलात सर्व प्रकारच्या सांसारिक काळज्यांपासून दूर अशा अवस्थेत मुक्तपणे एकाकी संचार करतो: त्याला कुणाशी स्पर्धा करायची नसते. त्याच्याशीही कुणी स्पर्धा करणार नसतो. स्वतःच्या सहजप्रवृत्ती आणि नैसर्गिक इच्छा साधेपणाने पुऱ्या करीत तो जगतो. मनुष्याच्या जीवनातील अबाधित स्वातंत्र्य ही जी सर्वोच्च महत्वाची गोष्ट ती उपभोगित तो जगत असतो. वगैरे. या चित्रात औद्योगिकीकरणानंतर येणाऱ्या समस्यांचा यत्किंचितदेखिल विचार नाही. या आयुष्याची रूसोला कल्पनाच नसते. प्रचंड उद्योग आणि त्यातील सतराशे साठ भानगडी आणि अडचणी, तसेच नवीन उद्योगविषयक ज्ञान व शास्त्रीय दृष्टी या सर्वांविषयी संपूर्ण अज्ञानी असल्याने रूसो जेव्हा आदर्श भूस्वर्गाची कल्पना रेखाटावयास बसतो तेव्हा तो भविष्याऐवजी भूतकाळाकडे वळतो. भूतकाळात त्याला आदर्श जीवनाचे चित्र सापडते. याच्या उलट कार्ल-मार्क्सची स्थिती आहे. कार्लमार्क्स औद्योगिकीकरण युगात जन्मलेला. गिरण्या-कारखान्याच्या जीवनाची त्याला सर्वांगपरिपूर्ण कल्पना. त्यात काम करणाऱ्या लोकांच्या प्रश्नांचीही त्याला ओळख. त्यामुळे भविष्यकाळातील चित्र विचारात घेतल्यावाचून आदर्शसमाजाचा स्वतःचा आराखडा तो तयार करू शकत नाही. भविष्यकाळ विचारात घेऊन आपला आराखडा तो रचीत होता म्हणून स्वतःच्या आराखड्याला तो " शास्त्रशुद्ध दर्शन " असे नाव देतो. या आराखड्याचा आधार वर्तमान उद्योगप्रधान समाज व त्याची माहिती हा होता. रूसोच्या भूस्वर्गवादी तत्त्वदर्शनातल्या " आदर्श आणि धीरोदात्त रानमानव " मार्क्सच्या तत्त्वज्ञानात " आदिम कम्युनिझममध्ये " आणि मागाहून तंत्रवैज्ञानिक ज्ञानाची पातळी वाढत गेल्यानंतर " पूर्ण कम्युनिझमच्या "कल्पनेत रूपांतरित होतो. मारक्यूज अति-औद्योगिकीकरणाच्या काळातील अपत्य. या काळाने तंत्रवैज्ञानिक ज्ञानातली अभूतपूर्व वाढ आणि त्यावर आधारित प्रचंड उद्योगधंदे आणि जीवनव्यवस्थेचा गुंतागुंतीचा व समस्यापूर्ण प्रकार पाहिलेला. या समस्यांची ओळख असणारे मारक्यूज भूतकाळाकडे वळू शकत नाहीत. भूस्वर्गलोकाची कल्पना विणताना त्यांच्या नजरेसमोर आजचा माणूस आणि त्या माणसाच्या निरागस सहजप्रवृत्तींमध्ये भांडवलशाहीने निर्माण केलेल्या विकृती व त्या विकृतींच्या निराकरणाचे तोडगे या गोष्टी असतात. त्यांची भूस्वर्गलोकरचनेची संकल्पना या बाबी विचारात घेऊन तयार केलेली असते. प्रमाणाबाहेरील औद्योगिकीकरण आणि त्यातून निर्माण होणारी



अनुक्रमणिका

असामान्य भौतिक श्रीमंती व त्या श्रीमंतीसुबत्तेतून जन्मास येणारे सामाजिक-मानसिक प्रश्न यांचा अनुभव घेतलेल्या मारक्यूजना सुबत्ता-श्रीमंती हाच एक आजार-मानसिक आजार वाटून त्या आजारावर भूस्वर्गलोककल्पनेत उपाय शोधण्याची गरज भासते. तात्पर्य मारक्यूज यांच्याही भूस्वर्गलोककल्पनेचे ताणेबाणे प्रस्थापित समाजव्यवस्थेच्या आराखड्यात गुंतलेले असतात. सांगायचा मुद्दा असा की मारक्यूज यानीही मांडिलेल्या " मानसिकदृष्टचा सुखसमृद्धीपूर्ण भूस्वर्गलोककल्पनेमागील " चालना व चौकट प्रस्थापित समाजव्यवस्था हीच असते. यावरून निष्कर्ष निघतो तो असा. भूस्वर्गलोकाची कल्पना कोणीही मांडिलेली असो. त्याच्यात पुढील दोन घटक अपरिहार्यपणे यावे लागतात. एक घटक भूतकाळवाचक तर दुसरा भविष्यकाळवाचक. या दोन्ही घटकांच्या उपस्थितीविना भूस्वर्गलोककल्पना मांडताच येत नाहीत. युटोपिया किंवा भूस्वर्गलोककल्पना या केवळ भविष्याचेच स्वप्न नसतात तर त्यात भूतकाळाकडे केलेली उलटी चालही येते. युटोपिया रंगविणारा एकाच वेळी भविष्याकडेही डोळे लावून असतो आणि भूतकाळाकडेही डोळे लावून असतो. उदा. रूसोचा " धीरोदात्त रानमानव. " रानमानवाचा आदर्श भूतकाळातला आहे. पण आता तो भविष्यकाळासंबंधी आहे. मार्क्सची " आदिम कम्युनिझमची " कल्पना भूतकाळासंबंधीच्या विचारातून घेतलेली आहे. पण आता ती भविष्यकाळाला लाविलेली आहे. मारक्यूज यांच्या लिखाणातील " मानवाच्या निरागस सहजप्रवृत्तींचे मुक्त आणि परिपूर्त जीवन आणि भांडवलशाहीने केलेले त्या प्रवृत्तींचे विकृतिकरण " ही भूतकाळ आणि भविष्यकाळ या दोघानाही जोडणारी जोडणारी कल्पना आहेच. युटोपिया हा नेहमी भविष्यातील सुखी काळ आणि भूतकाळातील सुखी काळ या दोहोंचा संयोग असतो. " धन्य आणि आनंदी भविष्य " आणि " निरागस आणि मुक्त भूत " किंवा युटोपिया नि आर्केडिया या दोहोंचे मिश्रण हा या जातीच्या कल्पनांचा खास विशेष आहे.[१] ( आर्केडिया प्राचीन ग्रीस देशातला एक डोंगराळ भाग. हा प्रदेश हे ग्रामीण जीवनातील सुखाचा आदर्श होता अशी कल्पना. म्हणून भूतकाळातील आदर्श सुखी भूखंडाची कल्पना मांडताना त्या प्रदेशाला आर्केडियाचा भूखंड म्हणण्याची सर्वसामान्य प्रथा आहे. )

---

१. या ठिकाणी युटोपियासंबंधीचे रूसो आणि मार्क्स यांचे प्रतिपादन आणि त्याच विषयासंबंधीचे मारक्यूज व त्यांचे सहविचारवंत यांचे प्रतिपादन यात फरक करावयास हवा.

रूसो आणि मार्क्स या दोघांच्याही भविष्यातील सामाजिक व्यवस्थांच्या चित्रणासंबंधीच्या विचारात स्वप्नवादी अंश असेलही. परंतु दोघेही अतिशय प्रज्ञावान आणि द्रष्टे विचारवंत असल्याने भविष्यासंबंधीचे त्यांचे निदान संपूर्ण फोल नसते. त्यांच्या लिखाणात वास्तवापासूनचे केवळ पलायनच नाही. तर वास्तवाबरोबरचा झगडाही त्यात आहे. रूसो आणि मार्क्स वास्तवाबरोबरचा मुकाबलाही शिकवितात. आजचे आमचे मारक्यूज आणि त्यांचे सहविचारवंत दुःसह वास्तवापासून फक्त पळ काढीत असतात व त्यासाठी तात्त्विक कल्पनांच्या स्वप्नरंजनाचे अवडंबर निर्माण करीत असतात. मारक्यूज यांचेच उदाहरण घ्या. मारक्यूज ज्या मानसिक भूस्वर्गलोकाची कल्पना मांडतात तिची प्रेरणा फ्रॉईडच्या infantile Regression या स्थितीच्या कल्पनेत आहे. कामवृत्तीच्या फ्रॉइडप्रणीत बालपणीच्या अवस्थेकडल्या प्रत्यागमनाच्या स्थितीचे आदर्शीकरण म्हणजे मारक्यूज यांचा मानसिक भूस्वर्गलोक. आता मनुष्याच्या आदर्श स्थितीची या प्रकारची कल्पना म्हणजे मानवजातीविरुद्धचा शुद्ध गहजब आहे. कारण मानसिक प्रगतीऐवजी मानसिक परागती आणि एकदा ज्या मानसिक स्थितीतून आपण पुढे गेलो त्या स्थितीचे आकर्षण हे मानसिक वाढीचे लक्षण नव्हे. तर ते मानसिक पोरकटपणाचे लक्षण आहे. प्रत्येक मानवी बालकाच्या मानसिक आणि कामवृत्ती विषयक वाढीचा एक आलेख फ्रॉईडने तयार केला आहे. फ्रॉईडच्या म्हणण्याप्रमाणे प्रत्येक बालकाची मानसिक-भावनिक वाढ त्याच्या कामवृत्तीच्या वाढीच्या आलेखाशी समांतर आहे. मानसिक वाढीची फ्रॉईडप्रणीत रेषा तीन टप्प्यातून जाते. प्रत्येक बालक न चुकता या तीन टप्प्यातून जाते व जेव्हा ते तिसऱ्या टप्प्यापाशी पोचते तेव्हा त्याच्या व्यक्तीमत्वाची वाढ पूर्ण होते. Infantile sexuality हा या तीन टप्प्यांपैकी पहिला टप्पा. याच टप्प्याला pre-genital असेही नाव आहे. हे नाव देण्यात फ्रॉईडला असे सूचित करायचे असते की बालकामध्ये या काळात जी कामवृत्ती कार्य करीत असते ती कामवृत्तीच्या नैसर्गिक इंद्रियाच्या-जननेंद्रियाच्या-द्वारे कार्य न करता इतर अवयवांच्या मध्यस्तीने कार्य करते. कामवृत्ती ही प्रत्येक मनुष्यप्राण्यात उपजत म्हणजे बाल्यावस्थेपासूनच अस्तित्वास असते. फक्त प्रकट होताना ती जननेंद्रियाच्या मार्गे न होता मुख, गुद या केंद्रातून प्रगट होते. ही केंद्रे उत्तेजित होऊन त्याना जे सौख्य मिळते ते कामवृत्तीच्या तृप्तीच्याच प्रकारातील असते. मूल वयात आले म्हणजे हीच कामवृत्ती त्याच्या जननेंद्रियात एकवटते. ही बालकाच्या कामविषयक विकासाची तिसरी व शेवटची अवस्था. पहिल्या दोन या आधीच्या



अनुक्रमणिका



अवस्था. यानाच infantile अवस्था म्हणतात. Infantile म्हणजे अपक्व असा अर्थ या ठिकाणी नाही. पहिल्या दोन अवस्थातून बाहेर येऊन मनुष्याचा कामगंड जेव्हा नैसर्गिक कामवस्तूकडे वळतो तेव्हा त्याची मानसिक प्रकृती समतोल झाली असे फॉइड समजतो. याच मानसिक प्रकृतीला त्याने genital character असे नाव दिले आहे. Genital character च्या बाबतीत बोलताना फॉईड असे म्हणतो की ज्या व्यक्तीच्या कामगंडाची वाढ समतोल होत असते ती व्यक्ती स्वतःच्या लैंगिक समाधानाइतकेच महत्त्व लैंगिक जोडीदाराच्याही समाधानाला देत असते. अशा व्यक्तीच्या भावना लहानपणातल्यासारख्या मातेच्या वा पित्याच्या प्रतिमेत अडकलेल्या नसतात. त्या या प्रकारच्या प्रतिमांच्या पाशातून बाहेर निघालेल्या असतात व त्याना वास्तविक स्थिती आलेली असते. कामवृत्तीची सर्वांगीण व समतोल वाढ म्हणजे कामव्यवहारातील स्वतःच्या जबाबदारीची जाणीव, लैंगिक जोडीदाराच्याही समाधानाची आठवण, स्वार्थीपणाचे उच्चाटण इत्यादि. भविष्यात त्या ज्या काल्पनिक भूस्वर्गाची कल्पना मारक्यूज मांडतात त्या भूस्वर्गामध्ये कामवृत्तीची पूर्ण वाढ नसेल. तर कामवृत्ती आधिच्याच स्थितीत अडकून राहणार असेल. मारक्यूज याना कामवृत्तीच्या ठेवणीत जबाबदारी यावयास नको आहे. त्याना बालकाच्या उच्छृंखलपणाने प्रौढानीही जगावे असे वाटते. ही स्थिती मानसिक वाढीच्या दृष्टीने उलटया चालिची आहे. तीत पुढे जाण्याऐवजी मागे येणे आहे. थोडक्यात हा मानसिक आरोग्याचा प्रकार नसून तो मानसिक आजाराचा प्रकार आहे. प्रौढपणी एखाद्या प्रौढाने आपल्या प्रौढपणाचा त्याग करावा आणि मानसिक बालपण स्विकारावे तसे ते आहे. मारक्यूज ज्या भूस्वर्गकल्पनेचे चित्र रंगवितात तो भूस्वर्गस्वप्न हे वास्तवाबरोबरचे समायोजन नसून ते वास्तवापासूनचे पलायन आहे. रूसो व मार्क्स काही प्रमाणात स्वप्नरंजन करीत असले तरी वास्तवाबरोबरची अशा प्रकारची पूर्ण फारकत त्यात नाही. वास्तव ते नाकारीत नव्हते. वास्तवाविषयीच्या स्वप्नरंजनाबरोबरच वास्तवाच्या पुनर्रचनेची कल्पनाही तेथे आढळते. मारक्यूज वरच्या टप्प्यावरची स्थिती टाकून देऊन त्यापूर्वीच्या खालच्या टप्प्यावर येऊ पाहतात. एखाद्या प्रौढ इसमाने आपले प्रौढपण टाकून पूर्वीची बालिश स्थिती उत्तम मानावी तसे हे आहे. या प्रत्यागमनेच्या अवस्थेला चांगले म्हणूनच फक्त मारक्यूज थांबत नाहीत, तर त्याचे एक तत्त्वज्ञान ते बनवू पाहतात. मारक्यूज याना जी स्थिती अभिप्रेत आहे त्या स्थितीला ते तत्त्वज्ञानातील कोटीचे स्वरूप देऊ पाहतात व तिच्या साह्याने एक बौद्धिक समर्थन आणि

वेदांत तयार करून तो मानवजातीच्या माथी मारू पाहतात. अर्थात जित वास्तवावरोवरचा संवंध संपूर्णपणे तुटलेला आहे अशी स्थिती प्रत्यक्षात येऊ शकेल की काय ही शंकाच आहे. समजा उद्या मारक्यूज याना अभिप्रेत असणारी क्रांती घडून आली तरीसुद्धा मारक्यूज याना हवी आहे तशा प्रकारची लोकांची मनोभूमिका त्या क्रांतीवरोवरच तयार होईल असे नाही. कारण क्रांती जरी यशस्वी झाली तरी क्रांतीत सांगितलेल्या नमुन्यावरहुकूम लोकांचे मनही वदलून जाईल असे नाही. मनुष्याचे मन पूर्वीच्याचप्रमाणे आणखी कितीतरी काळ राहणार असेल. मारक्यूज यांच्या प्रतिपादनाप्रमाणे भांडवलशाही सुवत्ता व श्रीमंतीमुळे मनुष्याचे मन विकृत बनून त्याच्या सहजप्रवृत्ती विघडून गेल्या आहेत. पण ही भांडवलशाही नष्ट झाली म्हणून हे विघडलेले मन आणि विकृत झालेल्या सहजप्रवृत्ती आपोआप मार्गावर येतील असे नाही. अशा प्रकारचा कार्यकारणभावात्मक संवंध त्यांच्यामध्ये नाही. भांडवलशाहीमुळे सहजप्रवृत्तींची विकृती येते. पण भांडवलशाही गेली म्हणजे ती विकृती जात नाही. जाणार नाही. त्यासाठी वेगळे उपचार करावे लागतील. भांडवलशाही समाज अदृश्य होताक्षणी " विकृत बनलेल्या सहजप्रवृत्ती लगेच नैसर्गिक स्थितीत येत नसतात. " सर्वत्र हेच आढळून आले आहे. जेथे पूर्वी भांडवलशाही समाज होता व तो समाज जाऊन जेथे कम्युनिस्ट समाज आला तेथेही जनमानसात पूर्वीच्या मनोधारणेचे—भांडवलशाही वृत्तीचे—अवशेष उरलेलेच आहेत. " नव-मानव " इतक्यात जन्माला येणे शक्य नाही. मारक्यूजसारखे मानवजातीचे नवे मुक्तिदाते नवमानवाच्या निर्मितीचा म्हणजेच " मानवाच्या दूषित जाणिवेचा " प्रश्न कशा प्रकारे सोडविणार आहे ते कळत नाही. कदाचित माओने जसे लाल रक्षकांचे सैन्य उभारले तसे मारक्यूज लाल-मानस-रक्षकांचे सैन्य उभारणार असावेत व तसे सैन्य उभारून लोकांची मनोयंत्रे त्या सैन्याच्या ताव्यात देणार असावेत.

× × × ×

युटोपियाच्या कल्पनेशी क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचा संवंध मागेच जोडण्यात येऊ लागला होता. केव्हापासूनच क्रांतीच्या मार्गाने युटोपिया प्रस्थापित होत असतो अशा प्रकारच्या शिकवणुकीचे वारे वाहू लागले होते. एकोणिसाव्या-विसाव्या शतकात हेच मत पण अधिक जोराने वोलले जाऊ लागले. आणि, क्रांती आणि युटोपिया यांचा संबंध बौद्धिक दृष्ट्या अधिक दृढ केला गेला. याच परिस्थितीला अनुलक्षून पिटर स्टुव्ह हा लेखक मोठ्या वेरकीपणाने असे लिहितो की " पुढे पुढे क्रांतीची कल्पना हाच एक युटोपिया—एक भूस्वर्ग-

कल्पना-बनला. पिटर स्टुव्हचे म्हणणे पूर्णतः बरोबर आहे. प्रारंभी जरी युटोपिया आणि क्रांती या दोन वेगवेगळ्या वस्तू होत्या तरी कालांतराने त्या इतक्या एकजीव बनल्या की क्रांती म्हणजेच युटोपियाची प्राप्ती असेच सर्वसामान्यांना आणि बुद्धिजीवी असामान्यांनाही वाटू लागले. युटोपिया आणि क्रांतीची कल्पना या दोन कल्पनांच्या बाबतीत हा प्रकार नेहमीच घडतो. साधन आणि साध्य येथे एकरूप बनतात-आदर्श समाजाच्या स्वप्नामध्ये ज्या भावना गुंतविल्या गेलेल्या असतात, त्या, चित्राकडून काढून घेतल्या जाऊन त्या चित्रात वर्णन केलेली व्यवस्था आणण्यासाठी जे तंत्र वापरण्यात येणार असते त्या तंत्रामध्ये गुंतू लागतात. तितक्या उत्कटतेने आदर्श भावी समाजचित्रावर लोक प्रेम करीत असतात तितक्याच उत्कटतेने ते पुढे पुढे त्या समाजचित्राच्या प्राप्तीच्या साधनावर प्रेम करू लागतात. साधनच हळूहळू साध्याची जागा घेऊ लागते, भावी काळात जो कोठला आदर्श समाज त्यांना हवासा वाटत असतो, त्या समाजापेक्षा त्या समाजाच्या प्राप्तीसाठी जे बरेवाईट तंत्र ते वापरणार असतात ते तंत्रच त्यांच्या प्रीतीला अधिक कारण होते. तंत्राचे फलित नव्हे तर तंत्रच त्यांच्या दृष्टीत पवित्र बनते. साध्य जणू विसरले जाते. साधनच जाणीव व्यापून वसते. क्रांतीचे स्वप्न पाहणारांच्या दृष्टीत मुळात अनिश्चित असणारे भवितव्य आता अगदी पक्के होऊन जाते. वास्तविक या ठिकाणी भविष्य अनिश्चित आहे. युटोपियात जरी कितीही उज्ज्वल भविष्यकाळ रंगविलेला असला तरी तो भविष्यकाळ हे वास्तव नव्हे. तो तसाच्या तसा घडेल अथवा वेगळाही घडेल. परंतु युटोपिया-विषयीची धार्मिक श्रद्धा एकदा का युटोपियावरून क्रांतीच्या कल्पनेवर स्थिर झाली की क्रांती म्हणजेच इच्छापूर्ती असे लोकाना वाटू लागते. युटोपियाच्या बाबतीत जी मनाची दोलायमान अवस्था असते ती नंतर नाहीशी होते. क्रांतीने ते जसेच्या तसे घडणार असे वाटू लागते. क्रांती अपेक्षिणारांच्या दृष्टीत अनिश्चिततेचे रूपांतर निश्चिततेत होते. क्रांतीच्या फलिताविषयी ही मानसिक ठामपणाची भावना निर्माण झाली म्हणजे युटोपिया ही एक उद्धारक स्थिती आहे अशी जी अर्धवट धार्मिक स्वरूपाची श्रद्धा त्याना युटोपियाच्या कल्पनेविषयी वाटत असे तीच धार्मिक स्वरूपाची श्रद्धा आता त्याना क्रांती याही विषयासंबंधी वाटू लागते. या घटनेचे दोनतीन परिणाम होतात. सत्ता हस्तगत करण्याच्या कामात हिरिरीने भाग घेता येतो. कारण तसे करून आपण युटोपिया जवळ आणीत आहोत ही श्रद्धा असते. दुसरा परिणाम असा की कुठल्याही राजकीय सरकारला सत्तेवर येताक्षणी ज्या

प्रश्नांकडे तातडीने लक्ष द्यावे लागते व ते प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने काही उपाययोजना आखावी लागते त्या प्रश्नांकडे सहजगत्या दुर्लक्ष करता येऊ लागते. कारण युटोपियन समाजात हे प्रश्न निर्माणच होणार नाहीत ही सैद्धांतिक श्रद्धा आता युटोपिया आणि क्रांती एकरूप मानली गल्यामुळे क्रांतीच्या वतीने कार्य करीत असते. वास्तविक क्रांती म्हणजेच युटोपियाचे आगमन अशा प्रकारची भावडी समजूत जर त्यांनी स्वतःची करून घेतली नसती तर क्रांतीबरोबर या व्यावहारिक प्रश्नांचा विचार त्यांनी केला असता. पण या ठिकाणी हा जनतोद्धार क्रांतीनंतर आपोआपच येणार आहे अशी श्रद्धा ते बाळगू लागल्याने कोठल्याही मानसिक खंतीवाचून ते या प्रश्नांकडे दुर्लक्ष करू शकतात आणि ध्येयपूर्तीत क्रांतीला आलेले अपयश पाहून वास्तविक जिथे क्रांतीच्या युक्तायुक्ततेविषयी विचार करावयास ते प्रवृत्त व्हावयाचे तिथे पूर्वीपेक्षाही अधिक उत्साहाने ते क्रांतीच्या तत्त्वज्ञानाकडे आकृष्ट होत जातात. "सच्च्या श्रद्धाधारकांची" ही रीतच आहे म्हणा ! "सच्च्या श्रद्धाधारकाला" त्याच्या श्रद्धेच्या विषयासंबंधी अनुभव जेवढा वाईट येतो तेवढी त्याची श्रद्धा अधिक दृढ बनते. त्याला असे वाटते की हितशत्रूच्या कारवायांमुळे हे अपयश आले. आपल्या श्रद्धाविषयाच्या अंगभूत दोषामुळे नव्हे. कल्पितांचे विषय पालटले तरी कल्पितरचनांची शक्ती कमी होण्याऐवजी वृद्धींगतच होत असते. हे असे का व कसे घडते आणि क्रांतिविषयीचा निराशाजनक वास्तव अनुभव घेतला जाऊनही क्रांती या विषयावरील लोकांची भक्ती वाढते कशी या रहस्याचा शोध घ्यायचा झाल्यास क्रांतीपूर्वी आणि क्रांतीनंतर अनुक्रमे कोणकोणत्या मुद्यांवर लोकांचे लक्ष केंद्रित करण्याचा प्रयत्न होत असतो या विषयाचा बारकाईने अभ्यास करावा लागेल. क्रांतीच्या सरकाराची स्थापना झाल्यानंतर क्रांतीचा मार्ग चोखाळण्यापूर्वी कोणत्या प्रकारची उद्दिष्टे आम्ही स्वतःसमोर ठेविली होती याचा जर आढावा क्रांतीत भाग घेणारे लोक क्रांतीनंतर स्वतःशी घेत जातील तर क्रांतीवरची श्रद्धा टिकवून ठेवणे त्याना जमले नसते. परंतु तसे घडत नाही. क्रांतीला प्रारंभ करण्यापूर्वी भविष्यकाळाविषयीचा आपला युटोपिया कोणता होता व त्या युटोपियापैकी कोणत्या गोष्टी प्रत्यक्षात आल्या याचा विचारच क्रांतिकारी मंडळी करीत नाहीत. उलट क्रांतीच्या साधनांवरच ते आपले सर्व लक्ष नि सर्व भावना केंद्रित करतात. त्यामुळे क्रांतीच्या सामर्थ्याविषयीची श्रद्धा दीर्घकाळ टिकून राहावयास मदत होते. दुसरी गोष्ट अशी की मनुष्ये अपयशाचेही बौद्धिक बनवितात व



अनुक्रमणिका

त्या अपयशालाच यशासारखे मानू लागतात. यालाच फेस्टिंजर प्रभाव[१] ( festinger effect ) म्हणण्याची प्रथा आहे. तर हा फेस्टिंजर प्रभाव घडवून आणणारे जे असंख्य मानसिक घटक आहेत, त्या मानसिक घटकांमुळे जरी क्रांतिवादी कल्पना टिकून राहत असली तरीसुद्धा क्रांतीच्या कल्पनेचा प्रसार होतो त्याला " सच्च्या श्रद्धाधारकांबरोबरच " इतर दुसऱ्या एका वर्गाच्या अस्तित्वाचीही गरज असते. क्रांतीच्या तत्त्वज्ञानावर श्रद्धा ठेवणारे " सच्चे श्रद्धाधारक " आस्तित्वात आहेत याच केवळ भांडवलावर क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचा मोठ्या प्रमाणावरील प्रसार होण्यासारखा नसतो. हा जो दुसरा वर्ग आम्ही म्हटला तो वर्ग जर आस्तित्वात नसेल तर क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचा प्रभाव चालणार नाही. या दुसऱ्या वर्गाला वाटणारे कांतीविषयक आकर्षण परिस्थितीनुरूप बदलत असते. ते कधीच स्थिर राहत नसते. मात्र परिस्थिती म्हणजे केवळ सामाजिकच परिस्थिती असा अर्थ नाही. विशिष्ट देशाच्या विशिष्ट राजकीय आणि सांस्कृतिक परंपरा, तसेच त्या देशात क्रांतीवादी तत्त्वज्ञानाला असणारी विश्वासार्हता इत्यादि अनेक घटकांचा वाटा कोठल्याही इतिहासविशिष्ट क्रांतीवादाच्या यशात आणि अपयशातही असतो. क्रांतीकडे पाहण्याची पारंपरिक मार्क्सवादी भूमिका अशी—समाजामध्ये प्रबल असा भांडवलदार वर्ग आणि कमजोर असा श्रमजीवी वर्ग असे दोन वर्ग अस्तित्वात असून भांडवलदार वर्गाकडून श्रमजीवी वर्गाची लुबाडणूक, छळणूक व शोषण होत असेल तर क्रांतीची शक्यता तेथे अधिक प्रमाणात असते. क्रांती होण्यासंबंधीचे हे पारंपारिक मार्क्सवादी सूत्र क्रांतीवादी नवे लोक आता मान्य करीत नसतात. वर्ग आणि आर्थिक परिस्थिती या दोन घटकांशी जखडून असलेली मार्क्सवादी क्रांतीची नाळ डाव्या नव-सैद्धांतिकानी तोडून टाकली आहे.

---

१. प्रा. फेस्टिंजर यांनी राजकीय किंवा धार्मिक विश्वासांच्या संदर्भात एक विशेष अशा प्रकारचे प्रमेय मांडले आहे. प्रा. फेस्टिंजर म्हणतात की राजकीय अथवा धार्मिक पंथांचे भाकित खोटे ठरले, की त्या-त्या पंथाचे अनुयायी त्या अपयशाचाच एक वेगळा असा अर्थ काढून दाखवितात, व असे भासवितात की जणू ते अपयश हाच त्या भाकिताचा गर्भित अर्थ होता. हे जे बौद्धिकीकरण केले जाते त्याला फेस्टिंजर प्रभाव असे नाव दिले जाते.



अनुक्रमणिका

क्रांतीचे घडणे वर्ग आणि विशिष्ट आर्थिक व्यवस्था याच केवळ दोन घटकांच्या आस्तित्वावर ते आता अवलंबून ठेवीत नाहीत. क्रांती घडून येण्यासाठी विशिष्ट आर्थिक परिस्थितीच अवश्य असते असे ते मानीत नाहीत. मार्क्सच्या प्रतिपादनाप्रमाणे श्रमजीवींच्या पिळवणुकीमुळे व शोषणामुळे क्रांतीला आवश्यक ती परिस्थिती निर्माण होते. लेनिनने त्यात जनतेच्या स्वेच्छेच्या आणि इच्छाशक्तीच्या घटकांची भर घातली होती. आता रेजिस डेब्रे या मार्क्सवादी विचारवंताने स्वेच्छा आणि शोषक परिस्थिती हे घटक पृथक केले असून जनतेची इच्छा असेल तर केव्हाही क्रांती घडू शकते असे मत मांडले आहे. क्रांतीची नवी तंत्रे अस्तित्वात येत आहेत. या नव्या तंत्रांमुळे क्रांतीवरोवर क्रांतीने आश्वासिलेली सहस्र वर्षाचो परमेश्वरी राज्ये जरी अवतरत नसली तरी परमेश्वरीं राज्यांच्या संस्थापनेसाठी आवश्यक असणारी अल्पसंख्यांकांची हुकूमशाही आणण्यात मात्र ती मागे नाहीत. क्रांती व क्रांत्युत्तर येणारा भूस्वर्गलोक या दोन कल्पनांचा अभ्यास जर आपण केला तर त्यात असे आढळून येते की, फार पूर्वी क्रांती आणि क्रांतीच्या आश्वासनांची परिपूर्ती या दोन घटनांमध्ये काही अवधि गृहित असे. याचाच अर्थ क्रांती आणि क्रांतीनंतर प्रस्थापित होणार असणारा भूस्वर्गलोक या दोन पृथक् कल्पना आहेत याची सुस्पष्ट जाणीव तेव्हा लोकाना होती. आता क्रांती व क्रांतीनंतर येणारी सुवत्तेची स्थिती यात भेद राहिलेला नाही. क्रांती म्हणजेच सुवत्तेचे आगमन अशी समजूत आता रूढ झाली आहे. क्रांती ही भूस्वर्गाकडे नेणारी नजीकची पाऊलवाट असेल तर क्रांतिवादी तत्त्वज्ञानानी प्रथम बूर्झ्वा क्रांती व त्याच्यानंतर साम्यवादी क्रांती हा क्रांती होण्याचा अनुक्रम पाहिला होता. हळूहळू साम्यवादी क्रांतीकरिता त्या क्रांतीच्या अगोदर 'बूर्झ्वा क्रांती" घडावी लागते ही कल्पना टाकून दिली गेली व साम्यवादी क्रांती एकदमच घडून येऊ शकते असे म्हटले जाऊ लागले. पुढे तर काय, साम्यवादी क्रांतीकरिता आवश्यक ती राजकीय, सामाजिक, आर्थिक परिस्थिती असली तरच साम्यवादी क्रांती घडू शकते, ही साम्यवादी क्रांतीकरिता आवश्यक मानली जाणारी अटही टाकून देण्यात आली. क्रांतीसाठी क्रांतीला आवश्यक अशा पोषक पूर्वपरिस्थितीची वाट पाहण्याची गरज नसते. "दहशतीचे राजकारण" हाच क्रांतीकडे घेऊन जाणारा नजिकचा मार्ग आता बनला आहे. त्याच्यासाठी अर्थात ग्रामीण व नागर गनिमी सैनिकांची केंद्रे स्थापन करता आली म्हणजे पुरे असते. दुर्दैव ! क्रांती कधी होऊ शकते, ती केव्हा घडवून आणायची इत्यादि प्रश्नांच्या बाबतीत मार्क्सवादी क्रांतिवाद्यांच्या अनेक पिढ्यांनी

आजवर जो तर्कांचा कीस काढला, या वा त्या प्रमेयाचा जो पिठ्या पाडला नि शब्दांचा छल केला, हजारो कागदपत्रे तपासून एका क्षुल्लक स्वल्प-विरामाचे अचूक स्थान निश्चित करण्यासंबंधी जे शाईचे समुद्र आटविले आणि क्रांत्यांच्या शक्यतांचे विश्लेषण करण्यात आणि अंदाज वर्तविण्यात जे दिवस घालविले नि वाद केले, ते वादासाठी खर्ची पडलेले सर्व दिवस आणि ते सर्व वाद अशा प्रकारे फुकट जावेत ना! त्या सर्व खटाटोपांवर नि वादांवर पाणी पडावे ना! आणि हे वाद आणि वाक्छल खोटे आहेत, क्रांती करायची असेल तर त्यासाठी "दहशतीचे राजकारण" असले की काम भागते; हत्या, विध्वंस, हिंसा, हाच क्रांतीकडे घेऊन जाणारा सर्वात जवळचा मार्ग असतो, बाकी सर्व चौकशा केवळ चांभारचौकशा असतात, हेच शेवटी या क्रांतीवाद्यांनी आज सिद्ध करून दिले आहे. दहशत आणि दहशतवाद हाच क्रांतीकडे नेणारा सर्वात जवळचा मार्ग होय हे जे नवीन प्रमेय सिद्ध झाले त्यानें आजवरचे क्रांतीविषयीचे सर्व विवेचन असंबद्ध बनविले आहे. ज्या वादासाठी मार्क्स-वाद्यांनी आपले रक्त आटविले ते सर्व वाद नव्या डाव्यांनी एकजात अप्रस्तुत करून टाकले आहेत. पण याच्यात तसे आश्चर्य मानण्यासारखे काही नाही. कारण इतिहासात घडून आलेल्या क्रांत्यांचा व त्यातील एकूणएक घटनांचा जर तुम्ही अभ्यास केला तर तुम्हाला असे दिसून येईल की, क्रांती कधी करावी, ती कशी करावी यासारखे वाद नेहमीच असंबद्ध होते. क्रांती करणारांची क्रांती करावी ही दुर्दम्य इच्छा आणि क्रांतीच्या कल्पितावरचा त्यांचा दृढविश्वास एवढ्या दोनच बाबी क्रांतीच्या बाबतीत खऱ्या असतात. इतर सर्व अप्रस्तुत असते. या एका बाबतीत आमचे नवे क्रांतिवादी आणि लेनिन वगैरे जुने क्रांतिवादी यांच्यामध्ये तसा कोठल्याही प्रकारचा फरक नाही. सारांश, क्रांती करू निघालेल्यांच्या बाबतीत क्रांतीच्या कल्पिता-वरील त्यांची निष्ठा आणि श्रद्धा किती दृढ आहे आहे आणि क्रांती करावी ही त्यांची इच्छा किती निर्धाराची आहे एवढ्या दोन गोष्टींना महत्त्व असते. इतर सर्व गोष्टी या फाफटपसाऱ्यासारख्या असतात. लेनिनसारखे जुने क्रांति-वादी आणि हे नवे क्रांतिवादी यांच्या क्रांतीच्या राजकारणासंबंधी जो फरक आहे तो फक्त एवढाच की, जुने क्रांतिवादी नव्या क्रांतिवाद्याइतक्या उघड नागवेपणाने आपल्या खऱ्या हेतूंचे प्रदर्शन करीत नाहीत. जुने क्रांतिवादी क्रांतीमागचे आपले हेतू लपवून ठेवतात किंवा त्या हेतूंना तत्त्वज्ञानाचे आभरण चढवितात. जुने क्रांतिवादी असोत अथवा नवे क्रांतिवादी असोत ज्यांना क्रांती हवी असते ते शेवटी क्रांती करावयाचा प्रयत्न करणारेच असतात. जुने क्रांती-



अनुक्रमणिका



वादी हे काम थोड्या आडवळणाने करतात. क्रांती आपण काही उदात्त हेतूंच्या परिपूर्तीसाठी करीत आहोत असे भासवितात. नवे क्रांतिवादी तसे करण्याचीही तसदी घेत नाहीत. ते सरळ म्हणतात की, आम्हाला लगोलग क्रांती हवी आहे आणि आम्ही ती दहशतीच्या वा कोठल्याही मार्गाने करणार आहोत. बस्स ! क्रांतीचे समर्थन नाही की कोठली उडवाउडवीची तत्त्वज्ञाने नाहीत. क्रांती म्हणजे क्रांती ! हा जुने व नवे यांच्यातील फरक होय.

× × × ×

सोव्हिएट युनियनबरोबरचा क्रांतीच्या कल्पिताचा संबंध संपुष्टात येताच पश्चिमेत क्रांतिवादाचे पुनरुज्जीवन घडून आले. क्रांती म्हणजे सोव्हिएट क्रांतीगत क्रांती हा समज पश्चिमेतील लोकांच्या मनातून जेव्हा कमी झाला तेव्हा तेथे क्रांतिवादात पुन्हा आस्था उत्पन्न झाली. जेव्हा ही गोष्ट घडून आली तेव्हा क्रांती या शब्दाला पाश्चिमात्य बुद्धिमंत मंडळीत परत एकदा कल्पिताची प्रतिष्ठा प्राप्त झाली. विशेषतः "स्वतःसंबंधीची जाणीव शापित" वाटते म्हणून ज्यांना सार्त्र (व हेगेल) बुद्धिवादी समजतात त्या बुद्धिवादी मंडळीत "क्रांती" या शब्दाला हा कल्पिताचा ध्वनी विशेषत्वाने आलेला होता. अर्थात सार्त्र आणि त्याच्यासारख्या बुद्धिमंत मंडळींना क्रांतीच्या कल्पिताने जरी नव्याने मोहिनी घातली होती तरी त्या क्रांती या शब्दाने सगळेच साहित्यिक भारून गेले होते असे नाही. बरेच महत्त्वाचे साहित्यिक या शब्दाने व त्यातील कल्पिताच्या प्रभावाने फारसे फसलेच नव्हते ! मात्र त्याचे कारण दुधाने तोंड पोळले की, मनुष्य ताकही फुंकून पितो या अनादी सत्याने त्याना भारले व म्हणून ते तसे वागत होते असे नव्हे. (अर्थात त्याचाही वाटा त्यात होता) किंवा तारुण्यात डावे असणारे लेखक प्रौढत्वात उजवीकडे झुकू लागतात याही जागतिक परिस्थितीचा तो परिणाम नव्हता (अर्थात याचाही वाटा त्यात होता) तर लेखकांच्या ह्या पिढीने क्रांती या घटनेचा जो सम्यक् अनुभव घेतलेला होता त्या अनुभवामुळे क्रांती या शब्दाची त्या पिढीने धास्ती घेतली होती व सहसा त्या शब्दाला ती पिढी बळी पडू इच्छित नव्हती. क्रांती ही वस्तू वाटते तेवढी कल्याणकारक नसते; किंबहुना अंती तिच्यामुळे भ्रमनिरासच पदरी येणार असतो या प्रकारचे क्रांतीविषयक भ्रमनिरासाचे वाङ्मयलेखन कोएस्लर. ऑरवेल, सीलोन, स्पर्बर यांनी सुरू केले आणि क्रांतिविरोधक साहित्याला प्रारंभ झाला. कोएस्लर वगैरेंच्या क्रांतिविरोधी साहित्याचा मोठा प्रभावी परिणाम लेखकवर्गावर झाला होताच. परंतु विद्यमान साहित्यिकांपैकी बरेच बडे साहित्यिक क्रांतीच्या कल्पनेपासून दूर राहण्याचे



अनुक्रमणिका

मुख्य कारण म्हणजे क्रांतीच्या अनुभवाचा त्यांच्या मनावर झालेला सहसा न पुसू शकणारा परिणाम. या परिणामामुळे ते क्रांतीच्या कल्पनेपासून लांब राहिले होते. समकालीन घटनांच्या जाणीवेमुळे क्रांतिकारी घडामोडीं-संबंधी व त्या घडामोडीतील लेखकांच्या सहभागासंबंधी त्यांचा उत्साह आटोक्यात राहिला होता. उदा., लेखक आणि क्रांतिकारी घडामोडीतील लेखकाची कर्तबगारी याविषयी बोलताना ऑडेन हा कवी काय म्हणतो ते एका. तो म्हणतो की "कवी हे जगाने जगाचे न ओळखलेले भाग्य-विधाते असतात हे म्हणणे काही खरे नाही." "राज्यकर्त्यांचे गुप्त हेर मात्र तसे असतात." सॉल बेलो यांच्या Mr. Sammler's Planet या कादंबरीत प्रकट झालेले पुढील विचारही ऑडेनच्या विचाराइतकेच वैशिष्ट्यपूर्ण आहेत. सॉल बेलो लिहितात की, "अशी एकही क्रांती आपणास आठवत नाही की जी न्याय, समता, स्वातंत्र्य व शुद्ध मांगल्य यांच्या नावे केली गेली नव्हती आणि क्रांतीचा असा एकही शेवट आपणास आठवत नाही की ज्यात पूर्वीपेक्षा अधिक भयानक शून्यवाद व जीवनाविषयीचा द्वेष आणला गेला नव्हता."

पश्चिमेतील जुने कम्युनिस्ट लेखक पक्षाशी आजही एकनिष्ठ असतात. पण क्रांतीविषयीच्या भ्रमनिरासाचे प्रतिबिंब त्यांच्याही साहित्यात उमटलेले दिसते. आरगॉं हा जुना कम्युनिस्ट साहित्यिक त्याने दिलेल्या मुलाखतीत असे बोलतो की "साम्यवादी वास्तववादाला आपण नेहमीच विरोध करीत आलो आहोत." "ग्लॅडकोव्ह यांचे Cement नावाचे पुस्तक जर त्या वेळी आपण वाचले असते तर आपण, कम्युनिस्ट पक्षात कधीही शिरलो नसतो." याच आरगॉं महाशयांनी पूर्वी साम्यवादी वास्तववादाच्या बाजूने लिखाण केलेले आहे आणि त्यात ते असे म्हणाले आहेत की, "स्टॅलिनवादाने माझ्या-सारख्या लोकांच्या मनात कम्युनिझमसंबंधीच्या विश्वासाची परिस्थिती निर्माण केली ही गोष्ट खरी आहे. परंतु आज स्टॅलिनवादाचा जो अर्थ माझ्या मनात आहे. त्या अर्थाने मी तेव्हा स्टॅलिनवादी होतो असे कोणीही म्हणू शकणार नाही."

आयुष्याचे सिंहावलोकन करताना आपल्याच कृतींचे नवे आणि समयो-चित अर्थ काढून दाखविण्याच्या बाबतीत शब्दमीमांसेच्या शास्त्रासारखे उपयुक्त हत्यार दुसरे कोठलेही नसावे. याच महोदयांनी रशियन गुप्तपोलिसांचे गुणसंकीर्तन करणारी कविता एकोणिसशे तिशीत लिहून प्रसिद्ध केली होती आणि स्टॅलिनच्या मृत्यूनंतर पिकासोने काढलेले स्टॅलिनचे चित्र आमच्या

प्रिय नेत्याचा पुरेसा आदर करणारे नाही म्हणून त्याच्यावर कडाडून हल्ला चढविला होता. आता तेव्हा या गोष्टी करणाऱ्या लेखकाने आज असे लिहावे हे अर्थसूचक व पुरेसे बोलके आहे.

आपलेच शब्द फिरविणारा आरगाँ हा काही अशा प्रकारचा एकटाच लेखक नाही. स्टॅलिनमहाराजांचा पोवाडा लिहिणाऱ्या पाब्लो नेरुदा याही कवीने अशाच प्रकारचे वर्तन केलेले आहे. त्यानेसुद्धा स्टॅलिनवादाच्या विरुद्ध तक्रार केलेली आहे. त्याची तक्रार ही की " स्टॅलिनवाद्यांनी त्याच्यावर घोर अन्याय केलेला आहे. "

स्टॅलिनच्या काळातल्या स्टॅलिनवादाविषयी आत्यंतिक भक्तिभाव दाखविणाऱ्या दोन जुन्या स्टॅलिनवादी वाङ्मययोद्धयांना स्टॅलिनच्या शिकवणु-कीविषयी अशी प्रतिपादने कराविशी वाटतात याचाच अर्थ असा की सोव्हिएट युनियनपुरते सोव्हिएट युनियनचे क्रांतिवादी आकर्षण संपुष्टात आलेले आहे. क्रांतीला स्फूर्ती देणारा एक देश म्हणून त्या देशाचे महत्त्व मृतवत झाले आहे. किंबहुना या लेखाच्या प्रारंभी साहित्य व क्रांतिवरच्या सोव्हिएट सरकारच्या ज्या ग्रंथाचा उल्लेख आपण केला आहे, त्यात पूर्वीच्या एकूण पाश्चात्य मातब्बर कम्युनिस्टांपैकी किंवा ( एके काळी ) सहप्रवाशात जमा असणाऱ्यांपैकी फक्त सातांचाच उल्लेख " खरे साम्यवादी, वास्तविक भूमिका " धारण करणारे म्हणून उल्लेख करण्यात आला आहे. सरकारी अधिकृत नामावलीत फक्त सातांची वर्णी लागावी आणि एके काळी कम्युनिस्ट म्हणून गाजलेल्या अनेक मातब्बरांची नावेही गाळली जावीत याचा अर्थदेखिल हाच आहे. या सातांपैकी सहाजण रोमाँ रोलाँ, थिओडोर ड्रेझर, हेन्रिख-मान, अर्नोल्ड झ्वाईग, पॉल एल्युआर, बर्टोल्ड ब्रेख्ट–हे सारेजण सुदैवाने मेलेले आहेत. सातवा लुई आरगाँ. क्रांती आणि साहित्यावरच्या उपरिनिर्दिष्ट पुस्तकाच्या नव्या आवृत्तीमध्ये त्याचे नाव शिल्लक राहील की गाळले जाईल याची आज खात्री देता येण्यासारखी नाही ( अर्थात याही पुस्तकाची सुरुवात " जागतिक वाङ्मयावर त्या महान आक्टोबर क्रांतीचा प्रचंड प्रभाव पडला आहे " याच वाक्याने होणार आहे यात शंका नाही. )

साहित्याच्या सौंदर्यासंबंधीच्या मार्क्सवादी सौंदर्यशास्त्राच्या बाबतीत तर बोलावयास नको इतके त्याचे दिवाळे वाजले आहे. मार्क्सवादी कला-सौंदर्य-शास्त्री लुकाक्स ह्यांनी सोल्झेनित्सिन या रशियन कादंबरीकाराच्या One Day in the life of Ivan Denisovich या कादंबरीचा एकमेव सोव्हिएट " साम्यवादी-वास्तववादी " पुस्तक असा आकस्मिक गाजावाजा सुरू करावा

यातच ते आले. लुकाक्स हे एकेकाळचे स्टॅलिनी कला-सैद्धांतिक. पण त्यांची साहित्यिक अभिरुची बूर्ज्वा जातीची. हे अशा प्रकारचे लुकाक्स जेव्हा सोल्झेनित्सिनच्या कादंबरीचा आकस्मिक गाजावाजा सुरू करतात तेव्हा त्यात विरोधाभास तर आहेच परंतु त्यापेक्षाही अधिक काही आहे. हे अधिक काही असे. सोल्झेनित्सिन यांची ही वाङ्मयकृती अप्रतिम असून सोल्झेनित्सिन हे " साम्यवादी-वास्तववादी " विचारवंत आहेत असा युक्तिवाद लुकाक्स करतात आणि " मूर्तस्वरूपातील सामान्य " (Concrete Universal) नावाच्या आपल्या वाङ्मयविषयक संकल्पनेचे सोल्झेनित्सिन यांचा नायक डेनिसोविच हा एक उदाहरण आहे असे पुढे सांगतात. सामान्यतः विशिष्ट हे मूर्त आणि सार्वत्रिक सामान्य हे अमूर्त असे तत्त्वज्ञानात व शास्त्रात मानण्याचा प्रघात आहे. लुकाक्स यांनी " सामान्य मूर्तीची " कोटी ही एक नवीनच कोटी सूचित केलेली आहे. कांट वगैरेंच्या तत्त्वज्ञानात तीन प्रकारची विधाने मानायची रीत आहे. उदा., " सर्व 'क' 'ब' आहेत, " " काही 'क' 'ब' आहेत " आणि " हा 'क' 'ब' आहे " अशी तीन विधाने तिथे मानतात. यातील पहिले विधान " सामान्य " विधानात मोडते; दुसरे विशिष्टात व तिसरे व्यक्तिवाचक ( singular ) विधानात मोडते. लुकाक्स यांच्या सौंदर्यशास्त्रात " विशिष्ट " आणि " व्यक्तीवाचक " या दोन्ही कोटचा जवळजवळ समानार्थी आहेत. ते तिसरी कोटी " सामान्य मूर्तीची " किंवा speciality ची सुचवितात. लुकाक्स यांची सौंदर्यशास्त्रविषयक दुसरी मूलभूत कल्पना ही की कलाकृती ही एका अर्थाने वास्तवाचे प्रतिबिंब, वास्तवाची नक्कल असते. मात्र " कलाकृती म्हणजे वास्तवाचे प्रतिबिंब, " असे म्हणताना लुकाक्स प्रतिबिंबाचा स्वतःचा अर्थ अधिक स्पष्ट करतात व सांगतात की कलाकृतीमध्ये वास्तवाची संवेदना व त्या वास्तवाविषयीची कलाकाराची प्रतिक्रिया ही दोन्हीही अंगे आली तरच ती कलाकृती, कलाकृती या नावाला पात्र होते, अन्यथा नाही. म्हणजे नुसत्या बाह्य आकाराचे चित्रण हे कलाकृतीसाठी पुरेसे नसते. त्यात आकाराबरोबरच आशयही यावा लागतो. आता लुकाक्स यांच्या सोल्झेनित्सिन यांच्या " One Day—" कादंबरीकडे वळायचे तर असे म्हणता येईल की, लुकाक्स यांच्या मताप्रमाणे या कादंबरीचा नायक हा लुकाक्सप्रणीत Speciality च्या किंवा " मूर्त सामान्याच्या " वर्गातील नायक होता. या नायकाच्या चित्रणात रशियन जीवनाचे प्रतिबिंब आणि लेखकाची त्याविषयीची प्रतिक्रिया ही दोन्ही आली होती. म्हणून ते चित्रण खऱ्या अर्थाने कलाकृती होते. समजा, सोल्झेनित्सिन यांचा नायक

डेनिसोविच हा " मूर्त सामान्याच्या " वर्गातील उदाहरण आहे, कारण त्या नायकाच्या जीवनातली कन्स्ट्रेशन कँपची परिस्थिती ही सोव्हिएट रशियातल्या जीवनातले " मूर्त सामान्य " आहे हे लुकाक्स यांचे प्रमेय आपण मान्य केले, ( अर्थात लुकाक्स तसे उघड कोठेच म्हणत नाहीत ) तरी त्यामुळे इतर लेखकांपेक्षा सोल्झेनित्सिन यांची कलात्मक श्रेष्ठता कशात आहे याचें दिग्दर्शन होत नसते. कारण सोव्हिएट रशियातल्या इतर कित्येक " मूर्त सामान्यांच्या " चित्रणावर आधारलेल्या दुसऱ्याही कादंबऱ्या उपलब्ध आहेत. त्याना श्रेष्ठ का म्हणायचे नाही ? उदा. Dudinstev ची Not By Bread alone ही कादंबरी घ्या. या कादंबरीत सोव्हिएट रशियातल्या दुसऱ्या एका " सामान्य मूर्ताचे " चित्रण आहे. या कादंबरीचा नायक एक शास्त्रज्ञ आहे आणि त्याला त्याचा शोध प्रसिद्ध करायचा आहे पण प्रचलित राजवटीला तो शोध अमान्य असल्याने त्याला ते करता येत नाही. हेदेखिल " सोव्हिएट राजवटीतले " मूर्त सामान्यच असल्याने त्याचे चित्रण करणारी दुदिन्स्टेवची कादंबरी वास्तविक उत्तम कलाकृती गणली गेली पाहिजे. पण लुकाक्स तसे मानीत नाहीत. त्या कादंबरीची व कादंबरीकाराचा उल्लेखदेखिल ते करीत नाहीत. याचा अर्थ एवढाच आहे की मार्क्सवादी सौंदर्यशास्त्राचा पुरता बोजवारा उडालेला आहे.

अर्थात मार्क्सवादी सौंदर्यशास्त्राने इतक्या वर्षात अगदीच प्रगती केली नाही असे नाही. तशी त्यानें बरीच प्रगती केलेली आहे. उदा., पूर्वी जेव्हा मार्क्सवादी साहित्य–समीक्षा अभिजात साहित्याचे स्पष्टीकरण करू पाहत तेव्हा पुढीलप्रमाणे स्पष्टीकरणे देत असत. उदा., संर्वटिझ या कादंबरीकाराच्या Don Quixote या कादंबरीचे विश्लेषण करताना ते सांगत की आता दरिद्री बनलेल्या पण एकेकाळी उमराव असणाऱ्या वर्गाच्या हितसंबंधांचे प्रतिनिधित्व या कादंबरीत केलेले आहे किंवा Mickiewicz या कवीच्या Crimean Sonnets या कविता म्हणजे ओडेसा शेअरबाजारातल्या धान्याच्या चढउताराची गीते आहेत. या प्रकारची बालिश साहित्यिक स्पष्टी-करणे व समीक्षा हा मार्क्सवादी समीक्षेचा एकेकाळचा विशेष होता. त्या काळापासून ती आता खूप दूर आलेली आहे. अलिकडे हे विचार बूर्झ्वा आहेत, ती भूमिका बूर्झ्वा आहे अशा प्रकारची सरधोपट विधाने केली जात नाहीत. परंतु तरीही सौंदर्यशास्त्र या शास्त्राचे कलेचे समाजशास्त्र बनविले जाऊ नये म्हणून काय केले पाहिजे हा कायम प्रश्न मार्क्सवादी कलासमीक्षांपुढे सतावित आहेच ! सौंदर्याचे परिक्षण सौंदर्याच्या निकषावर करणे त्याना आजही जमत

नाही. प्रत्येक ठिकाणी त्याना समाजशास्त्रीय दृष्टीकोनाचाच उपयोग करावासा वाटतो. आणि ही परिस्थिती केव्हाची आहे ? तर ल्युसिए गोल्डमन आणि रोलां बार्थेज यांच्यासारख्या अतिशय सखोल विचार करणाऱ्या व दर्जेदार विचारवंतानी मार्क्सवादी सौंदर्यशास्त्र वरीलसारख्या ढोबळ निदानांच्या चौकटीतून बाहेर काढण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केल्यानंतरची आहे ! मार्क्स-वाद्यांचे सौंदर्यशास्त्र समाजशास्त्रीय भूमिकेत अडकलेले असून गोल्डमन वगैरेंच्या चिकाटीच्या प्रयत्नानीही ते त्या भूमिकेतून बाहेर येऊ शकलेले नाही ही एक वस्तुस्थिती आहे. गोल्डमन यांचे Hidden God हे रासीन या फ्रेंच नाटककारावरचे साहित्यचिकित्सेचे पुस्तकच तुम्ही घ्या. रासीन या कवी-विषयीची अनेक मनोरंजक व उपयुक्त माहिती त्या पुस्तकातून तुम्हाला कळेल. परंतु रासीन मरून गेल्यास इतका काळ उलटला तरी अद्यापिही लोकाना त्याच्या साहित्याचे आकर्षण वाटत असते तर रासीनचे हे आकर्षण कशात आहे या साहित्यिक प्रश्नाचा उलगडा काही गोल्डमन करू शकत नाही. ग्रीक साहित्याचे आकर्षण कशात आहे व इतका काळ उलटून गेला तरी आवडीने लोक ते का वाचतात या प्रश्नाच्या बाबतीतील स्वतःची असहायता मार्क्सने कबूल केलेली आहे. मार्क्सचा असा ठाम विश्वास असे की समाजामध्ये जी भौतिक स्थित्यंतरे (यात काव्य, नाटच, तत्त्वज्ञान आदि अमूर्त प्रकारचीही स्थित्यंतरे अंतर्भूत असतात) घडून येतात त्या त्यांच्या घडण्याचे स्पष्टीकरण नैसर्गिक शास्त्रांच्या अचूकपणाने सांगता येईल. परंतु ज्या ठिकाणी आपला हा विश्वास मार्क्सने व्यक्त केला आहे त्याच ठिकाणी म्हणजे Outline of the Critique of Political Economy या लेखात मार्क्सने असेही म्हणून ठेविले आहे की, " ग्रीक कला आणि ग्रीक महाकाव्ये यांच्या उत्पत्तीचा संबंध त्या वेळच्या विशिष्ट अशा प्रकारच्या सामाजिक विकासाच्या टप्प्याशी होता; या टप्प्याशी ती निगडीत आहेत ही गोष्ट समजावयास व स्पष्ट करावयास फारशी कठीण नाही. परंतु इतका दीर्घकाळ मधे गेला असूनही या कला व ही महाकाव्ये पूर्वीइतकाच कलात्मक आनंद आजही आम्हाला देत असतात आणि काही प्रमाणात आजच्या आमच्या कलेच्या प्रमाणाचे निकष ती ठरवित असतात व आम्हाला गाठता येऊ न शकणारी कलात्मक पातळी सूचित करीत असतात याचे स्पष्टीकरण आम्हाला सामाजिक विकासाच्या त्यागच्या तत्त्वातून मिळत नाही." कला ही विविध प्रकारच्या सामाजिक घडामोडी प्रतिबिंबित करीत असते हा स्वतःचा समज आणि ग्रीक कलेतून चिरंतन मूल्ये प्रकट होतात हा विश्वास या दोहोंत जो आत्मविरोध होता तो



अनुक्रमणिका

कमी करण्याचा प्रयत्न मार्क्सने कधीही केल्याचे दिसत नाही. कला जर सामाजिक–आर्थिक स्थित्यंतरांशी बद्ध असेल तर एक सामाजिक–आर्थिक परिस्थिती संपून त्या जागी वेगळी सामाजिक–आर्थिक परिस्थिती आली की या नव्या समाजातील लोकांना जुन्या समाजातील लोकांच्या कलात्मक अभिव्यक्तींविषयी आकर्षण वाटायचे वास्तविक थांबले पाहिजे. पण ग्रीक कलेच्याच नव्हे तर इतरही काळातील कलांच्या बाबतीत तसे घडत नाही. सर्वच काळांच्या कलामध्ये चिरंतन असे काही मूल्य साठविलेले असते व त्या कलेच्या निर्मितीचा काळ उलटून गेला तरी ते मूल्य टिकून राहते. कालातीत मूल्य समाविष्ट असणे हा सर्वच महान कलाभिव्यक्तींचा गुणधर्म आहे. कलाभिव्यक्तींमध्ये समाविष्ट असणारी ही कालातीत मूल्ये मार्क्सवादात सूचित केल्या जाणाऱ्या अर्थकारणाच्या अंतिम धारणेच्याही पलिकडे अस्तित्वात असणाऱ्या बौद्धिक धारणेच्या स्वतंत्रतेकडे बोट दाखवितात. मार्क्स जे म्हणतो की सर्व धारणांचा पाया अर्थकारण आहे ते त्याचे मत या ठिकाणी अपुरे ठरते व अर्थकारणाच्याही पलीकडे बुद्धीचे काही तत्त्व असले पाहिजे व कलाभिव्यक्तीतून ज्या कालातीत मूल्यांचा साक्षात्कार होतो तो साक्षात्कार या बुद्धीतत्त्वाला होत असला पाहिजे असे दिसून येते. ग्रीक कला व महाकाव्ये ही मानवजातीला आजवर का आवडत आली आहेत याचे एक जुजबी स्पष्टीकरण एके ठिकाणी तो देतो. एके ठिकाणी तो असे सूचित करतो की "ग्रीक कला ही मानवजातीच्या बालपणाची कला आहे. ग्रीक काल हा मानवजातीच्या बालपणाचा काल असल्याने प्रत्येक प्रौढाला आपल्या गत बालपणाविषयी कधीही न संपणारी अशी जी ओढ वाटत असते तशाच प्रकारची ओढ मानवजातीला तिच्या बाल्यावस्थेचे प्रतिनिधित्व करणाऱ्या या कृतीविषयी वाटत असते." मार्क्सचे ग्रीक कलेच्या चिरंतन आकर्षणाविषयीचे हे स्पष्टीकरण लंगडे व थातुरमातुर आहे हे आपण आताच वर पाहिले. कारण चिरंतनाचे व कालातीतपणाचे मूल्य हा केवळ ग्रीक कलेचाच तेवढा विशेष नसतो तर सर्वच काळातील महान कलांचा तो विशेष आहे. कोठलीही कला महान असते कारण तीत कालातीत असे काहीतरी अंतर्भूत असते.

शेवटी काय तर साहित्य आणि कला यांच्या विश्लेषणात व निदानात मार्क्स जसा अयशस्वी ठरला तसाच अयशस्वी क्रांती याही विषयाच्या बाबतीत तो ठरला आहे. मार्क्सच्या काळात रशिया हा देश औद्योगिक दृष्ट्या पूर्णपणे अप्रगत होता. त्या वेळी तो शेतीच्याच स्तरावर जगत होता. मार्क्सने क्रांतीचे जे तत्त्वज्ञान लिहिलेले आहे त्यात क्रांती विशिष्ट इतकी



अनुक्रमणिका

औद्योगिक प्रगती असल्यावाचून व भांडवलशाहीच्या टप्प्यातून गेल्यावाचून शक्य होत नसते असे अगदी स्पष्ट नमूद केले आहे. प्रथम औद्योगिक प्रगती. त्या प्रगतीमधून भांडवलशाही व कामगार यांच्यातील संघर्ष. त्या संघर्षामुळे कामगार-क्रांती असे हे क्रांतीचे मार्क्सप्रणीत गणित होते. क्रांतिविषयीचे मार्क्संचे विवेचन वाचल्यामुळे व्हेरा झासुलिख नावाच्या एका प्रख्यात रशियन कम्युनिस्ट कार्यकर्तीने मार्क्सला पत्र धाडून असे विचारले होते की रशियामध्ये भांडवलशाही आलेली नाही पण आपल्या मताप्रमाणे क्रांतीसाठी आवश्यक असणारा हा भांडवलशाहीचा टप्पा गाळून रशियामध्ये क्रांती होण्याची शक्यता आहे काय हे सांगावे. व्हेरा झासुलिखच्या पत्राला उत्तर म्हणून मार्क्सने उत्तरांचे अनेक खर्डे लिहिले पण तिच्यापर्यंत पाठविला मात्र एकही नाही. व्हेरा झासुलिख अजून देखिल आपल्या पत्राच्या उत्तराची वाट पाहात आहे. आणि मार्क्संच्या शास्त्राप्रमाणे क्रांतीसाठी अत्यावश्यक असणारा भांडवलशाहीचा अपरिहार्य टप्पा गाळून रशियात क्रांती मात्र घडून आली.

जे जे कुणी मार्क्संच्या क्रांतीविषयक गृहितकृत्याना वाट पुसत क्रांती या विषयाचे विश्लेषण व निदान करू पाहतात त्याना औद्योगिकदृष्टचा अप्रगत असणाऱ्या इतक्या अनेक देशात "समाजवाद" कसा स्थापन झाला हा मार्क्सला अनुत्तरित असणारा प्रश्न आजही त्रास देत असतो. मार्क्सच्या मूळ प्रमेयाला कितीही उपप्रमेये आणि विशेषणे जोडली तरीही त्यामुळे या प्रश्नाचे उत्तर देता आलेले नाही. एवढेच कशाला पण प्रत्येक देशातील अर्थकारण हा पाया व त्या देशातील बौद्धिक, धार्मिक, तात्त्विक इत्यादि तत्त्वप्रणाली ही त्या पायावर उभी असणारी इमारत हा जो मार्क्सप्रणीत प्रबंधआहे त्या प्रबंधाच्या मदतीने ख्रिस्तीधर्म, बौद्धधर्म, इस्लाम या धर्मांच्या प्रसाराचे मर्म सोडाच परंतु खुद्द मार्क्सवादाच्याही प्रसाराचे मर्म सोडवून दाखविणे जमलेले नाही. वास्तविक मार्क्सवादाचा तो दावा आहे. म्हणून मार्क्सवादाने हे मर्म उलगडून दाखवावयास हवे होते.

साहित्य आणि महान कला यांच्याबद्दल जे चिरंतन आकर्षण जगाला वाटत असते त्या आकर्षणाचे रहस्य कोणत्याही इतिहासवादाने[१]

---

१. इतिहासवाद– हा शब्द या ठिकाणी निंदाव्यंजक अर्थाने वापरलेला आहे. जेव्हा प्रत्येक घटनेचे स्पष्टीकरण इतिहासाच्या तत्त्वावर देण्याचा प्रयत्न होतो तेव्हा तो इतिहासविचार न राहता तो इतिहासवाद, इतिहासाचा खोटा अभिमान बनतो.

(Historicism) सोडून दाखविता येण्यासारखे नाही. रशियन कवी व कादंबरीकार पास्टरनाक म्हणतो की, "काव्य आणि इतिहास ही दोन पृथक विश्वे आहेत. त्यातील एक चिरंतनात राहते तर दुसरे कालसापेक्षतेत; काळाच्या हालचालीत राहते." "कवी हे चिरंतनाने दिलेले तारण–चिरंतनाने काळाला स्वतःकरिता दिलेले तारण." माल्रो म्हणतात की "चिरंतनता ही कलाकृतीच्या गाभ्यात असते." ब्लेक हा कवी म्हणतो की, "सर्वच युगातील कवींना मानवी जीवनातील अक्षर तत्त्वांचे नि लक्षणांचे दर्शन होत आले आहे." कलाकृतींचा आकार आणि शैली यात काळागतिक बदल होत असतात. परंतु मानवी समस्यामध्ये आपणाला वाटतो तितका बदल होत नसतो. त्याचमुळे लेखक व कलावंत आणि त्यांचे रसिक चाहते या दोघामध्ये नेहमीच संवाद राहत आला आहे. हा संवाद राहावा इतकी समानता मानव-जातीच्या समस्यांमध्ये नेहमी निश्चितच वसत आली आहे. कालखंड वदलले तरी–भौतिक परिस्थिती बदलली तरी. म्हणूनच कलांचे बाह्य स्वरूप, त्यांची शैली व अभिव्यक्तीचे मार्ग बदलले तरी रसिकाना त्या कालांमागील आशय समजत आला आहे. त्या कलांचा रसास्वाद घेता आला आहे. म्हणून सौंदर्य-शास्त्राची एखादी उपपत्ती कलेचे विश्लेषण ऐतिहासिक किंवा सामाजिक अशासारख्या सापेक्षतांच्या म्हणजे बदलत्या वस्तुस्थितींच्या दाव्याला जेव्हा जखडू पाहते तेव्हा ती उपपत्ती ही सौंदर्यशास्त्रीय उपपत्तीची केवळ थट्टा, एक केवळ विडंबन असते होय. मनुष्यामनुष्यातील वाङ्मयीन रुचीभेद, सौंदर्य-वाचक अभिरुचीतील सापेक्षता ही गोष्ट कला सौंदर्याच्या विचारात महत्त्वाची आहे यात शंका नाही. परंतु सौंदर्यशास्त्रातील तो निर्णायक प्रश्न नाही वा ती अबाधित महत्त्वाची गोष्ट नव्हे. या चर्चेचा निष्कर्ष असा की कलाभिव्यक्ती ही नेहमी सामाजिक व ऐतिहासिक परिवर्तनांशी अविभाज्य संबंधांनी बांधलेली आहे हा मार्क्सवादी सौंदर्यवाचक प्रबंध वादात आणि वस्तुस्थितीत टिकू शकत नाही. त्या दृष्टीने मार्क्सवादीसौंदर्यशास्त्राची घसरगुंडी झाली आहे. आज जे मार्क्सवादी हयात आहेत त्यांच्यापैकी अर्नोल्ड हाऊझर हे आजही मार्क्स-वादी सौंदर्यशास्त्रीय प्रबंध मूळातल्यावरहुकूम वाचवायचा प्रयत्न करताना दिसतात. अजूनही ते असे सांगायचा प्रयत्न करतात की मनुष्याच्या वैचारिक दृष्टीकोनांचे स्वरूप हे नेहमी त्याचे जे व्यावहारिक जीवन असते त्या जीवनाच्या समर्थनात्मक असे असते. मनुष्याचे व्यावहारिक व प्रत्यक्ष जीवन आणि त्याच्या वैचारिक भूमिका व दृष्टिकोन यांच्यात कायम अंतर्गत संबंध आहे. मनुष्याचे ज्ञान आणि विचार सापेक्ष, परिस्थितीच्या संदर्भातील,



अनुक्रमणिका

परिस्थितीशी अनुरूप असतात. मनुष्याचे विचार त्याचा वर्ग आणि सामाजिक पार्श्वभूमीशी मिळतेजुळते असतात. या विशिष्ट पार्श्वभूमीच्या अनुरोधाने असतात. थोडक्यात ऐतिहासिकता आणि त्या ऐतिहासिक काळातील कला वगैरेसारख्या सांस्कृतिक अभिव्यक्ती यांच्यात कार्यकारणभावात्मक संबंध आहे. कलात्मक अभिव्यक्तीकडे पाहण्याचा हाऊझर यांचाच मार्क्सप्रणीत भौतिकवादी दृष्टिकोन कलाभिव्यक्तींचा अन्वयार्थ लावताना गोल्डमन देखील स्विकारतात. मात्र हा दृष्टिकोन स्वीकारतानाच The Hidden God या आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत ते ग्रीक कलाभिव्यक्तीच्या संबंधात मार्क्सने उपस्थित केलेला प्रश्न अद्यापिही अनुत्तरितच राहिला आहे अशी कबुलीही देतात. आहे की नाही गंमत ! तशात ग्रीक अभिजात कलाभिव्यक्तीवर लोक अजूनही प्रेम का करतात आणि त्या कलेचे हे चिरंतन आकर्षण कशात साठविलेले आहे या प्रश्नाचे त्यानी स्वत: जे उत्तर दिले आहे ते त्यांचे उत्तर मार्क्सवादी सौंदर्यशास्त्राच्या मूलभूत मांडणीविरोधी आहेच परंतु मूळ प्रश्नाचा सखोल विचार त्यानी केला होता असेही त्यावरून दिसून येत नाही. किंबहुना प्रश्न समोरासमोर पाहण्याचाही प्रयत्न त्यानी केला असावेसे त्यांच्या त्या उत्तरावरून वाटत नाही. ग्रीक कलाभिव्यक्तीच्या संबंधात गोल्डमन लिहितात की, " एखादे तत्त्वदर्शन वा एखादी कलाभिव्यक्ती त्या कलाभिव्यक्तीचा काळ आणि स्थळ याना अतीत होऊन चिरंतनाच्या मितीत प्रवेश करू शकते. पण केव्हा ? तर, त्या दर्शनात वा कलाभिव्यक्तीत प्रकट झालेली विशिष्ट मानवी घटना व स्थिती विशिष्टतेच्या त्या पातळीवरून वर उचलली जाऊन मानवाच्या त्याच्या सहबांधवांबरोबरच्या आणि विश्वाबरोबरच्या संबंधातून निर्माण होणाऱ्या शाश्वत प्रश्नात रूपांतरीत होणार असेल तेव्हाच कलाभिव्यक्ती वा तत्त्वदर्शनाच्या रूपातली ती विशिष्ट मानवी स्थिती अल्पकालिकतेऐवजी चिरकालिक बनते. " गोल्डमन यांच्या कलाभिव्यक्तीच्या चिरंतनत्वासंबंधीच्या निष्कर्षाचे विश्लेषण केले तर काय दिसते ? असे दिसते की काही दर्शने व कलाभिव्यक्ती मानवी आयुष्यातल्या फक्त विशिष्टच प्रसंगांचे चित्रण करतात. आणि ते विशिष्ट प्रकटन करताना फक्त विशिष्टाच्याच पातळीवर राहतात. जी दर्शने व अभिव्यक्ती या प्रकारे केवळ विशिष्टाच्याच पातळीवर राहतात ती त्या त्या काळाशी व स्थळाशी जखडून राहतात व तो काळ संपताच त्या काळाच्या व त्या स्थळाच्या बाहेर त्यांचा प्रभाव संपुष्टात येतो. याच्या उलट दुसरी अशी काही दर्शने व अभिव्यक्ती आहेत की जी विशिष्ट मानवी स्थितीतून स्फूर्ती घेऊन जन्माला आली असली तरी



अनुक्रमणिका

माणूस या प्राण्याचे त्याच्याचसारख्या इतर माणसांबरोबर जे अनादीकाला-पासून चालत आलेले संबंध आहेत किंवा विश्वाबरोबरही जे माणूस या प्राण्याचे संबंध चालत आलेले आहेत त्या संबंधांवरही त्या दर्शनातून व अभिव्यक्तीतून प्रकाश टाकला जातो. ही दर्शने व या अभिव्यक्ती एकाच वेळी विशिष्ट असल्या व ती तशीच असतात कारण त्या विशिष्ट स्थळी आणि विशिष्ट काळी काही एका विशिष्ट अवस्थेच्या चित्रणासाठी ती तयार केली गेलेली असतात—तरीही मागे होऊन गेलेल्या, आता अस्तित्वात असणाऱ्या आणि पुढे येऊ घातलेल्या अशा संपूर्ण मानवजातीच्या अवस्थेवरही त्यांच्यात काही भाष्य असते. हे मानवी स्थितीवरील भाष्य त्या दर्शनाना व कलाभि-व्यक्तीना चिरंतनाच्या पातळीवर नेत असते. तत्त्वदर्शने आणि कलाभिव्यक्ती यांच्यातील चिरंतनत्वाच्या घटकावरील गोल्डमन यांचे हे भाष्य जर आपण काळजीपूर्वक वाचले तर तुम्हाला असे दिसून येईल की कला आणि तात्त्विक दर्शनांच्या बाबतीतील मार्क्सवादी ऐतिहासिकतेचे प्रमेय त्यानी टाकून दिलेले आहे. कारण गोल्डमन या ठिकाणी असे म्हणत आहेत की तत्त्वदर्शने आणि कलाभिव्यक्ती यात अभिव्यक्त झालेले प्रश्न जर एकाच वेळी विशिष्ट प्रसंगाला आणि मानवाच्या सार्वत्रिक व सार्वकालिक स्थितीलाही अनुलक्षून असतील तरच ती दर्शने व अभिव्यक्ती शाश्वताच्या वर्गात प्रविष्ट होणार आहेत. परंतु प्रत्येक तत्त्वदर्शन आणि कलाभिव्यक्ती ही त्या–त्या काळातील ऐति-हासिकता म्हणजे सामाजिक-आर्थिक परिस्थिती प्रतिबिंबित करीत असतात असे मार्क्सचे कलाविषयक प्रमेय सांगते. थोडक्यात, मार्क्स या दोन वस्तु-स्थितींच्या बाबतीत कसलाही अपवाद करू इच्छित नाही. त्या बाबतीत त्याचा दृष्टिकोन पूर्णपणे सापेक्षतावादीच आहे. पण सापेक्षतावादाच्या मदतीने तो जे अबाधित आणि चिरंतन आहे त्याचे स्पष्टीकरण करू पाहतो ही आश्चर्याची गोष्ट असते. त्याउलट गोल्डमन नाही नाही म्हणत अबाधित-वादाचा आश्रय करतात आणि वाङ्मयात काही अबाधिताचा अंश असल्यामुळे ते चिरकालिक आणि सार्वत्रिक बनते असे कबूल करतात.

ग्रीक कलाभिव्यक्तीमध्ये मानवजातीच्या बाल्यावस्थेचे प्रतिबिंब उमट-लेले असल्याने " प्रत्येक प्रौढाला बालपणीच्या काळाविषयी एक नैसर्गिक हुरहूर आणि आकर्षण जीवनाच्या अंतापर्यंत वाटत असते तशीच हुरहुर आणि आकर्षण या मानवजातीच्या बाल्यावस्थेतील व्यापाराबद्दल अखिल मानव-जातीला वाटत असते, हे कार्ल मार्क्सचे ग्रीक कलाव्यापारांविषयीचे स्पष्टीकरण जितके लंगडे आणि अपूर्ण आहे तितकेच लंगडे आणि अपूर्ण गोल्डमन महाशय



अनुक्रमणिका

यानी वर दिलेले स्पष्टीकरण आहे. अर्थात ते जाऊं द्या म्हणा ! कारण या प्रकारची स्पष्टीकरणे देऊन गोल्डमन हेच कबूल करीत असतात की कला व तत्त्वदर्शने यांच्या बाबतीतील अशा प्रकारचे प्रश्न हे ऐतिहासिक दृष्टीकोनातून केलेल्या विवेचनातून सुटण्यासारखे नसतात कारण ते प्रश्न इतिहासाचे नसून अन्वेषणाचे किंवा अन्वयार्थ लावण्याच्या पद्धतीचे आहेत. भाष्याचे, जीवनावरच्या मताचे आहेत. मार्क्स आणि मार्क्सवादी यानी 'चिरंतन किंवा अबाधित मानवी मूल्यांचे' अस्तित्व नेहमी नाकारले असून मानवी मूल्ये सापेक्ष असतात व ती ऐतिहासिक परिस्थितीनुसार बदलत असतात अशा प्रकारची भूमिका घेतली आहे. परंतु वाङ्मय व साहित्याचा संबंध केवळ 'मानवाच्या सामाजिक स्थितीशीच' नसतो तर "मानवाच्या मानव म्हणून असणाऱ्या स्थितीशी" असतो. सामाजिक अंग हे या मानवी स्थितीचे एक अंग. मानवी अस्तित्व हे एक गूढ आहे. त्याची जितकी अंगे मानवी बुद्धीला प्रतीत झाली आहेत त्यापेक्षाही अधिक अज्ञात आहेत. वाङ्मय आणि साहित्याचे एकमेव कार्य या अज्ञात अंगाना अधिकाधिक प्रमाणात मानवी आकलनात आणणे हे आहे. वाङ्मयाचा खरा हेतू आणि खरे प्रयोजन ते हेच ! म्हणूनच मार्क्सवादासारख्या एका तात्पुरत्या आणि कोणा एका धर्मासाठी की जो धर्म, मानवी अस्तित्वाचा चिरस्थायी गुणधर्म जो अद्भुताचा नि गूढाचा त्याच्याकडे सर्वस्वी पाठ फिरवितो.मानवी अस्तित्वाला केवळ मानवी तर्कव्यवहाराच्या सामान्य सरधोपट पातळीवर आणून बसवितो, जीवनातील आध्यात्माला बहिष्कृत ठरवितो आणि क्रांती म्हणजे फक्त एक विशिष्ट मानवी गट जे करील तेवढेच असे ठरवून वाङ्मयाच्या क्रांतिकारक शक्तीला केवळ एका छोट्या गटाच्या पूजकवस्तूची कळा आणून देतो त्या मार्क्सवादाच्या तसल्याच एका धर्मासाठी वाङ्मयाने सनातन चिंतनाच्या मानवी अस्तित्ववाचक प्रश्नांचा त्याग करावा हे अकल्पनीयच आहे. वाङ्मयासंबंधी असा संकुचित दृष्टिकोन घेणाऱ्या एका पर्यायवाचक धर्मासाठी वाङ्मयाने हा त्याग का करावा ? कारण मार्क्सवाद वाङ्मयाच्या बाबतीत हा संकुचित दृष्टिकोन स्वीकारीत असला आणि वाङ्मय हे फक्त तत्कालिन समाजस्थितीचा पडसाद दाखविते असा आरोप त्यावर करीत असला तरी प्राचीन व अभिजात वाङ्मयाचे सर्वकालिक आणि सर्वत्रांसाठी असणारे आकर्षण कशात आहे याचे स्पष्टीकरण मात्र देत नाही. अशा परिस्थितीत केवळ सापेक्षांच्या आधारावर अबाधिताचे स्पष्टीकरण करू पाहणाऱ्या वाङ्मयासारख्या प्रक्रियेने मार्क्सवादासाठी आपल्या चिरंतन ध्यासाचे मानवसंबंधीचे विषय का सोडून द्यावेत ? सामाजिक-ऐतिहासिक वस्तुस्थितीच्या तंतोतंत प्रतिबिंबाची पातळी आणून



अनुक्रमणिका

देणाऱ्या मार्क्सवादासाठी आपल्या ध्यासाचे मानवविषयक प्रश्न का विसरावेत? मारक्यूज गृहस्थ मार्क्सच्या सौंदर्यविषयक विचाराना मार्क्सचे " सौंदर्याचे मानवशास्त्र " ( Aesthetic anthropology ) असे नाव देतात. " सौंदर्याचे मानवशास्त्र " या शब्दातून त्याना असे सूचित करायचे असते की मार्क्स केवळ अमूर्त तात्त्विक चर्चेत स्वतःला गुरफटून घेत नाही तो माणूस या प्राण्याचा विसर होऊ न देता प्रत्येक मानवी व्यवहाराचा विचार करीत असतो. प्रत्यक्षात मार्क्सचे सौंदर्यशास्त्र हे ' सौंदर्याचे मानवशास्त्र ' नसून प्रा. रुफस डब्ल्यू मॅथ्यूसन (धाकटे) म्हणतात त्याप्रमाणे जड कोटींवर ( Categories ) मनुष्यत्वाचा आरोप करणारे एकोणिसाव्या शतकाचे सगुणवादी प्रत्यक्षवादाचे शास्त्र आहे. मार्क्सचा साहित्यविषयक दृष्टिकोन संकुचित आहे. विशिष्ट ऐतिहासिक स्थितीव्यतिरिक्त कोठल्याही स्थितीला वा प्रश्नाना त्यात वाव नाही. त्यामुळे वाङ्मयाच्या सौंदर्याशी संबंधित असणाऱ्या प्रश्नांची हे सौंदर्यशास्त्र उत्तरे देऊ शकत नाही वा मानवशास्त्रीय दृष्टीकोनातील धर्मविषयक प्रश्नांचीही उत्तरे देऊ शकत नाही. कारण मनुष्यप्राण्याला त्याच्या जीवन–मरणाच्या प्रश्नासारखेच जे महत्त्वाचे आहे त्याच्याचकडे हा दृष्टिकोन पाठ फिरवित असतो. हा वांझ प्रत्यक्षवादी दृष्टिकोन समाजावर लादण्याचा प्रयत्न झाला की त्याचा अटळ परिणाम साहित्य खुजे होण्यात होत असतो. ते उथळ बनण्यात होत असतो. जेव्हा मार्क्सवादाचा वाङ्मयविषयीचा कोता दृष्टिकोन समाजाच्या गळी अट्टाहासाने उतरविला जातो, कायदा व पोलिसयंत्रणा यांच्या साह्याने जनतेवर दडपून रावविला जातो तेव्हा मानवी विचार आणि भावना यांच्या उथळपणात त्याची परिणती होते. त्यातून ' Divine Comedy ' जन्मत नाहीत अथवा Human Comedy ही जन्मत नाहीत. त्यातून फक्त Optimistic Tragedy ' आशावादी शोकात्मिका ' मात्र जन्मतात !

" आशावादी शोकात्मिका " हे विश्नेव्स्कीच्या नाटकाचे नाव. नावात करण्यात आलेली ' आशावादी ' आणि ' शोकात्मिका ' या दोन सर्वस्वी विरुद्ध कल्पनांच्या एकत्रित वापराची क्लुप्ती अगदीच सवंग आहे. उद्या हॉलिवूडच्या चित्रपट–निर्मात्यानी ' एडिपस रेक्स ' किंवा ' अँटिगनी ' या अभिजात ग्रीक शोकात्मिकांचा शेवट जर सुखात्म केला तर त्याच्याशी विश्नेव्स्कीच्या नाटकाच्या नावाची ही चलाखी बरोबर शोभून दिसेल. 'शोक' आणि ' आशा ' अशा प्रकारच्या मूलतःच परस्परविरुद्ध असणाऱ्या कल्पना एकत्रित करण्याचे हे उद्योग मानवी व्यथा व शोक आणि मानवाचे आत्म-

बलिदान यामागील सर्व सूत्र अनाकलनीय बनवितात आणि शोकात्मिकेचे प्रयोजन व्यर्थ आणि निरर्थक करून सोडतात. " आध्यात्मिक प्रत्यक्षवाद " किंवा " सुखवादी परामतत्त्ववाद " यासारखी कल्पनांची गुंफण जशी मूर्ख अतएव त्याज्य असते तितकीच ' आशावादी शोकात्मिका ' यासारख्या कल्पनांच्या गुंफणी मूर्ख व त्याज्य आहेत. विश्नेव्स्कीच्या उपरिनिर्दिष्ट नाटकाचा शेवटसुद्धा आशावादी नाही. त्यात आशावादी काय असेल तर एवढेच की भावी काल अपरिहार्यपणे येणार आहे अशा प्रकारच्या आशावादी शेवटाचे केवळ आश्वासन त्यात आहे. विजेच्या यंत्रावर वरवर जाणाऱ्या पाळण्यागत मानवी इतिहासही अधिक उच्च आणि अधिक चांगल्या परिस्थितीकडे शास्त्रीय पद्धतीने उलगडत चालला आहे या धर्मातीत प्रगतीच्या विश्वासाचे—त्याचा हा निष्कर्ष—हे नवे रूप आहे म्हणाना ! व त्या दृष्टीने ते ठीकच म्हणावे लागेल. परंतु शोकात्मिकेच्या सूत्राशी इतिहासाच्या या सूत्राची सांगड कशी घालायची हे मात्र ध्यानात येण्यासारखे नाही.

× × × ×

प्रत्येक देशात निदान काही लेखक तरी असे असतात की सरकारच्या राजकीय भूमिकेचा उदोउदो करण्यासाठी मानवी अस्तित्वाच्या समस्याना अशा प्रकारचे सवंग स्वरूप दिलेले ज्याना खपत नाही, ज्याना साहित्यिकानी जीवनातील काय पाहावे आणि पाहावे ते कसे पाहावे याचे सरकारी नियंत्रण पटत नाही आणि खपतही नाही, जे राजकीय सत्ताधाऱ्यांच्या अशा प्रकारच्या वागणुकीमुळे कमालीचे चिडतात, ज्याना सरकारने केलेल्या त्यांच्या बाह्य हालचालीवरील नियंत्रणापेक्षाही या प्रकारचे आंतरिक नियंत्रण हा स्वतःच्या जीवनमरणाच्या प्रश्नाइतकाच महत्त्वाचा प्रश्न वाटतो. वर जी राजकीय परिस्थिती आम्ही वर्णन केली त्या परिस्थितीत राज्यकर्त्यांच्या अधिकृत राजकीय तत्त्वज्ञानाच्या दावणीला साहित्यिकाना बांधून घ्यावे लागते. राज्यकर्त्यांची तत्त्वप्रणाली ती स्वतःची तत्त्वप्रणाली असे मानावे लागते व त्या दृष्टीकोनाला सामोरे ठेवून सर्व लेखन करावे लागते. थोडक्यात लेखकाना आपली अनुभवशक्तीच सरकारी विचारप्रणालीला विकावी लागते. लेखक जेव्हा सत्ताधाऱ्यानी त्यांच्यावर लादलेल्या बौद्धिक दृष्टीकोनातून जग अनुभवू लागतात, सत्ताधाऱ्यांच्या इच्छेनुसार व अपेक्षेनुसार जग पाहू लागतात तेव्हा लेखक म्हणून असलेली स्वतःची सच्चाई ते गमावित असतात. सत्ताधाऱ्यानी घालून दिलेल्या मार्गानेच लेखकाने जीवनाचे आकलन करू लागणे



अनुक्रमणिका

म्हणजे स्वतःशी त्याने अप्रामाणिक बनणे होय. कारण कोणत्याही लेखकाचे मूल्य तो स्वतःशी, स्वतःच्या अनुभव घेण्याच्या शक्तीशी किती एकनिष्ठ राहू शकतो यावरच ठरत असते. लेखकांच्या हालचालीविषयीचे सेन्सॉरने लादलेले नियम हे लेखकाच्या आत्माविष्काराच्या केवळ बाह्य स्वातंत्र्यावर बंदी आणतात. परंतु जीवनानुभवाच्या स्वतःच्या शक्तीवर स्वतःच घालून घेतलेली बंधने आणि स्वखुषीची सक्ती लेखकाच्या निर्मितीच्याच आड येत असतात. सत्तेचे निर्बंध हे परक्याचे निर्बंध होत. पण स्वतःच्याच मनाने आवश्यक म्हणून राज्यकर्त्यांचे निर्बंध जेव्हा लेखक स्वतःवर लादून घेतो तेव्हा ते निर्बंध त्याच्या सर्जनाआडच येत असतात. असली खुषीची सक्ती म्हणजे लेखक म्हणून लेखकाचे मरणच होय. मात्र कवी आणि गद्यलेखक यांच्यापैकी कवी या खुषीच्या सक्तीने अधिक घायाळ होतो. कवीला काव्य करण्यासाठी " अबोध मनाच्या किंवा अनैच्छिक मनाच्या उत्स्फूर्त सहकार्याची गरज असते. गद्यलेखकाला " अबोधमनाच्या उत्स्फूर्त प्रतिक्रियेची गरज निदान कवीएवढी तरी नसते. त्यामुळे वर उल्लेखिलेल्या खुषीच्या सक्तीचा जेवढा विपरीत परिणाम कवीच्या बाबतीत होतो तितका इतर कुणाच्याच बाबतीत होत नाही. या प्रकारचे आंतरिक निषेध स्विकारून स्वतःच्याच हाताने स्वतःचीच हत्त्या कवी करून घेत असतात. स्वतःच्याच मनाचे अशा प्रकारचे निषेध-नियंत्रण करणाऱ्या इसमाकडून काहीही उत्स्फूर्त निर्माण होणे कसे बरे शक्य आहे ? कवी जेव्हा स्वतःच्याच भावनांचे आणि विचारांचे आत्मनियंत्रण करू लागतात, स्वतःचे विचार जेव्हा स्वतःच सेन्सॉर करू लागतात तेव्हा ते सर्जनशील कवी राहात नाहीत. ते पगारी स्तुतिपाठक बनतात. मात्र ते तशा प्रकारचे स्तुतिपाठक बनले नाहीत तर त्याना त्यांची गर्दन गमवावी लागते. ते राजकीय दडपणाचे बळी बनतात. कवींच्या वर्गात राजकीय बळीची संख्या सर्वात अधिक असते त्याचे कारण हे आहे.

स्टॅलिनच्या मृत्यूनंतर आम्हाला सांस्कृतिक परिवर्तन हवे आहे या प्रकारची जी मागणी सोव्हिएट युनियनमध्ये केली गेली त्यात मागणी 'साहित्यात व वाङ्मयीन लिखाणात सच्चाई व नेकी येऊ द्या ' ही जी पहिली मागणी होती ( पोमेरान्सेव याने केलेली ) ती काही केवळ अपघाताने केली गेली नव्हती. " वाङ्मयातील नेकीच्या " मागणीनंतर " शब्दाना त्यांचा खरा आशय आला पाहिजे " या मागणीवर जोर दिला गेला त्याचाही अर्थ तोच आहे. पूर्वीच्या राजवटीत या दोहोवरही निर्बंध होते. आणि अजूनही यापैकी काही शक्य होत नव्हते. रशियात प्रक्षिप्त असलेले साहित्य चोरवाटेने



अनुक्रमणिका

देशाबाहेर नेऊन प्रकाशित करण्याचे कार्य करणारी सामिझदात ही गुप्त संघटना रशियात उत्पन्न झाली त्याचे कारण या दोहोंपैकी एकही गोष्ट शक्य होत नव्हती. विचारस्वातंत्र्य आणि आविष्कारस्वातंत्र्य ही दोन्ही स्वातंत्र्ये अविभाज्य असतात. परंतु सोव्हिएट युनियनसारख्या परिस्थितीत वरीलपैकी पहिल्याच स्वातंत्र्याला अधिक महत्त्व येते.

एका उदाहरणाने हा मुद्दा स्पष्ट होईल.—

हा प्रकार काय आहे हे आपण प्रत्यक्ष उदाहरणानीच पाहू. अनेक साहित्यिकांचे साहित्य रशियात प्रक्षिप्त ठरविण्यात आलेले आहे. अलीकडे त्यापैकी कित्येकांच्या साहित्यावरची ही सरकारी बंदी उठविण्याचे व लेखक म्हणून त्याना परत प्रस्थापित करण्याचे प्रयत्न सरकारी पातळीवर होत असतात. अनेक लोकाना वाटते की आता रशियामध्ये विचारस्वातंत्र्य आले आहे. पण ते खरे नाही. साहित्यिकांच्या पुनर्प्रस्थापनेचे एकूण स्वरूप पाहिले की ते का खरे नाही हे लगेच कळून येते. एकतर पूर्वी बहिष्कृत ठरविण्यात आलेले काही लेखक पुनर्प्रस्थापित केले गेले म्हणजे बुद्धीजीवी वर्गाच्या वैचारिक स्वातंत्र्यामध्ये वाढ घडून येते असे नाही किंवा सरकारी धोरण उदारमतवादी बनते असेही नाही. बुद्धीजीवी वर्गाच्या वैचारिक स्वातंत्र्यात वाढ आणि प्रक्षिप्त लेखकावरील बंदी उठविली जाणे या दोन स्वतंत्र घटना असतात. एकमेकीशी त्यांचा काहीही संबंध नाही.

सरकारी बंदी असणारे साहित्य प्रकाशनासाठी मोकळे होणे हे फक्त एका अर्थाने उदारमतवादाचे असते. अशी बंदी उठविली गेली नसती तर हे वाङ्मय तेथील वाचकाना कदाचित कधीच उपलब्ध होऊ शकले नसते. एवढयापुरता तेथील सरकारचा दृष्टिकोन उदारमतवादाचा असतो असे हवे तर मानता येईल. बाकी इतर कोठल्याही बाबतीत तो दृष्टिकोन उदारमतवादी मानता येण्यासारखा नसतो. कारण पूर्वी प्रक्षिप्त असणारे हे लेखन अशा प्रकारे पुनः प्रकाशित केले गेले असते की त्या लेखनाचा खरा प्रभाव मूळातच मारला जावा. लेखक-साहित्यिकाला त्याच्या लेखनातून जे सांगायचे असते तेच विकृत करून किंवा त्याची धार मारून टाकून पुनः प्रकाशित केले गेल्यास त्याचा प्रभाव कितीसा राहू शकेल ? एके काळी बंदी असलेली ही पुस्तके प्रसिद्ध करताना सरकारकडून त्याना ज्या विस्तृत प्रस्तावना लिहिल्या जातात किंवा इतर टीकाटिपण्या जोडल्या जातात त्यांचा हेतूच मुळी लेखकाचा मूळ संदेश मूळ स्वरूपात वाचकापर्यंत पोचविला जाता नये हा असतो. काफ्का आणि जेस्टोव्हस्की या दोघांचे उदाहरण या ठिकाणी घेता

यईल. दोघांच्याही वाङ्मयात आणि विचारसरणीत (सोव्हिएट युनियनला) अपायकारक ठरतील असे अनेक गर्भितार्थ आहेत. तसे असतानाही सोव्हिएट युनियनने या दोघांचे पुनर्वसन केलेले आहे. परंतु कसे हे पाहण्यासारखे आहे.

त्यांचे लिखाण वाचकांसमोर अशा प्रकारे ठेविले गेले आहे की त्यांच्या विचारातील हे सोव्हिएट युनियनला अपायकारक ठरणारे निष्कर्ष नष्ट केले जावेत. सहजासहजी ते कुणाच्याही ध्यानात येऊ नयेत. काफ्काचे पुनर्वसन करण्यापूर्वी त्याच्या लिखाणाचें चिकित्सक पूनर्मूल्यन केले गेले आहे. हे पुनर्मूल्यन अशा प्रकारे केले गेले आहे की काफ्काचा जगासाठी असणारा संदेश अस्पष्ट आणि निरुपद्रवी बनावा. त्याचा खरा अर्थ कुणालाही समजू नये. या पुनर्मूल्यनात भाग घेणारापैकी जे जुनाट टीकाकार होते त्या वुद्रुकानी काफ्काविषयी आपली पूर्वीचीच म्हणजे विरोधी टीकेची भूमिका मांडली होती. तर जे काफ्काच्या भूमिकेविषयी सहानुभूती बाळगणारे होते त्यानीही काफ्काविषयी रसग्रहणात्मक बोलताना अशा काही विलक्षण प्रकारे काफ्काची बाजू मांडली होती की मानवी अस्तित्वाच्या स्थितीसंबंधी जी काही कणव आणि आस्था काफ्काला वाटत होती व जे काही भाष्य तत्संबंधी काफ्काला करायचें होते तेच शब्दजंजाळात अदृश्य होऊन जावे. रसग्रहणाचा हा पुढील नमुनाच पाहा—

" काफ्काच्या सर्जनात्मक अभिव्यक्तीमध्ये मोठी समर्थ अशी टीका आहे. मात्र ही टीका करताना काफ्का बूर्झ्वा समाजाची विशेष लक्षणे तीच अखिल मानवी समाजाची सर्वसाधारण लक्षणे असे गृहीत धरतो. ही गोष्ट अनिष्ट आहे. बूर्झ्वा समाजाचे चित्र अखिल मानवसमाजावर प्रक्षेपित करून भांडवलशाही–नोकरशाहीचा समाज हाच जगातला एकमेव प्रकारचा समाज अशा प्रकारचे त्या समाजाचे त्याने अबाधितीकरण काफ्काने केले आहे व या समाजाला जगातला एकमात्र समाज बनवून या समाजाची भांडवलशाही–नोकरशाही प्रकारची जी दुष्ट शक्ती तिचे दैवतीकरण त्याने केले आहे. "

आता या रसग्रहणाचे पृथक्करण पाहा.– ' काफ्काच्या वाङ्मयीन कलाकृतीमध्ये समाजावर टीका आहे. परंतु ती टीका करताना काफ्का भांडवलशाही–नोकरशाही समाज म्हणजे अखिल मानवी समाज असे गृहीत धरून टीका करतो. काफ्का अशा प्रकारे एका विशिष्ट परिस्थितीला अबाधित सार्वत्रिक परिस्थिती समजतो. या टीकेत नोकरशाही समाजव्यवस्थेच्या सामर्थ्यांचे विलक्षण समर्थ असे चित्र रेखाटले गेलेले आहे. त्या चित्रामुळे असे सूचित होते की ही समाजव्यवस्था अत्यंत बलाढ्य प्रकारची असून तिच्यापुढे

कुणाचेंही काही चालत नाही. काफ्काने ही एक अतिशय वाईट गोष्ट केली आहे. कारण दुष्ट ते बलाढ्य दाखवून दुष्टपणाचे त्याने दैवतीकरण केले आहे.' आता मला सांगा की कोठल्याही सुबुद्ध वाचकाने या प्रकारच्या रस-ग्रहणातून कोणता अर्थ काढायचा? हाच ना की काफ्काच्या साहित्यिक कला-कृतीत जे जीवनविषयक भाष्य आहे ते सर्वथा चुकीचे आहे!

काफ्काच्या 'द कॅसल' या कादंबरीतील अथवा 'द ट्रायल' या कादंबरीतील विशिष्ट वर्णन वाचताना सोव्हिएट नोकरशाहीची अथवा स्टॅलिन-शाहीतील शुद्धीकरणाची (राजकीय विरोधकांच्या स्टॅलिनशाहीत केल्या गेलेल्या शिरकाणाची) जर आठवण वाचकाच्या मनामध्ये जागृत झाली असेल तर त्याने तो विचार आपल्या मनातून तत्काळ काढून टाकावा. काफ्काने आपल्या कादंबरीत जी परिस्थिती वर्णन केली आहे तिचा सोव्हिएट शासकीय जीवनाशी सुतराम संबंध नाही. 'द कॅसल' आणि 'द ट्रायल' या दोन्ही कादंबऱ्या भांडवलशाही बूर्झ्वा समाजाविषयी आहेत. त्यांचा संबंध सोव्हिएट युनियनमधील सामाजिक अनुभवाशी लावता नये. शासनाचा आणि नोकरशाहीचा तेथील अनुभव समान असला तरीही! साहित्यात "अमर सत्ये" नावाची वस्तू अस्तित्वातच नसते. साहित्यात फक्त "समकालिन जग आणि समाज" यांचेच प्रतिबिंब उमटत असते. तस्मात, ऑस्ट्रो–हंगेरियन शासनाच्या कारभाराचा जो भयानक अनुभव काफ्काला आला होता त्याचेच तेवढे चित्र काफ्काच्या साहित्यात उमटणार असते. व तेच तेवढे चित्र तो वाचकाला सांगू शकतो. ऑस्ट्रो–हंगेरियन दडपशाही शासनवर्तुणकीचे जे वर्णन काफ्काच्या कादंबऱ्यांतून आले आहे ते सोव्हिएट युनियनमधील शासनाच्या अनुभवाशी मिळतेजुळते नाही. त्यावरून सोव्हिएट शासनासंबंधी वाचकाने कोठलाही निष्कर्ष काढू नये. जाऊ द्या. यासंबंधी अधिक चर्वितचर्वण करून काहीही अधिक निष्पन्न होण्यासारखे नाही. सोव्हिएट युनियनने पूर्वी प्रक्षिप्त असणारे लेखक हल्ली प्रसिद्ध करावयास सुरवात केली आहे ही गोष्ट खरीच. आणि त्या बाबतीत मॅक्स हेवर्ड म्हणतात त्याप्रमाणे एक गोष्ट मान्य करावयास हरकत नाही. ते म्हणतात की सोव्हिएट युनियनमध्ये पूर्वी असलेली कित्येक अभिजात ग्रंथावरची बंदी उठविली जात असल्यामुळे तेथील लोकांच्या "जाणिवेच्या कक्षा रुंदावत" आहेत. काफ्का आणि काफ्कासारखच इतर बहिष्कृत लेखक सोव्हिएट रशियाने पुनर्वसित केल्यामुळे रशियन लोकांची बुद्धी आणि आकलन हळूहळू विस्तारत आहे. परंतु रशियन "जाणिवेच्या कक्षा किती रुंदावू द्यायच्या आणि त्यांच्या जाणिवेची खोली किती वाढू

द्यायची " हे ठरविण्याचें व त्याप्रमाणे जाणीव नियंत्रित करण्याचे जे प्रयत्न रशियन सरकारी अधिकाऱ्यांकडून सतत होत आहेत त्याचेही स्मरण लेखकांच्या ह्या पुनर्वसनाच्या संदर्भात ठेवावयास हवे. असो. जी कथा काफ्काची तीच डोस्टोव्हस्कीची. डोस्टोव्हस्की हा तर रशियाचा महान कादंबरीकार. पण सोव्हिएट सरकारच्या धोरणानुसार अनेक वर्षे हा लेखक बहिष्कृत होता. शासनाकडून अनेक प्रकारे त्याच्यावर टीका केली जात होती. त्याला शिव्या दिल्या जात होत्या. असा हा सोव्हिएट रशियात बहिष्कृत ठरविण्यात आलेला The Possessed चा लेखक रशियन डोस्टोव्हस्की, त्याच्या जन्माच्या १५० व्या वाढदिवसानिमित्त सर्वत्र स्तुती केला जात आहे. त्याचे गुणसंकीर्तन होत आहे. त्याच्या विचारांविषयीचे " प्रतिगामी विचारांचा अर्क " हे पूर्वीचे सरकारी अधिकृत मत आज विसरले गेले आहे आणि प्रवदा हे सरकारी पत्र त्याच्या वाढदिवसानिमित्त (११ नवंबर १९७१) जाहीर करीत आहे की,

" हा एवढा थोर लेखक आमच्याकडून प्रतिगाम्यांच्या हाती का सोपविला जावा याचाच उलगडा आम्हाला होत नाही. जे प्रतिगामी आणि केवळ कल्पनेत रमणारे आदर्शवादी लोक डोस्टोव्हस्कीला हा आमचा लेखक म्हणून संबोधू पाहतात त्यांच्याशी आम्ही बिलकूल सहमत होऊ शकत नाही. "

डोस्टोव्हस्कीला आपणात सामावून घेण्यासाठी व आपलासा करण्यासाठी आणि सोव्हिएट साहित्यिकांपैकी एक अत्यंत प्रगत विचारांचा पूर्वसुरी म्हणून सोव्हिएट साहित्यात त्याची प्रतिष्ठापना करता येण्यासाठी डोस्टोव्हस्कीच्या साहित्याचे " नाजूक " असे पुनर्अन्वेषण आवश्यक होते. हे पुनर्अन्वेषण कसे होत होते; पूर्वी कधी एके काळी डोस्टोव्हस्कीचा लाविला गेलेला अर्थ बदलून आताच्या नव्या धोरणाला साजेसा अर्थ डोस्टोव्हस्कीच्या ग्रंथातून कसा काढला जात होता हे मोठे पाहण्यासारखे असते. पूर्वी एके काळी लेनिनच्या राजवटीत डोस्टोव्हस्कीला त्याने " नाठाळातील नाठाळ " ठरविले होते. आता लेनिनचे " ते " मत गुपचूप गाळण्यात आले. The Possessed या त्याच्या दुसऱ्या कादंबरीच्या बाबतीत सरकारी मत " ही कादंबरी म्हणजे रशियाच्या स्वातंत्र्य चळवळीवरचे घोर बदनामीकारक लांछन आहे " असे होते. (Bolshaya Sovetskaya Entsiklopediya, Vol. 15, १९५२) आता ते मत सोडून देण्यात आले व त्याऐवजी " अतिरेकी चळवळयांच्या वर्तनाची उत्तम चिरफाड करणारी व अतिरेकवादावरचे एक उत्तम भाष्य देणारी एक सर्वोत्तम कादंबरी असे मत डोस्टोव्हस्कीच्या The Possessed विषयी धारण करण्यात आले होते. " (B. L. Suchkov Literaturnaya Gazeta,

१७ नवंबर १९७१) या निमित्ताने डोस्टोव्हस्कीचे गुणगान एवढ्या मोठ्या प्रमाणात सुरू झाले की मॅक्झिम गॉर्की याही मोठ्या रशियन कादंबरीकाराला व क्रांतीवीराला डोस्टोव्हस्कीच्या शिष्योत्तमात जमा करण्यात आले. डोस्टोव्हस्कीला क्रांतिवादी ठरविण्यासाठी अशा अनेक प्रकारच्या क्लुप्त्या सोव्हिएट युनियनमध्ये चालू आहेत. उदा., एन. झेगालॉव्हने डोस्टोव्हस्की आणि गॉर्की असा एक लेख तयार केला. त्यात त्याने असे जाहीर केले की डोस्टोव्हस्की आणि गॉर्की या दोघाही लेखकांचे " गोत्र एकच होते. " या लेखाचा निष्कर्ष असा होता की " परंपरा आणि अभिजात वाङ्मयाचा वारसा याचे अत्युत्तम सखोल आणि सर्जनशील अशा प्रकारचे पचन कोठे पाहायचे असेल तर ते फक्त समाजवादी वास्तववादातच पाहता येईल. " खरेच की काय ? रॉजर गरौडी या दुसऱ्या एका कम्युनिस्ट विचारवंताने हाच निष्कर्ष पण अधिक सफाईदारपणे व विद्वत्तापूर्ण पद्धतीने सांगितला होता. (Realisme Saus Rivages) पण हाय ! गरौडी महाशय सध्या कम्युनिस्ट संप्रदायातून बहिष्कृत आहेत. स्टॅलिनचा अंत झाल्यावर निषेधक काही उरावयाचे नाही असा समज ! (जसे " परमेश्वराचा अंत झाला आता निषेधक काहीच उरले नाही " असे डोस्टोव्हस्कीचा मानसपुत्र इव्हान कारमाझाव म्हणतो त्या चालीवर) पण छे ! तसे घडलेले नाही. सोव्हिएट युनियनच्या लेखकाना आलेला अनुभव विचारात घेतल्यास स्टॅलिन मेल्यामुळे काहीही करावयास मिळाले असे होत नाही. " समाजवादी वास्तववादाच्या " अल्पशा क्षेत्रातसुद्धा तुम्हाला वाटेल ते बोलू दिले जात नाही. सोव्हिएट युनियनच्या वाङ्मयीन समीक्षकाना सोव्हिएट युनियनने आदा केलेले स्वातंत्र्य आणि डोस्टोव्हस्कीच्या प्रतिभावान आत्म्याने क्रांती घडून येण्यापूर्वीच या प्रकारच्या स्वातंत्र्याची क्रांत्युत्तर राजवटीत दशा काय असेल हे जे पाहिले होते त्याच्याशी तुलनादेखिल होऊ शकणार नाही. क्रांत्युत्तर सरकारे बुद्धिवादी वर्गाच्या स्वातंत्र्याची काय ससेहोलपट करणार आहेत याचे डोस्टोव्हस्कीने पाहिलेले चित्र आजदेखिल सोव्हिएट नेते खोटे पाडू शकलेले नाहीत. त्यांच्या कल्पनेपेक्षाही डोस्टोव्हस्कीची प्रतिभा या बाबतीत अधिक श्रेष्ठ आणि सखोल होती. क्रांतीवादी तत्त्वज्ञानाने रचलेली कल्पिते आणि क्रांतीनंतरची व्यावहारिक नीती यांच्या जन्मगाठीतून काय बाहेर पडू शकेल याची सुस्पष्ट कल्पना जितकी डोस्टोव्हस्कीला क्रांती घडून येण्यापूर्वीच आली तितकीही ती आजदेखिल क्रांतीच्या बुद्धीवादी भक्ताना येऊ शकलेली नाही. दुर्दैवाने डोस्टोव्हस्कीच्या त्या विलक्षण मर्मदृष्टीवर कोणती भाष्ये केली जातात ते पाहा. कोणी म्हणतात की, " डोस्टोव्हस्की हा एक महान द्रष्टा

होता. भविष्यात काय दडून आहे हे त्याच्या द्रष्टयाच्या दृष्टीला कितीतरी आधी कळून आले होते. पण डोस्टोव्हस्कीच्याही द्रष्टया दृष्टीला उमगू शकले नाही ते हे की पुढे आपला उपयोग साम्यवादाच्या उभारणीत करून घेतला जावयाचा आहे.

शेवटी इव्हान कारमाझाव म्हणतो तेच खरे असावे ! परमेश्वराचे अस्तित्व जगात नसले म्हणजे जगात काहीही घडू शकते ! मात्र इव्हान कारमाझाव झाला तरी त्याच्याही कल्पनाशक्तीला परमेश्वराचे अस्तित्व नाहीसे झाल्यास डोस्टोव्हस्की हा लेखक एकदम ' प्रगत क्रांतीवादी ठरणार आहे ' हा तर्क सुचण्यासारखा नव्हता. ज्याने The Possessed ही कादंबरी लिहिली तो पझेस्डचा लेखक श्री. ब्रेझनेव्ह ह्यांच्या मार्गदर्शनाखाली सोव्हिएट रशियात समाजवादाची स्थापना करण्यासाठी झटत आहे ही कल्पनाच तुम्ही आपल्या मनाशी एकदा आणून पाहा. ट्राटस्कीला रशियात प्रतिक्रांतिवादी मानले जात आहे पण डोस्टोव्हस्की मात्र क्रांतीचा पाठिराखा मानला जात आहे हे पाहून खुद्द स्टॅलिनदेखिल चाट पडला असता. साहित्य (क्रांतिवाद्यांच्या हातून वाचलेले) आणि क्रांती (आता शिळी झालेली) यांच्या मीलनाचे काय हे आश्चर्यजनक फलित ! क्रांतीचा उत्पात घडून गेल्यास आज पंचावन्न वर्षे उलटली. सामान्य मनुष्य ॲरिस्टॉटल किंवा गटेची पातळी गाठण्यापासून कितीतरी दूर आहे. (साम्यवादी राजवटीत सामान्य मनुष्याचीही बौद्धिक व सांस्कृतिक पातळी त्या दर्जाची येणार असते हे मार्क्सचे भाकित.) असो. सामान्य मनुष्याचा जरी ॲरिस्टॉटल किंवा गटे झाला नसला तरी आजही साम्यवादाच्या प्रचारकरणाऱ्या कारखान्यांचे प्रमुख मूढ आणि बंद्या सेवकाप्रमाणे हुकूमाची तामिली करणारे स्मडर्याकोव्हच असतात. (स्मडर्याकोव्ह हेही डोस्टोव्हस्कीचेच एक पात्र होय).

× × × ×

युरोपात आणि पश्चिमेत याच्या विरुद्ध घटना घडत आहे. रशियात डोस्टोव्हस्कीचे पुनरुज्जीवन घडत आहे. तेथे ट्राटस्कीचे इझाक डॉट्श्चर, पीटर वेझ आणि रिचर्ड बर्टन यानी हे ट्राटस्कीचे रोमँटिकीकरण चालविले आहे. " नव-क्रांतीवाद्यांच्या पिढीला " ट्राटस्कीच्या " चिरक्रांतीच्या तत्त्वज्ञानाचे " डोस आज पाजण्यात येत असतात. या " नव-क्रांतीकारकांपैकी " अनेकजण उदा., पाकिस्तानी तारिक अली किंवा तेरेसा हायटर यांच्यासारखी तरुण मंडळी तर शुद्ध बूर्झ्वा जातकुळीची आहेत. आणि नकळत The

Possessed या कादंबरीत डोस्टोव्हस्कीने मागे रंगविलेले नाटय आज पुन्हां रंगवित आहेत. बूर्झ्वा स्टाव्रोजिन हा पझेस्डचा नायक. त्याच्या जीवनामध्ये आकर्षक असे करण्यासारखे काही नाही म्हणून रक्तरंजित क्रांतीच्या रंगीत कल्पितामागे उर फुटेस्तवर धावतो, जीवनातला कंटाळा घालविण्यासाठी कित्येक निरागसांची हत्या करतो नि आत्महत्या करून शेवटी स्वतःही संपून जातो. चित्र-क्रांतीच्या कल्पितामागे धावणारे आमचे क्रांतिवादी नव-युवक तेच नाटय नाही का नव्याने वठवित आहेत !

एकोणिसशे साठीतल्या क्रांतीवादाच्या रोमँटिक भावनेने प्रगतीवादी लेखकाना अर्थातच भारून टाकले होते. मात्र हे प्रगतीवादी लेखक सोडल्यास इतर लेखकमंडळीचा क्रांतिवादी रोमँटिक भावनेला दिला गेलेला प्रतिसाद सर्वस्वी भिन्न होता. म्हणजेच त्यांच्यापैकी कोणीही क्रांतीच्या कल्पनेने उत्तेजित झाले नव्हते. एकोणिसशे तिशीत क्रांतीच्या कल्पिताने अनेकाना मोह घातला होता. पण या दुसऱ्या वेळी फारच थोडे तशाच प्रकारच्या कल्पिताना पुन्हा बळी जाऊ इच्छित होते. तरीही काहीजण "नव-क्रांतीवाद्याना" सहानुभूती दाखविण्यास तयार होते. त्यांच्या बाबतीत "तिशितला" जुना घडा फुकट गेला होता. मागील अनुभवाने त्याना शहाणपण आले नव्हते. एकच गोष्ट त्यांच्या बाबतीत बरी होती. ती म्हणजे ते रशिया-धार्जिणे नव्हते आणि त्यांच्या क्रांतिविषयक भूमिकेत कोठल्याही प्रकारची धरसोड वा संदिग्धता नव्हती. क्रांतीच्या बाबतीतील त्यांची बांधिलकी एकदम स्पष्ट व उघड होती. अर्थात काळाची फॅशन म्हणून त्यांची ती बांधिलकी थोडीबहुत ओढाताणीची असून त्यात निष्ठा काहीशी वरवरचीच होती. पण तो काळाचा परिणाम होता. एकोणिसशे साठीत सर्वच निष्ठा अशा वरवरच्या बनत चालल्या होत्या. कशातही निदिध्यास दाखविला जाऊ शकत नव्हता. नेहमीप्रमाणेच, मग ते न्यूयॉर्कवासी असोत वा पॅरिसवासी, त्यांचे विचार न्यूयॉर्कमधील ग्रीनविच व्हिलेज या सर्वच बाबतीतल्या अग्रदूत मंडळींच्या किंवा पॅरिसमधल्या डावा बांध (Left Bank) वसाहतीतल्या डाव्या मंडळींच्या लहरीप्रमाणे प्रभावित होत होते. पूर्वीच्या आणि आताच्या काळात एक फरक होता. पूर्वीचे क्रांतिवादी आताच्या क्रांतीवाद्यांच्या मानाने सामान्य गरीब कुटुंबातील असायचे. आताच्या नवक्रांतीवाद्यांपैकी अनेकजण चांगल्या उत्तम फॅशनच्या अद्ययावत वसाहतीतून राहत होते. तसे असले आणि या झुंजार प्रगतीशील नवक्रांतीवाद्यांमधील लेखकांचे प्रमाण एकोणिसशे तिशीतल्या प्रमाणापेक्षा जरी अगदी अल्प होते आणि आपल्या कार्याविषयीचा त्यांचा समज जरी पूर्वीच्या



अनुक्रमणिका

काळातील क्रांतिवादी लेखकांपेक्षा अगदी संदिग्ध व अस्पष्ट होता नि आजच्या आधुनिक अनेककेंद्री जगामध्ये क्रांतीचा रथ चालत असला तर तो कोठल्या बाजूला चालला आहे किंवा थांबला असल्यास तो कोठल्या जाग्यावर थांबून आहे हें कळण्याइतकेही डोके जरी त्यांच्यापाशी नव्हते तरी क्रांतीच्या नौबत-गाड्यावर आरूढ व्हावयास मात्र हे थोडे लेखकही पूर्वीच्या लेखकांच्या उत्साहानेच उत्सुक होते. या लेखकांची ही क्रांतिविषयक ओढ म्हणज दुसरे काही नव्हते तर क्रांतीचे कल्पित आणि प्रगतीशीलता म्हणजे काय याविषयीचा बौद्धिक गोंधळ याच्या मिश्रणाचे ते उत्तम उदाहरण होते. प्रगती एकाच वेळी सर्वांगीण असली पाहिजे असे म्हणणाऱ्या या मंडळींचा वैचारिक गोंधळ गेल्या संपूर्ण दशकात The New york Review of Books या नियत-कालिकाच्या लिखाणात सातत्याने दिसून येत असतो.

आजवर जगात अनेक क्रांत्या घडून गेल्या. त्या विविध क्रांत्यांचे पृथक्करण आणि विश्लेषण करायचे झाल्यास अर्थातच ज्या काळी त्या क्रांत्या घडून आल्या त्या काळातील अनेकविध घटकांचा अभ्यास करावा लागतो. कारण क्रांतीच्या कल्पनेची यशस्विता या अनेकविध घटकांवर अवलंबून असते. उदा०, त्या काळातील सामाजिक व आर्थिक परिस्थिती, त्या काळातील राजकीय संस्थांचे एकूण स्वरूप व त्यांची अवस्था, व काळातील बहुजन-समाजाच्या गरजा आणि आशाआकांक्षा, त्या गरजांची व आशाआकांक्षांची एकूण अवस्था, प्रत्येक समाजात जी बुद्धिमान व श्रेष्ठ अशी समाजप्रतिनिधित्व करणारी मंडळी असतात, तितकीच बुद्धिमान व श्रेष्ठ परंतु ज्यांचा दृष्टिकोन या पहिल्या प्रकारच्या मंडळींपेक्षा वेगळा आहे अशा मनुष्यांच्या गटाचें त्या समाजातील अस्तित्व, या गटाची एकूण लक्षणे व स्वभावधर्म, तेथील सैनिकी यंत्रणेची कार्यक्षमता व समाजाचा बंदोबस्त करण्याची शक्ती आणि इतर जे कितीतरी घटक आहेत की, कोठल्याही क्रांतिवादी कल्पनेला यश येण्यासाठी ज्यांची अतिशय गरज असते त्या सर्वांचा अभ्यास केला गेला तरच क्रांतीचे विश्लेषण व पृथक्करण करता येणे शक्य आहे. हा अर्थात क्रांतीच्या योजनेच्या अभ्यासाचा भाग झाला. हा अभ्यास केल्यामुळे त्या–त्या देशात व त्या–त्या काळी क्रांतीची योजना कशाप्रकारे यशस्वी झाली व कोठल्या घटकांनी त्या यशाला मदत केली याची माहिती आपणास मिळू शकेल. परंतु क्रांतीची कल्पना मुळात लोकांच्या गळी कशी उतरविली गेली व लोकांना त्या कल्पनेची मोहिनी कशी पडली याची माहिती या अभ्यासातून आपणास होऊ शकणार नाही. कारण क्रांती किंवा क्रांतीचा कल्पना ही एक ' मिथ ' (Myth),

एक कल्पित आहे. हे कल्पित कसे कार्य करतें हे पाहण्यासाठी कल्पितांच्या संरचनेचा, कल्पितांच्या एकूण प्रकृतींचा अभ्यास आपणास करावा लागेल. कल्पितांचे स्वरूप काय, त्यात असे काय असते की ज्याची मोहिनी जनतेवर पडून ती जनता एकात्मतेने एका विशिष्ट कृतीकडे ओढली जाते. याचा अभ्यास करावा लागेल. ' मिथ ' या वस्तूची कार्यपद्धती समजून घेतल्यावाचून क्रांतीच्या घटनेचे स्वरूप उलगडायचे नाही. मात्र ' मिथचा ' अशा प्रकारचा अभ्यास आपल्या प्रस्तुत लेखाच्या कक्षेबाहेरील गोष्ट आहे. आपण एकदा जर का त्यात अडकलो तर त्यातून बाहेर पडता येणे आपणाला फारच मुष्किलीचे होऊन बसेल. या ठिकाणी ' मिथ ' या वस्तूविषयी एवढे सांगितले की पुरे की प्राचीन काळी जेव्हा कधी पहिली मिथ वा पहिले कल्पित रचले गेले तेव्हापासूनच या मिथसची रचना संदिग्ध व दुहेरी अर्थाची बनलेली आहे. तेव्हापासूनच त्यात अर्थाची अस्पष्टता राहत आलेली आहे. ' मिथस ' केव्हाही एकरंगी व एकदेशी नव्हत्या. नेहमीच त्या बहुदेशी असत आल्या आहेत. त्यात नेहमीच दोन वेगवेगळे आशय राहात आले आहेत. यात एक आशय हा उघडउघड कथेच्या स्वरूपाचा असतो. एक कथा म्हणून तो आशय कुणालाही समजण्यासारखा म्हणजे इतका साधा व सरळ असतो. परंतु त्याच ' मिथ 'मध्ये जो दुसरा आशय असतो तो मात्र ही कथा जितकी सोपी व साधी तितकाच गूढ आणि रहस्यपूर्ण असतो. ' मिथसना ' दोन प्रकारचा आशय देण्याचा मान आणि कर्तृव यूहेमेरेस या प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्याकडे जाते. युहेमेरेस हा पहिला विद्वान की ज्यानें मिथसच्या ठिकाणी हा दुहेरी आशय पाहिला. त्यानंतर मग ' मिथस ' म्हणजे दुहेरी रचना असणारी वस्तू हाच अर्थ रूढ झाला. ' मिथस ' अर्थ लावताना यूहेमेरेसने असे विधान केले की मिथसमध्ये रूपकात्मक पद्धतीने मानवी इतिहास सांगितलेला आहे. ' मिथ ' हे मानवी ऐतिहासिक घटनांविषयीचे रूपक आहे. ' मिथ ' म्हणजे रूपकाच्या स्वरूपात सांगितला गेलेला संस्कृतिचा इतिहास हे यूहेमेरेसचे विधान. हेगेल व मार्क्स ह्या दोघांनीही स्वीकारले होते. त्यांच्या सगळ्या तत्त्वज्ञानावर आणि विचारपद्धतीवर यूहेमेरेसच्या या विशिष्ट विधानाचा फार मोठा प्रभाव पडलेला आहे. मानवी संस्कृती, विशेषतः मानवजातीची वैचारिक व तात्त्विक अशा प्रकारची अभिव्यक्ती या संबंधात त्यांनी जे निदान केले त्यात यूहेमेरेसच्या सूचनेचा प्रभाव जाणवतो. यूहेमेरेस प्रतिकांच्या कोटीत मिथस उलगडायचा प्रयत्न करतो. हेगेल आणि मार्क्स तशाच प्रकारे मानवजातीच्या तत्त्वप्रणाली उलगडायचा प्रयत्न करतात. ते असे म्हणतात की मनुष्याच्या सांस्कृतिक व



अनुक्रमणिका

इतर अभिव्यक्तींचा उघड अर्थ एक असला तरी प्रच्छन्न अर्थ वेगळा आहे. वैचारिक वगैरे अभिव्यक्तींच्या ठायी अशा प्रकारचे सुप्त आणि प्रकट असे दुहेरी अर्थ पाहण्याची ही पद्धती हेगेल व मार्क्सने यूहेमेरेसच्या कल्पितांचा अर्थ लावण्याच्या पद्धतीवरून घेतलेली आहे. मिथ्सचा अर्थ उलगडायची यूहेमेरेसचीच रीत ते दोघेही वापरतात व त्याच अर्थाने ' मिथसचा ' विचार करतात. या दोघांच्या मनावर आणि विचारांवर यूहेमेरेसच्या प्रतिपादना-प्रमाणेच ज्ञानयुगाच्या विज्ञाननिष्ठेच्या व बुद्धिवादाच्या धर्माचाही प्रखर प्रभाव होता. म्हणूनही ते मिथ्सचा विचार बुद्धिवादाच्या दृष्टीने करून मिथ्सच्या ठिकाणी बुद्धिवादी स्पष्टीकरणे पाहतात. मनुष्याची तात्त्विक मतप्रणाली वरवर काहीही सांगत असली तरी तिचा अंतरंग हेतू वेगळाच असतो; मत-प्रणाली हा एक प्रकारचा बौद्धिक मुखवटा आहे हा मार्क्सचा विचार म्हणजे ' मिथ ', हे दुसरे काही नसून मानवजातीच्या कल्पनाविलासी कल्पनांचे काल्पनिक चित्रण आहे या हेगेलच्या मताचीच दुसऱ्या शब्दातील पुनरुक्ती आहे. मनुष्यजातीच्या तात्त्विक मतप्रणालींना व जीवनदृष्टीला (Ideology) मार्क्स कल्पित व रूपक समजतो. मिथसना हेगेलदेखिल मनुष्याची भ्रामक आणि कल्पनारंजक मते असेच समजतो. सारांश हेगेल आणि मार्क्स हे दोघेही मिथसचा जो उघड अर्थ दिसतो तो स्वीकारावयास तयार नसतात. त्यांच्या दृष्टीने या उघड अर्थाच्या पाठीमागे दुसरा एक अर्थ असून पहिल्या उघड अर्थापेक्षा तो अधिक महत्त्वाचा आहे. मिथचा वरवरचा अर्थ जरी एक असला तरी आतून मिथ दुसरेच काही सांगत असते असे ते समजतात. फ्रॉईड, युंग आदि मानसशास्त्रज्ञ, किंवा फ्रेझर मालिनोवस्की आदि मानवशास्त्रज्ञ हेगेल–मार्क्सच्याही पुढे जाऊन मिथसमध्ये दडून असणाऱ्या मानसिक व सामाजिक अंगांचा शोध घ्यावयास प्रवृत्त होतात. त्यांच्या दृष्टीने मिथमधील कथेबरोबरच मिथ्लाही ही दोन अंगे आहेत. हेगेल आणि मार्क्स हे दोघेही कुठल्याही मिथ्चा विचार करताना ज्या समाजातील त्या ' मिथ् ' असतात त्या समाजातील लोकांच्या फक्त राजकीय आणि वैचारिक समजुतींचा तेवढा विचार करतात व फक्त तेवढ्याच चौकटीत मिथ्चा अर्थ लावतात. फ्रॉईड, युंग, फ्रेझर, मालिनोवस्की आदींचा मिथ्विषयीचा दृष्टिकोन यापेक्षा अधिक विस्तृत आहे. ते राजकीय विचारच नव्हेत, तर ज्या समाजातील त्या मिथस असतात त्या समाजातील लोकांच्या एकूण मानसिक बैठकीचा, त्यांच्या सामाजिक धारणांचा वगैरे इतर खूप विविध अंगांचाही विचार करतात. ते असे म्हणतात की मिथसना अनेक कार्ये आहेत. सोरेल हा फ्रेंच तत्त्वज्ञ मिथच्या राजकीय कार्य-





शक्तीचा प्रामुख्याने विचार करतो. तर कॅसिरेर हा आणखी एक जर्मन तत्त्ववेत्ता की ज्याने आणखी काही वेगळ्या दृष्टीने मिथ्चा विचार करण्याचा प्रयत्न केला आहे. कॅसिरेर हा नव–कांटपंथाचा तत्त्ववेत्ता. कांटच्या (१७२४–१८०४). तत्त्वज्ञानानंतर काही कालपर्यंत पश्चात-कांटवाद्यांचा जोर होता. हेगेलचे तत्त्वज्ञान चिद्वादी म्हणजे चिद्तत्त्वाला एकमेव सत्य आणि भौतिक व इतर वस्तुनिष्ठ आविष्कारांना त्या चित्तत्त्वाची प्रकट अंगे मानणारे तत्त्वज्ञान आहे. कांटच्या नंतर हेगेलचा चिद्वाद आला असल्याने काही काळपर्यंत कांटची ज्ञानमीमांसा हेगेलवादापुढे गप्प झाली होती. कांटच्या ज्ञानमीमांसेत तर्कशुद्ध विचारसरणीला व शास्त्रीय दृष्टिकोनाला सर्वाधिक महत्त्व होते. भौतिक शास्त्रांच्या व विज्ञाननिष्ठ संशोधनाच्या प्रसारावरोवर हेगेलचा चिद्वाद जेव्हा पराभूत झाला ( कारण हेगेलने गृहीत धरलेले चेतनाच्या अस्तित्वाचे प्रमेय शास्त्रीय प्रयोगात बसविता येत नव्हते ) तेव्हा तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात 'परत कांटकडे' अशा प्रकारची एक नवी लाट निर्माण झाली. हेच नव-कांटवादी. त्यांनी विश्लेषणाची कांटची पद्धती स्वीकारली होती. अर्थात ह्या सर्वात कांटचा कोठला ग्रंथ अधिकृत मानायचा याविषयी एकवाक्यता नव्हती. परंतु तसे असले तरी हे सर्वजण कांटच्या विचारांच्या प्रभावाखाली होते. कासिरेर यांनी तात्त्विक प्रश्नांच्या चर्चेची कांटप्रणीत पद्धती स्वीकारून कल्पितांचा, भाषा व राष्ट्रसंस्था, भाषा आणि शासन ( state ) या दोन वस्तूंशी असलेल्या संबंधांवर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला. मिर्सा एलिआड आणि जोझेफ कॅम्पवेल या दुसऱ्याही दोघा विचारवंतानी मिथ्सचा विचार केला आहे. पण त्यानी मिथ्सचा विचार तुलनात्मक पद्धतीने केला आहे. आपल्या अभ्यासातून मिथसविषयी त्यानीही काही तात्पर्य काढली आहेत. देशोदेशींच्या मिथ्सचा तुलनात्मक अभ्यास करून मिथ्विषयी त्यानी जे तात्पर्य काढले आहे त्याचा आशय " मिथ्स ही लोकसमूहाची सामूहिक स्वप्ने असतात " हे युंग यांचे मत आहे. क्लॉड लेव्ही-स्ट्राऊस या फ्रेंच पंडिताने यापेक्षा अगदी वेगळाच दृष्टिकोन घेऊन 'मिथ्चा' विचार करण्याचा प्रयत्न केला आहे. तो असे म्हणतो की " मिथ् हे ऐतिहासिक सत्याचे कथन असते अथवा तो जनसमूहाचा केवळ कल्पनाविलास असतो " असे सांगून अथवा " मिथ्ला सत्य किंवा सामूहिक भ्रम मानून " मिथ्चे खरे महत्त्व अजमावून होत नाही. मिथ्चे खरे महत्त्व आणि मर्म जर शोधून काढायचे असेल तर मिथ्मधून संस्कृतीविषयक जो संगतशीर अन्वयार्थ



अनुक्रमणिका

आपल्या पुढे येतो त्या संगतशीर सुसूत्रतेच्या ( coherence ) सूत्राचा आधार घेऊन मिथ्सचा अभ्यास केला जावा. असा अभ्यास केला तरच मिथ्समधून काही लभ्यांश हाती लागेल." स्वतः लेव्ही-स्ट्राउस याच पद्धतीने मिथ्ससारख्या रचनांचा अभ्यास करतात. मिथ्ची संपूर्ण रचना घेऊन व तीमधील सर्व उपांगांचा परस्परांबरोबरचा क्रियाप्रतिक्रियात्मक संबंध एकत्रित अभ्यासून ते आपले निष्कर्ष काढतात. प्रत्येक मिथ् ही त्यांच्या दृष्टीत एक एक पूर्ण व्यवस्था आहे. या पूर्ण व्यवस्थेचा विचार फक्त त्यातील घटकांच्याच मदतीने करून त्या व्यवस्थेतील सामाजिक व्यवहाराचे स्वरूप काय असावे ते मांडतात. क्लॉड लेव्ही-स्ट्राउस यांचा हा दृष्टिकोन संरचनावाद ( Structuralism ) नावाने प्रसिद्ध आहे. या दृष्टिकोनामध्ये मिथ्सच्या सामाजिक कार्याचा विचार होतो. सामान्यतः इतर सर्व दृष्टिकोन मिथ्चा विचार करताना ऐतिहासिक दृष्टी वापरतात व इतिहासाच्या तत्त्वावर मिथ्चा उलगडा करण्याचा प्रयत्न करतात. तसेच मिथ्चा विचार करताना त्या मिथ्-मध्ये सांगितलेल्या गोष्टींमध्ये वास्तवाचा अंश किती आहे याचाही विचार या दृष्टिकोनातून होत असतो. लेव्ही-स्ट्राउस 'वास्तवाच्या' प्रश्नाशी मिथ्च्या अर्थाचा संबंध जोडण्याचा प्रयत्न करीत नाहीत. ते त्या मिथ्च्या सामाजिक कार्याचा तेवढा विचार करतात. फ्रॉईड, युंग, मालिनोवस्की आदींच्या मिथ्-विषयक भूमिकेपेक्षा ही भूमिका सर्वस्वी वेगळी असते. फ्रॉईड-युंग आदि विचारवंत मिथ्चा वास्तवाशी संबंध किती आहे हे पाहतात. त्याचा इतिहासा-बरोबरचा संबंध हुडकतात. मिथ्मधील सुसूत्रतेचा अभ्यास ते करीत नाहीत. लेव्ही-स्ट्राउस एखादी मिथ् इतिहासात कशा प्रकारे उत्क्रमित झाली याचा विचारही न करता त्या मिथ्ला त्या समाजात एक पूर्ण व्यवस्था म्हणून कोणते कार्य आहे याचा विचार करतात. मिथ्सचा विचार करण्याचे इतके विविध मार्ग पाहून एखादा मनुष्य असेही म्हणू शकेल की मिथ या वस्तूसंबंधी ज्ञान मिळविण्यासाठी केलेला कोठलाही प्रयत्न शेवटी 'अन्वयार्थाच्या चक्रात' गवसून फुकट जाणार आहे. अन्वयार्थ लावण्यासाठी जी पद्धती तुम्ही स्वीकारणार आहात त्या पद्धतीच्या चक्रात अडकून बसणार आहे. कारण जो विशिष्ट अर्थ मनात ठेवून मिथ्च्या विश्लेषणाचा प्रयत्न तुम्ही करणार तेवढाच फक्त अर्थ त्यात तुम्हास गवसणार आहे. त्याव्यतिरिक्तचे इतर सर्व अन्वयार्थ त्या अन्वयार्थाच्या बाहेरच राहणार आहेत. त्यामुळे अन्वयार्थ लावण्याच्या दृष्टीने केलेले मिथ्विषयीचे प्रयत्न वांझ असतील. मिथ्चा ठाम अर्थ मिळणे व मिथ्च्या प्रकृतीचे ज्ञान होणे ही गोष्ट केवळ अशक्य आहे. या प्रकारचे विधान



अनुक्रमणिका

मिथ्च्यासंबंधी कोणी केले तर ते चुकीचे आहे असे नाही. परंतु त्याचा अर्थ असा नाही की मिथ्च्या संकल्पनेविषयीचे विवेचन जर प्रगल्भ अशा प्रकारच्या मानवशास्त्रीय विश्लेषणाचे असेल तर त्यात केवळ तात्त्विक अशी प्रमेये टाळता येण्यासारखी असतात. मिथ् ही वस्तूच इतकी संदिग्ध व धूसर आहे की तिच्या संबंधातील विवेचन कोठल्याही प्रकारचे असो त्यातील आशय संदिग्ध व अनेकार्थीच असायचा. मिथ्मध्ये अंतर्भूत असणारा हा परस्परविरोधीपणाचा गुणधर्म प्रकट असो अथवा अप्रकट असो व प्रच्छन्न असो, पण काहीही केले तरी तो तेथे असतो एवढी गोष्ट खरी. मिथ्मध्ये सुसूत्रता असेल वा नसेल; मिथ् कुणाला गूढ, आशयपूर्ण वाटेल किंवा अकारण गौडबंगाल वाटेल; मग त्या मिथ्चे कार्य कोणतेही असो. आणि ती मिथ् त्या समाजाच्या बाबतीत कुणाला आवश्यक व अपरिहार्य वाटो अथवा कुणाला अनावश्यक व निरर्थक वाटो. मिथ्मधून काहीजणांना गूढ आणि अद्भूत अर्थ गवसत राहील तर काहीजणांना तीच मिथ् निरर्थक व अर्थहीन कोडे वाटत राहील. मिथ्ची ही संदिग्ध व दुहेरी प्रकृती बदलली जाण्यासारखी नाही.

मिथ् आणि साहित्य यांच्या संबंधांची छाननी केली की मिथ् ही वस्तू सुस्पष्ट नाही, त्यात अर्थाचा संदिग्धपणा आहे, दोन परस्परविरोधी तात्पर्ये व अर्थ त्यातून काढली जाऊ शकतात हे आपल्या तावडतोब ध्यानात येते. याचबरोबर हेही आपल्या ध्यानात येते की क्रांतिवादाची मिथ् व साहित्य या दोहोंतील संबंधाचे जे विश्लेषण या ठिकाणी आपण चालविले आहे त्याच्यामागेही मिथ् व साहित्य यातील संबंधाचा अभ्यास निगडीत आहे. मात्र या सर्व अभ्यासाचा फायदा इतकाच आहे की हा अभ्यास केला असता मिथ्च्या स्वरूपाचा व कार्याचा प्रश्न आजच्याइतका गूढ राहणार नाही. उलट तो चांगलाच सुस्पष्ट बनेल. मिथ्कडे वेगवेगळ्या दोन दृष्टीतून पाहिले जाते हे एव्हाना स्पष्ट झाले असेल. काहीजणांच्या दृष्टीत मिथ् हे एक कपोलकल्पित असून तो एक भ्रम व धादांत खोटेपणा असतो. तर दुसऱ्या काहीजणांच्या दृष्टीत सत्याची ती परमश्रेष्ठ अशी अभिव्यक्ती असून मनुष्य आपल्या जीवनात जी नैतिक किंवा सौंदर्यवाचक किंवा अस्तित्वसंबंधी मूल्ये निवडतो त्या मूल्यांचे ते गहनगूढ प्रतीकात्मक आविष्करण असते. हे मिथ्रूपी आविष्करण मानवी जीवनाला सार्थ व न्याय्य ठरविते आणि मानवी अस्तित्वात 'अर्थमयता' आणली येण्याची शक्यता निर्माण करते. सांगायचा मुद्दा असा की मिथ्च्या बाबतीत या दोन्हीही प्रक्रिया संभवतात. कुणाला ती मौलिक वस्तू वाटते की ज्या वस्तूमुळे जीवनाला समर्थन मिळते, तर कुणाला मिथ् हा एक

आत्मवंचनेचा प्रकार वाटतो. या प्रकारे परस्परविरुद्ध प्रतिक्रिया मिथ्मुळे निर्माण होत असल्याने असे म्हणता येईल की या परस्परविरुद्ध प्रतिक्रिया निर्माण करण्याची शक्ती सुप्त रूपाने मिथ्च्या अंगी वसत असावी. मिथ्च्या अंगी असणाऱ्या या संदिग्धतेच्या गुणधर्माची चर्चा साहित्याच्या प्रश्नाच्या चर्चेत अगदी समर्पक आहे. कारण असे की मिथ् निर्माण करण्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात साहित्याचा हातभार असतो. ज्या उद्देशांच्या पूर्तीसाठी मिथ्स निर्माण होतात व ज्या साधनांचे त्या साह्य घेतात, त्या साध्यांमध्ये आणि साधनांमध्ये साहित्य बऱ्याच प्रमाणात गुंतलेले आहे. अनेक प्रकारे त्या साध्यांशी व साधनांशी साहित्याचा संबंध येतो. मिथ् या विषयाच्या संबंधात जॉन आर्मस्ट्रांग हा लेखक असे म्हणूनच राहिला आहे की, " मानवी मनाची संरचना कमालीची तरल, गुंतागुंतीची आणि संकुल आहे. या मनाचा आशयही तितकाच गुंतागुंतीचा आणि संकुल आहे. हा गुंतागुंतीचा संकुल व तरल आशय पकडण्यासाठी आणि अभिव्यक्त करण्यासाठी मिथ्स हे एकमेव उपयुक्त साधन होय. मानवी मनाने या कामासाठी अगदी अचूक साधन निर्माण केले आहे. मिथ् या कविमनाच्या रचना होत... माणसे मिथ्स रचतात कारण त्यांच्या अतिशय गुंतागुंतीच्या मनात ज्या हालचाली चाललेल्या असतात त्या हालचाली तार्किक विधानातून व तात्त्विक प्रतिपादनातून व्यवस्थित व निश्चितपणे प्रकट होऊ शकत नाहीत. मनुष्याला त्याच्या जिव्हाळ्याचे असे जे काही सांगायचे असते ते केवळ तार्किक प्रतिपादनातून त्याला सांगता येत नाही. मिथ् ही मनुष्याच्या गुंतागुंतीच्या आंतरजीवनाची अपरिहार्य गरज आहे. तार्किक प्रतिपादने व मांडण्या या बाबतीत अपुऱ्या व कुचकामी तर असतातच व त्यांच्यामुळे आपल्या शंका तर दूर होत नाहीतच, परंतु या प्रकारच्या केवळ तार्किक मांडण्या आपणाला भावनांच्या बाबतीत संपूर्णपणे उदासीन ठेवतात. या तार्किक प्रतिपादनांचा आमच्या भावनांवर काडीमात्र परिणाम होत नसतो. हा त्यांचा एक फार मोठा दोष आहे. मिथ् आपल्या गाभ्यापर्यंत पोचू शकतात. आपल्या भावना उत्तेजित करू शकतात आणि मानवी हृदयात जे गूढ असे काही सांगायचे असते त्याला स्पर्श करू शकतात; तेथपर्यंत पोचू शकतात. बुद्धीवर आधारित अमूर्त विचारांना हे जमत नाही. अमूर्ते आपणास भावनाशून्यच राखतात." वास्तविक जॉन आर्मस्ट्रांग यांचा हा दृष्टिकोन मार्क्सवादी भौतिकवाद्यांच्या भूमिकेशी न जमणारा आहे. कारण तो कल्पनावादी दृष्टिकोन आहे. पण असे असले तरी रॉजर गारौडी किंवा अर्न्स्ट फिशरसारखे फेरवादी पाश्चात्य मार्क्सवादी साहित्यिकही आर्मस्ट्रांग यांच्या वर उल्लेखिलेल्या मताशी



अनुक्रमणिका

आपण सहमत असल्याचे दर्शवितात. वास्तविक त्यांनी स्वतःच्या आयुष्यात स्वीकारलेला दृष्टिकोन मार्क्सवादाच्या प्रत्यक्षवादी परंपरेचा आहे. तरीही ते आर्मस्ट्रांग यांच्या काहीशा कल्पनावादी दृष्टिकोनाशी सहमत होऊ पाहतात ही होऊ पाहतात ही गोष्ट विचारात घेण्यासारखी असते. याचाच अर्थ मिथ्‌ची रचना ही एक परिणामकारक रचना असून कडक भौतिकवाद्यांच्याही मनावर ती परिणाम करीत असते असा आहे. गारौडी मिथ्‌च्या रचनेसंबंधी लिहितात की "होमरपासून सर्वंटिझपर्यंत आणि गटेच्या फाऊस्टपासून गॉर्कीच्या मदर-पर्यंतच्या कलानिर्मितीचा विचार केला तर मिथ्‌स निर्माण करणे हेच कलेचे प्रमुख व प्रधान कार्य असते असे दिसते. मिथ्‌स जगापुढे प्रश्नचिन्हे ठेवितात. जगाला काही एक प्रश्न विचारतात आणि त्याचवेळी आपली नियती व आपले भवितव्य याविषयी मानवजात जे एक धीरोदात्त असे कल्पनाचित्र स्वतःशी रंगवीत आली आहे, त्या धीरोदात्त चित्राच्या मिषाने प्रस्थापित समाजव्यवस्थेला आव्हानही देत असतात." गारौडी यांच्या वरील मताशी आपण सहमत आहोत असे दर्शवून आणि गारौडी यांचे वरील मत उद्‌धृत करून अर्न्स्ट फिशर हा मार्क्सवादी कलासमीक्षक पुढे लिहितो की, "मिथ्‌स रचणे हे काही कलेचे प्रधान महत्त्वाचे कार्य नाही. ( Art against Ideology ) "प्रस्थापितावर टीका करणे हे कलेचे एक कार्य–हे कार्य कला मिथ्‌च्या साह्याने करू शकेल किंवा प्रतिमिथ्‌च्या साहृयानेही करू शकेल." मानवाच्या भव्य स्थितीच्या कल्पनारम्य चित्रणाच्या साह्याने प्रचलित स्थितीवरोबर त्याला तुलना करावयास भाग पाडून ते करील. किंवा मानवाची स्थिती आहे त्यापेक्षाही हास्यास्पद व करुणास्पद दाखवून म्हणजेच मिथ्‌च्या नेमकी विरुद्ध, प्रतिमिथ् निर्माण करून ते करील. ( " उदा., द मॅरेज ऑफ फिगारो, मादाम बोव्हारी, अॅना कॅरेनिना या सर्व रचनांमध्ये माझ्या मते मिथ्‌च्या गुणविशषांचा संपूर्ण अभाव आहे.") अर्न्स्ट फिशर यांनी कला व मिथ्‌सची निर्मिती याविषयी जी मते धारण केली आहेत त्याच्या अगदी विरुद्ध मते रोलांद बार्थे धारण करतात. चिन्हे आणि चिन्हांच्या भाषेचे शास्त्र व मार्क्सवादाचे शास्त्र या दोहोंचा समन्वय करून आणि त्या समन्वयातून मिळालेल्या तत्त्वांच्या आधारे मिथ्-रचनेविषयी जे निष्कर्ष ते काढतात, ते वर उल्लेखिलेल्या फिशर, गारौडी यांच्या त्याच विषयाबद्दलच्या निष्कर्षांपेक्षा सर्वस्वी भिन्न असतात. रोलांद बार्थे असे म्हणतात की मिथ् हे एक वैचारिक व भावनिक समर्थनात्मक हत्यार आहे. समाजामध्ये प्रचलित असणाऱ्या वस्तुस्थितीचे समर्थन मिथ्‌स करीत असतात. प्रस्थापिताला त्यांच्यामुळे आव्हान मिळते किंवा मिथ्‌स्



अनुक्रमणिका

जगाला प्रश्न विचारतात ही गोष्ट खोटी आहे. मिथ्स् प्रस्थापिताला उलट आधार देतात. आहे तेच योग्य कसे हे लोकांच्या मनावर विंबवितात. मिथ् बूर्झ्वा संस्कृतीच्या रोमारोमातून रुळत असते. त्यामुळे खरी वास्तव परिस्थिती अंधुक करण्याकडे तिचा कल असतो. नव्हे मिथ्मुळे वास्तवाचे आकलन अंधुक बनतेच ! अशा प्रकारे मिथ्समुळे समाजातील जैसे थे परिस्थिती कायम ठेवण्यास मदत होते. खरी सामाजिक स्थिती काय आहे हे मिथ्स कळू देत नाहीत. स्वतःची स्थिती काय आहे हे कळून घेण्याच्या आड त्या येतात. लोकांचा समज गढूळ करतात व अशा प्रकारे बूर्झ्वा संस्कृती कायम करण्यास हातभार लावतात. क्रांतिवादी समाजाला मिथची गरज नसते. कारण मिथ् स्वभावतःच समाजाच्या प्राप्त स्थितीसंबंधी गूढरम्य, फसवे आणि वरपांगी उदात्त भासणारे चित्र लोकांच्या डोळ्यांसमोर ठेवीत असल्याने क्रांतीला त्यांचा विरोधच होत असतो. मिथ् ही क्रांतीच्या मार्गातील अडचण आहे. रोलंड बार्थे या पॅरिसवाल्या स्टॅलिनविरोधी डाव्या विचारवंताच्या दृष्टीने मिथ्चे पृथक्करण करण्याचा व त्यांचा छडा लावण्याचा प्रयत्न हा केवळ नकारात्मक उपयोगाचा आहे. मिथ् हा बूर्झ्वा समाजाचा खोटा वहाणा व मुखवटा असल्याने मिथ्चे पृथक्करण व अन्वेषण म्हणजे त्या वहाण्याचा व मुखवट्याचा भेद होय. हा भेद करून भेद करणारा समाजातील प्रस्थापितासंबंधीच्या वंचक समर्थनांचा नाश करीत असतो. मिथ्च्या उलगड्याचा एवढाच एक हेतू आहे. "डाव्या पक्षासाठी मिथ् ही एक अनावश्यक वाव आहे. कारण त्यांना त्याची गरज नाही" — इती रोलंड बार्थे. हर्बट मारक्यूज बार्थे यांच्या साहाय्यास येताना दिसतात — सहिष्णुतेचे आपले तत्त्व फक्त डाव्यासाठी उपयोगात आणावयास मारक्यूज तयार आहेत. इतरांना ते तत्त्व लावायची त्यांची तयारी नाही. त्यांच्या दृष्टीने औद्योगिक लोकशाह्यांमध्ये इतरांच्या विरोधीही मतांविषयी जी सहिष्णुता दाखविली जाते ती खरी सहिष्णुताच नाही. कारण मारक्यूज यांच्या म्हणण्याप्रमाणे लोकशाहीमध्ये मनुष्ये इतरांच्या मतांविषयी सहिष्णू नसतात तर उदासीन असतात. ही सहिष्णुता हा एक आभास, एक असत्य आहे. एक केवळ फसवणूक. कारण विरोधी मते मानण्याचा हक्क विरोधी मतधारकांना असला व त्यांच्या मतांविषयी सहिष्णुता दाखविली जात असली तरी परिणाम करण्याच्या दृष्टीने ही मते व्यर्थ असतात. अल्पसंख्यांना मिळणारे मत मांडण्याचे स्वातंत्र्य परिणामशून्य असल्याने हे स्वातंत्र्य असून नसल्यासारखे असते. किंबहुना या प्रकारात ते विचार अधिकच निष्फळ बनतात, तोंडातील वाफ दवडावी त्याप्रमाणे. आणि त्यांची वाफ गेली की त्यांच्यातील



अनुक्रमणिका

कार्यशक्तीही जाते. औद्योगिक लोकशाहीवरचा मारक्यूज यांचा आक्षेप असा की लोकांना ही राज्यपद्धती अशा प्रकारे घडविते की त्या समाजातील क्रांति-कारी अल्पगट जी टीका त्या राज्यपद्धतीवर करतील ती टीका बहुजनसमा-जाला कळूच नये. कोठलीही मूलगामी व क्रांतिकारी भूमिका त्यांना समजूच नये. आपल्या कक्षेतील एकूण एक उपलब्ध साधने वापरून लोकशाही राज्यकर्ते बहुसंख्य नागरिकांची मने स्वस्थितीविषयी उदासीन बनवितात. इतकी की त्यांना कशाचीही चीड येत नाही. विरोधी मतांविषयी आस्था वाटत नाही. विरोधी मते ऐकाविशी त्यांना वाटत नाहीत. एकल्यास त्याप्रमाणे प्रतिक्रिया व्यक्त करावेसे त्यांना वाटत नाही. कारण विरोधी मतवाल्यांच्या टीकेचे मर्म जाणण्याची त्यांची शक्ती राज्यकर्त्यांनी खच्ची केलेली असते. तेव्हा वरवर जरी लोकशाहीमध्ये विरोधी विचार बाळगण्याचे व मांडण्याचे स्वातंत्र्य जनतेला असल्याचे दिसत असले तरी एकूण कृतीच्या मापाने पाहता हे स्वातंत्र्य असून नसल्यासारखेच आहे. लोकशाही जनतेला तत्त्वतः विचारस्वातंत्र्य आणि राज्यकारभारामध्ये सहभाग असला तरी खरे पाहता त्यांना विचारस्वातंत्र्यही असत नाही आणि राज्यकारभारामध्ये सहभागही असत नाही. तेव्हा विरोधी मतांविषयीची सहिष्णुता ही एक खोटी व अपाय-कारक गोष्ट आहे. मारक्यूज यांच्या मताप्रमाणे राजकारणात व लोककारणात असणारा संघर्ष ही एकीकडे पूर्ण लोकशाही आणि दुसरीकडे श्रेष्ठींची सत्ता (Elites) या दोघांमध्ये नसून, तो प्रस्थापित, विद्यमान दडपशाही-वादी श्रेष्ठी आणि तथाकथित पूर्ण स्वातंत्र्य घेऊन येणारे मारक्यूज म्हणतात ते भविष्यातील श्रेष्ठी यांच्यातील संघर्ष आहे. या दोन श्रेष्ठींपैकी मारक्यूज ज्यांचा पक्ष घेतात त्या श्रेष्ठींची सत्ता उत्तम असते. कारण ते विद्यमान श्रेष्ठींच्या सत्तेला विरोध करीत असतात व त्यांच्यामुळे स्वातंत्र्य विस्तारित होणार असते. अर्थात कोठल्याही परिस्थितीत सत्ता ही त्या-त्या समाजातील कोठल्या ना कोठल्या श्रेष्ठींच्याच हातात असणार आहे. सत्ता बहुजनसमाजाच्या हाती कधीच जाऊ शकत नाही. मारक्यूज यांच्या म्हणण्याचा एक गर्भित अर्थ असा की स्वातंत्र्य ही वस्तू स्वभावतः मूल्यवान नाही. कारण भाषण स्वातंत्र्याचाच गैरवापर करून लोकशाहीवादी राज्यकर्ते लोकांची मते स्वतःच्या बाजूला फितवून त्यांना क्रांतीपासून पराङमुख करीत असतात. विद्यमान समाजात लोक क्रांती करण्याच्या दृष्टीने जे उदासीन बनले आहेत त्याचे कारण सत्ताधाऱ्यांना मिळालेल्या भाषणस्वातंत्र्याचा दुरुपयोग करून सत्ताधारी पक्षाने जनतेमध्ये असत्याचा प्रचार केला आहे व असत्य हेच सत्य



अनुक्रमणिका



असे मानावयास त्या जनतेला शिकविले आहे हे आहे. जनतेला त्यांनी एक प्रकारची भूल पाडून स्वतःवर विश्वास ठेवावयास प्रवृत्त केले आहे. तात्पर्य भाषणस्वातंत्र्य, प्रचारस्वातंत्र्यामुळे आमजनतेचा फायदा होण्याऐवजी तोटा होत असतो. एक फसवणूक, एक प्रमाद त्यामुळे चिरस्थायी बनण्यास मदत होत असते. मारक्यूज यांच्या ह्या प्रबंधानुसार भाषणस्वातंत्र्य ही वस्तू त्या वस्तूसाठी मौलिक नाही. लोकशाहीत भाषणस्वातंत्र्य वगैरे चालवून घेतले जाते आणि विरोधी मतांविषयी सहिष्णुता दाखविली जाते कारण परिणामाच्या दृष्टीने त्याला काही महत्त्व नाही हे राज्यकर्ते ओळखून असतात. लोकशाही सहिष्णुता ही शुद्ध फसवणूक आहे. इतर सर्व गोष्टी दुर्लक्षित कराव्यात इतक्या महत्त्वाची भाषणस्वातंत्र्य ही वस्तू नव्हे. कारण भाषणस्वातंत्र्यामुळेच खोटया मतांचा प्रचार आणि प्रसार होत असतो. " सहिष्णुतेचा आधार सत्य " या सत्याचे राखणदार क्रांतिवादी अल्पसंख्य नि मारक्यूज यांच्यासारखे त्या अल्पसंख्येचे बुद्धिवादी प्रवक्ते. या सत्याचे शिक्षण देऊन बहुसंख्येला मुक्त करायचें आहे व ते काम या अल्पसंख्येकडे असून त्यासाठी प्रतिस्पर्धी व घातुक मते दडपून टाकण्याचा आणि त्यांचा बंदोबस्त करण्याचा हक्क अल्पसंख्येला आहे. मारक्यूज यांच्या सहिष्णुतेच्या तत्त्वाचा आढावा घेतला की हे कळून येते की मारक्यूज यांची सहिष्णुतेची (Tolerance) संकल्पना फक्त डाव्यासाठी आहे. उजव्यासाठी त्याचा वापर करायचा नाही. उलट रोलंड बार्थे हे गृहस्थ मिथ्‌ची कल्पना (निंदाव्यंजक अर्थाने) फक्त उजव्यांच्या बाबतीत वापरावयास तयार आहेत. मारक्यूज आणि बार्थे या दोघांचीही राजकीय विचारसरणी मॅनिकी छाप आहे. मणी नावाचा एक तत्त्ववेत्ता ख्रिस्ताब्ध तिसऱ्या शतकात होऊन गेला. त्याचे म्हणणे असे की जगातील प्रत्येक वस्तूची उत्पत्ती उजेड आणि अंधार, पाप आणि पुण्य या दोन प्रमुख तत्त्वातून झालेली आहे. मणीचे अनुयायी काळा किंवा पांढरा या फक्त दोन रंगातून जग पाहतात. मारक्यूज आणि बार्थे यांची राजकीय विचारसरणी हुबेहुब मणीवाद्यांसारखी आहे. त्यानाही काळा अथवा पांढरा एवढे दोनच रंग दिसतात. जे पांढरे नाही ते काळे नि जे काळे नाही ते पांढरे, अशा प्रकारची एकांतिक व हटवादी मते स्वीकारण्यात ते कांट आणि मार्क्स यांच्या विचारसरणींचा मोठाच अपमान करीत असतात. जणूकाही हे दोघे जन्मासच आले नव्हते व त्यांच्याकडून मनुष्य आणि इतिहासाशी असलेला मनुष्याचा संबंध याविषयी काही भाष्यच कधी केले गेले नव्हते. मणीछाप हटवादी राजकीय दृष्टिकोन स्वीकारून कांटने मनुष्यासंबंधी मांडलेली काही अबाधिते तर हे दोघे बाजूस लोटतातच परंतु







वर उल्लेखिली ती एकांतिक भूमिका घेऊन इतिहास आणि मानव यांच्यासंबंधी कार्लमार्क्सने मांडलेली काही महत्त्वाची तत्त्वेही ते ठोकरून लावीत असतात. कांट म्हणत असे की प्रत्येक व्यक्ती ही तिच्यापुरती साध्यच आहे नि तिला साधनाप्रमाणे वागविले जाणे याच्याइतकी दुर्दैवी गोष्ट जगात कुठलीही नसेल. तसेच एका मनुष्याच्या शरीरावर व मनावर दुसऱ्याचा तावा चालणे यापरते अधिक वाईट जगात काहीही नसेल. कार्लमार्क्सने मानवी इतिहासासंबंधी म्हटले आहे की मानवी इतिहासाचा विकास वादप्रतिवादात्मक पद्धतीने होतो. वादप्रतिवाद आणि दोन बाजूंचा अधिक वरच्या स्तरावरील समन्वय असे हे विकासाचे सूत्र असते. त्यात एकांगीपणाला वाव नसतो. तरीही आमचे वार्थे आणि मारक्यूज[1] महाशय कांटने तर्कशास्त्रीय विचारपद्धतीबद्दल मांडलेले एकरूपतेचे आणि विभिन्नतेचे तत्त्व आणि मार्क्सचे वादप्रतिवादात्मक विकासाचे तत्त्व बाजूला सारून या प्रकारची समतोल विचाराची सूत्रे कधी अस्तित्वातच आली नव्हती अशा प्रकारे आपले विचार एकांगीपणाने मांडित असतात हे आश्चर्यच नव्हे काय ? कोणी म्हणतो, ' मिथ्ससारख्या प्रकारांची डाव्या पक्षाला गरज नाही. ' या प्रकारांची गरज उजव्या पक्षांना. तर दुसरा कोणी सहिष्णुतेची मिथ् डाव्यांसाठी उपयोगात आणावयास तयार आहे. उजव्यानी मात्र ती वापरण्यावर त्याचा कटाक्ष आहे. मला नवल वाटते ते याचे की हे लोक क्रांतीची मिथ् सोडून इतर अनेक अवांतर मिथ्विषयी गंभीर विचार करावयास तयार आहेत पण क्रांतीच्या मिथ्चा प्रश्न आला की यांची बुद्धी जाते कोठे ?

मारक्यूज जेव्हा असे प्रतिपादितात की, इतर अनेक गोष्टींना डावलावे इतक्या महत्त्वाची भाषणस्वातंत्र्य ही गोष्ट नाही. क्रांतिवादी अल्पसंख्य गटाने प्रसंगी दडपशाहीही करून घातुक व प्रतिस्पर्धी मने दडपून टाकावयास हवीत आणि बहुसंख्येला मुक्त करावयास हवे, तेव्हा ते जागतिक अन्यायाला व हिंसेलाच पाठिंबा देत असतात. मारक्यूज यांची या प्रकारची विचारसरणी केवळ चुकच नव्हे तर भयानक, धोकेबाजही आहे. ही विचारसरणी जर जगात यशस्वी झाली तर वैचारिक प्रगती आणि मानवी स्वातंत्र्य या दोन्ही गोष्टी तावडतोब मोडीत निघतील. मारक्यूज यांच्या विचारातील गंमत ही आहे की युरोपमधील उदारमतवादी व उजव्या विचारसरणीच्या विचारवंतांनी डाव्या विचारसरणीला चिकटविलेले व डाव्यांनी जे कधीच मान्य केले नाही असे एक

---

१. मारक्यूज आणि त्यांचे भाषणस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्यसंबंधीचे विचार.

प्रमेय व आरोप या ठिकाणी मारक्यूज डाव्यांसाठी मान्य [illegible] [illegible] लेनिन वगैरे डावे विचारवंत काही कामासाठी का होईना पण [illegible] [illegible] वहुसंख्येची हुकूमशाही अस्तित्वात असते असे प्रतिपादन करतात. लेनिन वगैरेंचे म्हणणे असे की समाजामध्ये क्रांतीविरोधी असे जे अल्पसंख्य असतात व ज्यांना क्रांती नको असते त्यांना पराभूत करून त्या ठिकाणी जनता आपली हुकूमशाही प्रस्थापित करते. लेनिन वगैरेंच्या या प्रतिपादनाच्या उलट इतर उजवे विचारवंत असे म्हणतात की डाव्यांच्या शासनात नेहमीच अल्पसंख्येची हुकूमशाही असते. डावे अर्थात हे प्रतिपादन अमान्य करतात. मारक्यूज ते मान्य करतात. त्यांच्या मते शासन हे नेहमी हुकूमशाहीच्या व त्यातल्या त्यात अल्पसंख्येच्या हुकूमशाहीच्याच स्वरूपाचे असू शकते. मारक्यूज यांचे हे मत भयंकर धोकादायक आहे. मारक्यूज आणखी असे म्हणतात की सत्याचा पाठिंबा सहिष्णुता. परंतु सत्याचा आधार व पाठिंबा तार्किक आणि विवेचक बुद्धी, समंजसपणा, बुद्धिनिष्ठता यांचा. बुद्धीची कास धरली तरच सत्य प्राप्त होत असते. बुद्धिनिष्ठता नसेल तर सत्याची प्राप्ती तर होणार नाहीच परंतु आणखी अनेक अपाय त्यातून होतील. एखाद्या मनुष्याची एकूणएक विद्यमान मते बरोवर असतील. मात्र तो मनुष्य बुद्धिनिष्ठ नसेल. याचा अर्थ असा की उद्या कदाचित तो चुकीची मते धारण करू लागेल. कारण आपली मते बुद्धीच्या कसोटीवर घासून घ्यायची त्याला सवय नाही. उलट दुसरा एक मनुष्य आहे. त्याची या क्षणाची सर्वच्या सर्व मते चुकीची आहेत. परंतु खुद्द तो मनुष्य मात्र बुद्धिनिष्ठ आहे. अशा वेळी त्याची आजची सर्व मते जरी चुकीची असली तरी उद्या ती मते सुधारली जाण्याची शक्यता त्याच्या बाव-तीत असते. पहिल्याच्या बावतीत ही शक्यता नाही. या ठिकाणी महत्त्वाची गोष्ट ही की व्यक्तीपाशी बुद्धिनिष्ठता असेल तर आज ना उद्या सत्याची प्राप्ती तिला होऊ शकेल. पण ती जर मुळातच अवुद्धिनिष्ठ असेल तर तिचा साराच कारभार आटोपला. आता बुद्धिवादी असणे म्हणजे काय ? बुद्धिवादी असणे म्हणजे कोठल्याही प्रश्नाचा विचार करताना बाजूचा आणि विरुद्ध असा दोन्ही बाजूंचा पुरावा व्यवस्थित पाहून व तोलून आपला काय तो निर्णय देणे. मुख्य म्हणजे आपल्या प्रतिपादनाच्या, आपल्या हेतूच्या विरुद्ध जाणाराही पुरावा स्वीकारावयास मनाची तयारी ठेवणे. आपल्या मतावर आक्षेप घेतला गेला तर त्या आक्षेपाची दखल घ्यावयास व गरज पडल्यास त्याप्रमाणे आपल्या मतात वदल करावयास तयार असणे. म्हणून मारक्यूज म्हणतात त्याप्रमाणे मानवी सहिष्णुतेवरच प्रतिबंध आणणे, म्हणजे प्रस्थापित

मतांवर आक्षेप घेण्याचे, त्यांच्यावर टीका करण्याचे आक्षेपकांचे स्वातंत्र्यच हिरावून घेणे होय. हे स्वातंत्र्य हिरावून घेतले गेल्यास बौद्धिकता वाढणार नाही. तर ती कमी होणार आहे. आपणही चुका करू शकतो, आपणही स्खलनशील आहोत हे मान्य करण्यातच बौद्धिकतेची वाढ आहे.

स्टॅलिनने जी मुक्तभू आणि स्वातंत्र्यप्रेमी रशिया नामक मिथ् निर्माण केली होती आणि जी मिथ् अभंग राखण्यासाठी " परदेशात उठाव–चळवळींची व प्रचारकार्याची " दले उभारली होती त्या दलांची गरज बार्थेसारख्या मंडळींच्या बाबतीत असत नाही. कारण खोट्या प्रचाराशिवायच ते तसल्या मिथ्‌मवर आपण होऊन विश्वास ठेवावयास तयार असतात. आता बार्थेसारखे स्टॅलिन–विरोधी क्रांतिवादीसुद्धा जेव्हा स्टॅलिनी मिथ् ही मिथ्‌च नव्हे, मिथ्‌ची गरज डाव्यांना कधीच नसते असे म्हणतात व स्वतःच्या त्या म्हणण्यावर आंधळा विश्वास ठेवतात, तेव्हा काही लोकांच्या बाबतीत तरी मिथ्‌संबंधी विश्वास निर्माण करण्यासाठी जबरदस्ती व खोटा प्रचार यांची गरज नसते; ते आपसूकच स्वतःच्या शहाणपणाच्या घमेंडीत अशा मिथ्‌सना बळी पडतात असे म्हणावे लागते. डाव्या बुद्धिवाद्यांचा हा उच्चभ्रू नि शिष्ट आंधळेपणा पाहिला की मिथ् चिरस्थायी कशा बनतात यामागील एका नवीन कारणाचा उलगडा आपणास होतो. त्यांच्या अंधश्रद्धेमुळे मिथ्‌सच्या चिरस्थायीपणाच्या एका नवीन घटकाची समज आपणास येते. घटक असा : " भविष्यासंबंधाचे भाकित खोटे ठरले की त्यामागील विश्वासाला बुद्धिवादाचा साज द्यावा. विश्वासाचे रूपांतर बुद्धिवादात करावे, की संप्रदाय कायम टिकून राहतो. संप्रदायाच्या श्रद्धेला तडा जात नाही. " (यालाच " फेस्टिंजर–प्रभाव " असे नाव मी दिले आहे. कारण फेस्टिंजर यांनी या तत्त्वावर आधारित एक ग्रंथ लिहिला आहे. त्यात ते असे प्रतिपादन करतात की राजकीय वा इतर द्रष्ट्यांची भाकिते खोटी ठरली की त्यांचे–त्यांचे अनुयायी त्या–त्या भाकितांना बुद्धिवादाचा साज चढवून व त्याचा बुद्धिवाद बनवून संप्रदाय टिकवून धरतात. ) मिथ्‌च्या कल्पनाकडे पाहाण्याचा बार्थे आणि गारौडी या दोघांचा दृष्टिकोन परस्परविरुद्ध असला तरी तो कम्युनिस्ट मतप्रणालीच्या चष्म्यातूनच पाहणारा दृष्टिकोन आहे. त्यात व्यावहारिक दृष्टी नाही. केवळ तात्त्विक दृष्टीतून ते त्या घटनांचा विचार करतात. हे त्या दोघांच्या दृष्टीतील महत्त्वाचे साम्य आहे. बार्थे यांच्या दृष्टीने मिथ् ही एक नकारात्मक वस्तू आहे. कारण तिच्यामुळे ' बूर्झ्वा प्रस्थापित ' चिरस्थायी होण्यास हातभार लागतो. त्याच्या उलट गारौडी असे मानतात की मिथ् ही एक होकारात्मक वस्तू आहे कारण

प्रस्थापिताला तिच्यामुळे शह बसतो व प्रस्थापित दूर करण्यासाठी तिचा उपयोग होतो. या दोघांचे हे दृष्टिकोन बघितले की बार्थे व गारौडी हे दोघेही अद्यापि क्रांतीच्या मिथ्चे बंदिवान आहेत हे पटू लागते. कारण सामाजिक बदलांच्या गुणदोषांचा विचार न करता बदल म्हटला की तो इष्टच असला पाहिजे अशी त्यांची भूमिका असून बदलाचे आदर्शीकरण ते करीत आहेत. थोडक्यात चिकित्सक बुद्धीने क्रांतीच्या कल्पनांचा विचार करावयाचे सोडून ते केवळ स्वप्नरंजनात रमत आहेत.

क्रांतीचे कल्पन जोखताना परिणामाची इष्टानिष्टता जोखण्याचे काम आपण सुरू केले पाहिजे. थोडक्यात क्रांतीनंतर क्रांतीच्या मार्गे जे नवे जग निर्माण होणार आहे, त्या नव्या जगाच्या गुणदोषांचा, नफातोटयाचा हिशेब करून मग त्या हिशेबाच्या प्रकाशात क्रांतीच्या कल्पनाचे मूल्य करावयास हवे. म्हणजे क्रांती या शब्दाची जी जादू आपल्या मनावर नेहमी घडून येत असते ती तशी घडून येणार नाही. एवढेच नव्हे तर क्रांती या शब्दात मिथ्चा जो अंश आहे तोही त्यामुळे नाहीसा होईल आणि क्रांती हा फक्त सामाजिक आणि राजकीय बदलांचाच तेवढा प्रश्न उरेल. त्याच्यातील गूढ संपून जाईल. असे झाले की बदलांचा हिशेब त्या बदलांसाठी द्यावी लागलेली जीवित आणि वित्ताच्या रूपातील किंमत व त्यातून झालेला फायदा यांच्यावर करावा लागेल. क्रांतीच्या घटनेकडे पाहण्याचा हा एक प्रकार. परंतु दुसऱ्याही एका प्रकारे क्रांतीच्या प्रक्रियेचा विचार आपणास करता येण्यासारखा आहे. वरील दृष्टिकोनात क्रांती हे राजकारणाचे व समाजकारणाचे एक तंत्र म्हणून आपण क्रांतीकडे पाहिले. या दुसऱ्या दृष्टीकोनात त्यापेक्षा वेगळ्या दृष्टीने आपण क्रांतीकडे पाहू शकतो. क्रांती ही फक्त सामाजिक व राजकीय बदल आणते एवढेच काही नाही. तर क्रांतीमध्ये कित्येक मानवी संस्था नष्ट होतात. मनुष्याच्या व्यवहाराच्या पद्धती बदलतात. काही नव्याच संस्था अस्तित्वात येतात. काही संस्था आणि व्यवहारपद्धती यांच्यात सुरू असलेला बदल पूर्णतया थांबतो किंवा त्या नवे वळण घेतात किंवा त्यांच्या बदलण्याची गती कमीअधिक होते. अशा प्रकारे गुंतागुंतीची अशी ही प्रक्रिया असते. तेव्हा क्रांती म्हणजे राजकीय-सामाजिक बदलाचे एक तंत्र हा नेहमीचा क्रांतीविषयक दृष्टिकोन न स्वीकारता क्रांती म्हणजे वर म्हटले त्याप्रकारे विविध क्रिया-प्रक्रियांची एक गुंतागुंतीची रचना असा दृष्टिकोन स्वीकारून क्रांतीकडे पाहता येईल. हा दृष्टिकोन स्वीकारला की आजवर ज्या क्रांत्या घडून गेल्या त्यांच्याविषयी नवीन निष्कर्ष काढता येतील. उदा., फ्रान्समधील राज्यक्रांतीच्या



अनुक्रमणिका

बाबतीत असे म्हणता येईल की जर ही राज्यक्रांती त्या वेळी तेथे घडून आली नसती तर फ्रान्सचे औद्योगीकरण अतिशय मोठ्या वेगाने घडून आले असते. किंवा ही क्रांती घडून आली नसती तर ब्रिटनमध्ये रिफॉर्म बिल अधिक लवकर पसार झाले असते. रशियातील ऑक्टोबर-क्रांतीच्याही संदर्भात अशा प्रकारची वेगळी निदाने करता येण्यासारखी आहेत. उदा., ऑक्टोबर-क्रांतीच्या बाबतीत असे म्हणता येईल की जर त्या वेळी ही क्रांती घडून आली नसती तर रशियातील हुकूमशाहीची संस्था बळकट न बनता दुबळी बनली असती. तात्पर्य असे की इतिहासाची देवता जी क्लिओ तिच्यावर अत्याचार आणि बलात्कार केला गेला की ती तिच्यावर बलात्कार करणाऱ्या देशावर सूड घेतल्यावाचून राहत नाही. ज्या-ज्या देशातून मोठ्या क्रांत्या व किंवा मोठे क्रांतिकारी बदल घडवून आणण्याचे प्रयत्न झाले त्या-त्या देशांमध्ये मूळच्या परंपरा पुन्हा प्रस्थापित झाल्यावाचून राहिलेल्या नाहीत. कसे का होईना पण ज्या परंपरा क्रांतीच्या प्रक्रियेत नष्ट केल्या जातात त्या कालांतराने पुन्हा डोके वर काढल्यावाचून व नव्या वेषात आपले अस्तित्व प्रकट केल्यावाचून राहत नाहीत. हा निसर्गाचा कायदा आहे. काळ उलटला की परंपरांचे अभंगत्व सूड घ्यावा तसे तेथे पुन्हा प्रस्थापित झालेले असते. कदाचित असेही असावे की जेव्हा क्रांती घडून येते तेव्हा त्या-त्या देशात होणारे बदल अतिशय घिसाड-घाईने व आकस्मिकपणे घडून येत असावेत. त्या देशातील जनतेला ते मानवत नसावेत. तिच्या मूळ स्वभावाशी ते सुसंगत नसावेत व म्हणून असे घडत असावे. कदाचित असेही असावे की या बदलांबरोबर इतक्या वर्षांची आपली ऐतिहासिक ओळख, आपला वैशिष्टचपूर्ण मीपणा संपुष्टात येणार याची भीती तेथील रहिवाश्यास वाटल्यामुळे त्यांच्या अप्रकट मनातून त्या बदलांना प्रतिकार होत असावा आणि आपली इतक्या शतकांची ओळख टिकवून धरण्यासाठी तेथील लोक जुन्या परंपरांना व आचारविचारांना आणि संस्था-संप्रदायांना चिकटून धरू पाहत असावेत. परंतु कोठल्याही राष्ट्राची उत्क्रांती आकस्मिक व क्रांतिकारी " उडीने " जेव्हा अवचितपणे खंडित केली जाते तेव्हा तेथील जनता त्यांच्या परंपरांना व संप्रदायांना दुप्पट जोमाने चिकटून राहू पाहते ही एक नेहमीच्या पाहण्यातील गोष्ट आहे. या सर्व प्रकाराचा सर्वात वाईट असा जो परिणाम होतो तो त्या देशाच्या भावी प्रगतीवर होय. त्या देशातील परंपरांत आणि आचारव्यवहारात कित्येक संथ बदल अपेक्षित असतात. इतक्या आकस्मिक प्रकारे क्रांतीसारखी उत्पाती घटना तेथे घडून आली नसती तर हे बदल स्वाभाविकपणेच तेथे घडून येऊ



अनुक्रमणिका

शकले असते. हे बदल इष्टही असतात. परंतु क्रांतीच्या उत्पाती प्रकरणांत नको त्या संस्था वर येतात किंवा मरू घातलेल्या संस्थांना व परंपरांना नवे जीवन लाभते, संजीवनी मिळावी त्याप्रमाणे नव्या जोमाने त्या संस्था व परंपरा उठून कार्य करू लागतात. ज्या संस्था व परंपरा नष्ट झाल्यामुळे तेथील लोकांचे जीवन उत्तम बनणार होते त्याच देशाच्या बोकांडी त्या संस्था व परंपरा दुप्पट जोराने बसून त्या देशाचे कायम नुकसान होते. कित्येक चांगल्या कायद्याना तो देश मुकतो. क्रांतीसारख्या घटनेचा राष्ट्रीय मनावर जो आणखी एक परिणाम होतो तो क्रांतीच्या सर्वहितेषू भूमिकेलाही मारक असतो. उदा०, जेथे क्रांती घडून येते तेथील लोकांची राष्ट्रविषयक भावना जबरदस्त तीव्र बनते. त्यांच्यात कडव्या राष्ट्रवादाचा संचार होतो आणि अशा प्रकारे अखिल मानवजातीत बंधुता निर्माण करण्याच्या क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचा क्रांतीच्या घटनेमुळे पूर्ण बोजवारा उडतो.

वास्तविक क्रांती आणि युटोपिया किंवा रामराज्यआदर्श या दोन संपूर्णतः पृथक वस्तू असतात. युटोपिया आणि क्रांती यांचा अर्थाअर्थी संबंध नाही. पूर्वी जेव्हा युटोपियाच्या कल्पना मांडल्या गेल्या तेव्हा हा युटोपिया येण्यासाठी राज्य-क्रांतीच घडून आली पाहिजे अशा प्रकारची पूर्वअट सूचित केली गेली नव्हती पण अलीकडे क्रांती आणि युटोपिया या दोन कल्पनांचे एकत्रीकरण केले गेले आहे. युटोपिया हा क्रांतीच्याच मार्गे येऊ शकतो असे सूचित केले गेले आहे. क्रांती व युटोपिया या दोन कल्पना अशा प्रकारे एकत्रित जोडल्या गेल्यामुळे मला वाटते की एक नवाच प्रश्न क्रांतीच्या पुरस्कर्त्यापुढे उभा राहिला आहे. नवा प्रश्न क्रांती आणि युटोपिया या दोन कल्पना एकत्रित केल्या गेल्यामुळे उपस्थित होतो व हा प्रश्न आमच्याच काळाला भासू लागला आहे. कारण या कल्पनांचे एकत्रीकरण फक्त आमच्या काळात घडून आले आहे. पूर्वी क्रांतीला जनमानसात जो अधिकार होता त्याच्याशी युटोपियाच्या कल्पनेचा संबंध नव्हता. क्रांतीची कल्पना स्वतःच्या अधिकाराने तेव्हा लोकांमध्ये कार्य करीत होती. आता ती कल्पना युटोपियाच्या कल्पनेशी जोडण्यात आली आहे. आता क्रांतीच्या कल्पनेला जनमानसात जो अधिकार व मान मिळतो तो त्या क्रांतीमुळे युटोपिया प्रस्थापित होणार असतो म्हणून क्रांतीचे वैधपण त्या प्रक्रियेतून युटोपिया येणार आहे या कल्पनेवर अवलंबून असते. परंतु क्रांतीमुळे युटोपिया प्रस्थापित होणार आहे असे मानले तर ती क्रांती एकदा होऊन थांबणारी क्रांती असू शकत नाही. ती क्रांती नेहमी ‘ चिरक्रांती ’ असू शकते. युटोपिया हा नेहमी भविष्याशी संबंधित असतो. त्यामुळे एकदा क्रांती

होऊन जी परिस्थिती येणार असते ती युटोपियात मोडणार नसते. युटोपिया ही भविष्यात असणारी स्थिती आहे. भविष्याशी निगडीत स्थिती आहे. तो प्रत्यक्षात आणण्यासाठी नवी क्रांती हवी आहे. युटोपिया म्हणजेच अप्रस्थापित आजच्यानंतर येणारी उद्याची आदर्श स्थिती. तेव्हा क्रांती आणि युटोपिया या दोन कल्पनांचे एकत्रीकरण केले गेले की क्रांती ही चिरक्रांती समजावी लागते किंवा तसे समजायचे नसेल तर युटोपिया म्हणजे अप्रस्थापित आदर्श व्यवस्था हा तरी युटोपियाचा अर्थ टाकून द्यावा लागेल. जर क्रांती चिरक्रांती समजायचे नसेल आणि युटोपियाचीही कल्पना टाकून द्यायची नसेल, तर थातुरमाथुर करून व शाब्दिक हातचलाखी करून आणि आपल्या विचारप्रणालीचा नवीन अर्थ लावून त्या दोन्ही कल्पना एकत्रित राखता येतील. परंतु अशा प्रकारच्या शब्दच्छलाने युटोपियाची कल्पना नि:सत्व व क्षुद्र बनविली गेल्यावाचून क्रांती आणि युटोपिया यांची जी सांगड आधुनिक मनात घातली गेली आहे तिचा प्रभाव कमी होण्यासारखा नाही. यात एक मोठी अडचण आहे. क्रांती घडून आल्यावर, क्रांती आणणार होती त्या युटोपियावरून लोकांचे लक्ष दूर करण्याचे प्रयत्न केले गेले की लोक " क्रांतीचा विश्वासघात केला गेला " या प्रकारचा ओरडा सुरू करतात. इतक्या क्रांती आणि आदर्श राज्यव्यवस्थेची प्रस्थापना या दोन कल्पना लोकांच्या मनात एकजीव झालेल्या आहेत. बरे, क्रांतीच्या पुरस्कर्त्यांनी युटोपियाच्या वाघाच्या पाठीवरून खाली उतरायचे म्हटले तरी तेही त्यांना जमण्यासारखे नसते. कारण तसे त्यांनी केले तर क्रांतीच्या कल्पने-मागील आध्यात्मिक व तात्त्विक आधारच त्यानी काढून घेतल्यागत होते. क्रांतीपाठोपाठ युटोपिया निर्माण होणार आहे हीच आशा क्रांतीच्या तत्त्व-ज्ञानाला न्याय्य ठरवीत असते. तात्पर्य क्रांतीच्या नंतर एकूण व्यवस्थेत सुरळीतपणा आणण्याचे जे प्रयत्न केले जातात त्यांच्यासाठी फारच किंमत द्यावी लागते.—आता पाहा. फ्रान्समध्ये राज्यक्रांती झाली. क्रांतीने तेथे "विचारशक्ती आणि बुद्धीचे " राज्य आणले. परंतु थर्मिडोर आणि ब्रूमेर महिन्यांबरोबर त्या राज्याचा शेवट झाला. ब्रुमेर हा फ्रेंच क्रांतिवाद्यांच्या पंचांगातला दुसरा महिना ( २२ आक्टो.—२० नवंबर ) फ्रेंच भाषेत 'ब्रूम' म्हणजे धुके. तेव्हा या ब्रूमेर महिन्याने क्रांतिवाद्यांसाठी काय आणले असेल ते तुम्हीच ओळखा. नऊ ब्रूमेरला (९ नवंबर १७९९) नेपोलियन फ्रान्सचा पहिला कॉन्सल झाला. ब्रूमेरने फ्रेंच क्रांतिवाद्यांसाठी धुके नि गोंधळ आणला. थर्मि-डॉरने रॉबस्पियरचे उच्चाटण पाहिले. हा फ्रेंच राज्यक्रांतीच्या पंचांगातला



अनुक्रमणिका

अकरावा महिना. (अर्धा जुलै – अर्धा ऑगष्ट) रॉबेस्पियर वकील हा "विचारशक्तीच्या राज्याचा" संस्थापक. ग्रीक भाषेत Therme म्हणजे ऊष्णता आणि doron म्हणजे देणगी. थर्मिडॉर महिन्याने क्रांतिवाद्यांसाठी देणगी आणली ती ऊष्णतेची ! क्रांतीने फ्रेंच जीवनात उत्पात घडविला. फ्रेंच जीवनातील उत्क्रांतीमय समतोल विघडवून टाकला. नेपोलियनची युद्धे आणि राजेशाहीची पुनर्प्रस्थापना यानंतर कुठे हा तोल सावरला गेला. आता रशियन राज्यक्रांती. "वर्गहीन समाजाची प्रस्थापना" हा कम्युनिस्टांचा युटोपिया. पण याच युटोपियाच्या अस्तित्वामुळे समाजातील क्रांतीचे परिवर्तन थांबवून तिथे स्थिरस्थावर आणणे राज्यकर्त्यांना कठीण होऊन बसले आहे. क्रांतीची कल्पना थांबवून समाजात स्थैर्य आणण्याची गोष्ट या ठिकाणी अधिकच कठीण बनली आहे याला कारण 'वर्गहीन समाजाचा युटोपिया' हाच तेथे घडून आलेल्या क्रांतीचा बौद्धिक आधार आहे. तेथीलच नव्हे, तर इतरही देशात ज्या कम्युनिस्ट क्रांतिचळवळी चालविल्या जातात त्यांनाही न्याय्यता आणि समर्थन याच युटोपियातून मिळत असते. एवढेच नव्हे तर कम्युनिझमच्या आंतरराष्ट्रीय चळवळीलाही युटोपियाची हीच कल्पना आधार पुरविते. तिच्याच नावाने क्रांतीच्या चळवळीला आवाहन करता येते. ही कल्पना टाकून दिली तर क्रांतीची सयुक्तिकता पटवून देता येणार नाही. तेव्हा काही ना काही लटपटी–खटपटी करून युटोपियासाठी प्रयत्न चालू आहेत असे सतत भासवत राहावे लागते. स्टॅलिनच्या अमदानीतील "लोकांच्या जीवनाचे सामुदायिकीकरण आणि त्यातील क्रौर्य व दहशत", माओच्या अमदानीतील लोकविश्रुत "हनुमान झेप" आणि "सांस्कृतिक क्रांती" ही सर्व चिरक्रांतीतून युटोपिया आणीत आहोत हा वहाणा करण्यासाठी केली गेलेली ती नाटके होती. मानवी जीवनाच्या संदर्भात फक्त दोन मार्ग लागू असतात. –एक उत्क्रांती वादाचा; दुसरा क्रांतिवादाचा. परंतु सलगता आणि परिवर्तन या बाबतीतील या दोन्ही मार्गात अंतर्भूत असणारी वाद–प्रतिवादाची प्रकृती परस्परांपासून सर्वस्वी भिन्न असते.

× × × ×

क्रांतिवादी बुद्धिवाद्यांच्या क्रांतीपासूनच्या अपेक्षा आणि सहस्त्र वर्षांचे भरभराटीचे राज्य आणणाऱ्या क्रांत्यांचे प्रत्यक्ष परिणाम व त्यांना द्यावी लागणारी मानवी वित्त आणि जीविताच्या रूपातील किंमत यांचे प्रमाण नेहमी व्यस्त असते. सामाजिक–आर्थिक–राजकीय जीवनाच्या रूपातील द्यावी लाग-



अनुक्रमणिका

ही किंमत क्रांतीपासून बुद्धिवादी ज्या अपेक्षा करतात त्या अपेक्षांपेक्षा कितीतरी पट अधिक असते. या किंमतीच्या तुलनेत त्या क्रांत्या नेहमीच महागात पडलेल्या असतात. क्रांतीनंतरच्या प्रत्यक्ष व्यवहारात ही गोष्ट या मंडळींना कळून येते. एवढेच नव्हे तर आपल्याही जीवनाला तेथे काही किंमत नाही हेही त्यांचा कळून येते. ज्या क्रांतीला आपण हातभार लावला, जी क्रांती घडून यावी म्हणून आपण आपली बुद्धी खर्च केली, त्या क्रांतीच्या वेदीवरचे आपण केवळ बळी आहोत हे या क्रांतिवादी बुद्धिमान मंडळींना क्रांतीनंतर थोड्याच काळात उमजून येते. क्रांतीनंतरच्या राजकारणात आपल्या सगळ्या वर्गाचेच हत्याकांड होणार असल्याचे, आपला सगळा वर्गच्या वर्गच या प्रकरणात निर्मूलित होणार असल्याचे ते जाणू लागतात. क्रांतिमाता स्वतः-च्याच बालकांना खाऊन टाकते असे म्हणतात. पण बालकांनाच नव्हे तर आपल्या जनकांना आणि नातवंडांनाही ती खाऊन टाकीत असते. विशेषतः या मंडळींनी बुद्धीची स्वतंत्रता प्रकट करण्याचा प्रयत्न केला तर हमखासच ! युटोपियाच्या कल्पनेने भारून गेलेल्या बुद्धिजीवीतील लेखक-लोक प्रत्यक्षात काय घडत आहे हे फारच लवकर ओळखतात आणि मग वस्तुस्थितीची झलक पाहिल्यावर युटोपियाविरोधी लेखन करू लागतात. झाले, एकदा हे सुरू झाले की सुखस्वप्नांचे रूपांतर दुःस्वप्नात होऊ लागते. शोषण तर थांबलेलेच नसते आणि छळणुकीची तीव्रता पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक पटींनी वाढलेली असते. दडपशाहीचे नि दहशतीचेही प्रमाण वाढते. क्रांतीनंतर राष्ट्रवाद संपतो आणि आंतरराष्ट्रवाद येतो, मानवजातीमधील आपापसातील वैर संपून तेथे विश्वबंधुत्व निर्माण होते असे सांगितले जाते. क्रांतीनंतर प्रत्यक्षात काय घडते हे पाहायचे असेल तर चीन आणि सोव्हिएट रशिया यांच्या चालू असलेल्या वाग्युद्धात जे शब्द वापरले जात आहेत त्यांचे निरीक्षण करा; अल्बानियाच्या रेडिओ तिरानावर जे काय बोलले जाते ते ऐका; किंवा The friendship of peoples लोकमित्र (Druzhba Narodov) या सोव्हिएट नियत-कालिकाचा संपादक कट्टर ज्यूविरोधक आहे या घटनेचे मनन करा.

क्रांतीसारख्या चळवळीतील लेखकांचे भवितव्य आणि क्रांत्युत्तर राजवटी जी दिशा घेतात ती दिशा, या दोहोंचा जर एकत्रित विचार केला तर त्यावरून असे दिसून येते की क्रांतीसारख्या चळवळी या लेखकांच्या भवितव्याला बहुधा मारकच असतात. लेखकांच्या भवितव्याच्या दृष्टीने क्रांत्या ह्या विनाशाच्या हत्यारासारख्या असतात. या सर्व गोष्टी विचारात घेतल्यास युटोपियाच्या कल्पनेबद्दल ज्यांना आत्मीयता वाटायची आहे त्यांच्याही मनात युटोपिया-



अनुक्रमणिका

विषयी निराशाजनक विचार आल्यावाचून राहत नाहीत. उदा०, आर्यविंग होवे हा युटोपियाच्या कल्पनेविषयी जिव्हाळा बाळगणारा लेखक युटोपिया व ते युटोपिया व्यवहारात आणण्यासाठी जे प्रयत्न होतात त्या प्रयत्नांविषयी असे म्हणतो की,

" युटोपियांच्या बाबतीत आम्ही एक गोष्ट आता पुरती जाणली आहे. युटोपिया प्रत्यक्षात आणण्यासाठी जे सक्तीचे प्रयत्न होतात त्या प्रयत्नांमुळे युटोपियाऐवजी जंगलीपणा मात्र येत असतो. युटोपियाची सक्ती ही शेवटी रानटीपणात परिणत होते. परंतु त्याजबरोबर हीही गोष्ट खरी आहे की युटोपियासारख्या काल्पनिक आदर्श अवस्थांच्या कल्पना मनाशी न रंगविणे म्हणजे कल्पनाशक्तीचेच मरण ओढवून घेणे होय. अशा कल्पनांवाचून मनुष्य-जातीला जगताच येणार नाही. प्रश्न असा आहे की ज्यांनी आपल्या आशांना काही एक शिस्त लाविली आहे, काही एक दिशा दिली आहे त्या आमच्या-सारख्या लोकांना या बाबतीत वाकडा का होईना पण कसला ना कसला युक्तीचा मार्ग उपलब्ध आहे काय ? " आर्यविंग होवे युटोपियांच्या कार्यक्रमां-विषयी हे उद्‌गार काढतात (What's the Trouble–ऑक्टोबर १९७१, पृ. ४७१), तर जॅं. डॅनिएलसारखे काही लोक " युटोपियाच्या फलक्षमते-विषयी अद्यापीही आशावादी " असतात. ते म्हणतात की " युटोपिया हे एखादे दुर्दैव नव्हे किंवा तो भ्रम, वा आभासही नव्हे. अथवा ते मृगजळही नव्हे. "

युटोपिया हे दुर्दैव नव्हे किंवा भ्रम, आभास वा मृगजळही ते नव्हे असे म्हणणारे लोक जगात आजही अस्तित्वात आहेत हे पाहून कोणासही आश्चर्य वाटावे. कारण युटोपिया व्यवहारात आणण्याच्या हेतूसाठी ज्या भयानक कारवाया जगात आजवर केल्या गेल्या आणि मानवजातीची जी ससेहोलपट त्यात झाली ते मानवजातीचे दुःख विसरून अशा प्रकारची विधाने लोक करीत असतात. आपल्या प्रस्तुत अभ्यासाच्या दृष्टीने यात महत्त्वाचा मुद्दा असा की, युटोपिया ही एक आत्मविघातक वस्तू असून मानवजातीच्या दुःखात तिच्या-मुळे नेहमी भर पडत आली आहे, हा शहाणपणा काही एका राजकीय कल्पना-शक्तीला मान्य होत नाही. युटोपियामुळे कितीही वाईट असे दुःख निर्माण होवो पण काही एका प्रकारच्या राजकीय विचारवंतांना युटोपियाची निरर्थकता काही केलें तरी पटू शकत नाही. युटोपियाच्या जातीच्या विचारसरणीचे वैयर्थ त्यांच्या काही केले तरी ध्यानात येत नाही. युटोपियन विचारसरणीवर भोळ्या भावाने निरंतर भक्ती करणाऱ्या लोकांसंबंधी बोलताना टॉमस मोलनार हे गृहस्थ असे म्हणतात की, एका विशिष्ट जातीच्या राजकीय विचारसरणीला व



अनुक्रमणिका

कल्पनाशक्तीला युटोपियाना वाईट ठरविणे म्हणजे मनुष्य जी भव्य स्वप्ने रंगवितो त्या स्वप्न रंगविण्याला वाईट ठरविण्याइतके वाईट आहे. मनुष्य-प्राणी ज्याप्रमाणे स्वतःचे स्वप्नरंजन टाकू शकत नाही तशाच प्रकारे ही मंडळीही युटोपियन पद्धतीची विचारसरणी टाकू शकत नाहीत. या जातीची कल्पनाचित्रे रंगविण्याची सवय त्यांच्या अगदी हाडीमासी खिळलेली असते. विशेषतः वर जे विधान आम्ही केले ते क्रांतीविषयी अंधविश्वास बाळगणाऱ्या आणि क्रांतीविषयीचे प्रत्येक विधान वेदवाक्याप्रमाणे मानणाऱ्या क्रांतीवाद्यांच्या बाबतीत तर शंभर टक्के खरे आहे. क्रांती हा त्यांना मानवजातीच्या बाबती-तील एकमेव तरणोपाय वाटत असतो. वास्तव परिस्थितीचा त्यांचा संताप एवढा तीव्र असतो की, युटोपियाचे स्वतःचे स्वप्न प्रत्यक्षात उतरविण्यासाठी इटाली देशातील त्या काही नव–क्रांतिकारकांप्रमाणे काही क्रांतीकारक जगबुडी आणविण्याच्याही विचारात आहेत. काही होवो, पृथ्वी वेचिराख झाली तरी हरकत नाही पण युटोपियाचा ध्यास आपण सोडणार नाही असेच या लोकांचे म्हणणे आहे. काही होवो पण युटोपियाची कल्पना आम्ही टाकून देणार नाही असे म्हणणाऱ्या या युटोपियाभक्तांचे दोन प्रकार आहेत. त्यातील काही जण वृत्तीने काहीसे मवाळ आणि विचारशील असे आहेत. त्यांचा युटोपिया हा मिनी–युटोपिया (छोटेखानी युटोपिया) आहे. तर काहीजण अति उत्साही आणि जहाल आहेत. त्यांचा युटोपिया मॅक्सि–युटोपिया (महायुटोपिया आहे.)

पण आता येऊ घातलेले युग असे आहे की जिथे युटोपिया व्यवहारात कसा आणायचा हा प्रश्न नसून युटोपियापासून बचाव कसा करायचा हा प्रश्न आहे. जॉर्ज ऑरवेल या कादंबरीकाराने " १९८४ " नावाची कादंबरी लिहून त्या जगाची पहिली झलक आपणाला मागेच दिली आहे. आमचे युग आता ऑरवेलवर्णित जमान्यात पदार्पण करू पाहत आहे. या जमान्यात मनुष्याच्या जीवनाच्या हरएक अंगाचे बराकीकरण केले जाणार आहे. मानवी जीवनाच्या एकूणएक अंगांवर शासनाचा ताबा येणार आहे. त्याच्या जीवनात यापुढे काहीही खाजगी उरणार नाही. व्यक्ती ही केवळ शासनाच्या उपयोगाची एक क्षुद्र वस्तू बनणार आहे. ज्या उद्याच्या जगात हे घडून येणार आहे त्या जगाच्या बाबतीत युटोपियन योजना कशा प्रकारे अंमलात आणायच्या हा प्रश्न नसतो. त्या जगा-साठी प्रश्न असतो तो या भयानक आपत्तीतून मानवजातीला कसे वाचवायचे हा ! व्यक्तीचे खाजगी आयुष्य शास्त्र्यांच्या अतिक्रमणापासून कसे सुरक्षित राखायचे हा ! कारण या प्रकारचे मानवी जीवनाचे नियमन आणि नियंत्रण हाही युटोपियन विचारसरणीचाच एक भाग आहे. हेही योजनापूर्ण आयुष्याचेच

चित्र आहे. तेव्हा आजची खरी समस्या युटोपियाच्या भूमिकेतून राज्यशास्त्राची आखणी होणार नाही यासाठी सावधगिरीचे कोणते उपाय योजावयाचे ही आहे. मात्र याचा अर्थ मनुष्याची कल्पनाशक्ती यासाठी निर्जीव बनवायची आहे असा नाही. युटोपियाचा दुरुपयोग होऊ नये यासाठी युटोपियन जातीची विचारसरणी आपण टाकून दिली म्हणून कल्पनाशक्तीचे मरण ओढवणार असते हा युक्तिवाद खरा नसतो.–अनेक विविध प्रकारे आणि विविध मार्गांनी आपली कल्पनाशक्ती आपणास वापरता येण्यासारखी आहे. युटोपियन कल्पन म्हणजेच काही कल्पनाशक्तीचा वापर नव्हे. क्रांती हेच काही एकमेव आशास्थान नाही, की कल्पनाशक्ती फक्त तेवढ्याच बाबतीत राबविली जावी. मानवी आशेसाठी इतर अनेक मार्ग उपलब्ध आहेत. त्यासाठी केवळ युटोपियावरच अवलंबून राहावयास हवे असे नाही. अर्न्स्ट ब्लॉखसारखे काही विचारवंत क्रांती हेच मानवी आशेचे एकमेव आश्रयस्थान समजतात व क्रांती आणि आशेचे तत्त्व एक मानू पाहतात. हे म्हणजे क्रांतीविषयक कल्पनारम्यतेचा नि स्वप्नरंजनाचा अगदी कहर आहे. क्रांतीविषयक स्वप्नरंजन पुनरुज्जीवित झालेल्या व " नव–क्रांतिवाद्यांच्या " अपरिपक्व आणि तारुण्यसुलभ व्यर्थ बडबडीच्या या जमान्यात क्रांती आणि युटोपिया यांची गुरफट सोडवण्याकरिताच कल्पनाशक्तीची अधिक गरज असते. आजचे दिवसच असे आहेत. क्रांतीविषयीची रोमँटिक भावना आज पुन्हा एकदा चेतावली आहे. आणि " नव–क्रांतिवाद्यांच्या " किशोर कल्पनांची तिला जोड मिळत आहे. त्यामुळे क्रांती म्हणजेच युटोपियाची प्रस्थापना ही कल्पना बळावत आहे. अशाच वेळी या दोन कल्पना एक नव्हत हे मनावर बिंबविले जाणे आवश्यक आहे. कल्पनाशक्ती हा फरक पाहण्यात खर्ची पडावी. जुन्या करारातील धर्मप्रसारक (Ecelesiast) म्हणतोकी " भव्य स्वप्न जर पाहता आले नाही तर जनतेचा विनाश घडून येतो. " आता या आमच्या निष्ठावान धर्मप्रसारकाचे हे उद्‌गार खरे आहेत. पण आम्हाला हेही माहित आहे की हेच स्वप्न अतिरंजित बनले तरीही त्याच्यापायी जनतेचा विनाश घडून येऊ शकतो. तेव्हा अशी अतिरंजित स्वप्ने आणि कल्पनाचित्रे कधीही बरी नव्हेत. द्रष्टेपणाची गोष्ट ठीक आहे. पण आजच्या आमच्या द्रष्टयांनी एकदोन गोष्टी आवर्जून शिकणे भाग आहे. लोकोद्धाराच्या योजनांच्या कल्पितांचा, मग ती कल्पिते राजकीय स्वरूपाची व योजनांची असोत अथवा आध्यात्मिक व धार्मिक स्वरूपाची व योजनांची असोत, त्यांचे निखळ फलित सामान्यांच्या व बुद्धिमंतांच्या हालातच पूर्वापार होत आले आहे हे त्यांनी विसरता नये. आध्यात्मिक वा राजकीय लोकोद्धाराची ही कल्पिते राजकीय

मार्गांनी व्यवहारात उतरविण्याचे जेव्हा–जेव्हा प्रयत्न झाले तेव्हा–तेव्हा त्या प्रयत्नांचे परिणाम भयानकच झालेले आहेत. गत अनुभवांनी शिकविलेला धडा विसरण्यात कोणताच शहाणपणा नाही. नवद्रष्ट्यांनी आणि जगदुद्धारकांनी गत अनुभवाने शहाणे व्हायचे आहे. लोकोद्धाराची ही कल्पिते व सुखस्वप्नांचे आराखडे धार्मिक वा राजकीय स्वरूपाचे असतात वा होते, त्यांचे स्वरूप राजकीय आहे वा धार्मिक हा प्रश्न त्यांच्या बाबतीत महत्त्वाचा ठरत नाही. ती कल्पिते राजकीय मार्गांनी कार्यवाहीत आणण्याकरिता प्रयत्न केले गेले की त्यांच्या परिणामांचा भयंकरपणा आपोआप उघड होतो. आज तर काय, नवीन अद्यावत तंत्रवैज्ञानिक ज्ञान आणि जनमानसाचे व जनतेच्या हालचालींचे नियंत्रण करण्याच्या आधुनिक क्लृप्त्या यांच्यामुळे या कल्पितांचा भयंकरपणा शेकडो पट वाढला आहे. अशा परिस्थितीत या जातीच्या कल्पितांच्या नादी लागण्यापूर्वी प्रत्येक बुद्धिमान मनुष्याने दहादा विचार करावयास हवा. कारण तंत्रवैज्ञानिक साधने आणि मन नियंत्रित करण्याची इतर अनेक तंत्रे वापरून जनतेच्या वर्तनाला राज्यकर्त्यांना हव्या त्या प्रकारचे वळण देता येण्याच्या शक्यता निर्माण झालेल्या आहेत. अशा वेळी या कल्पितांना पाठिंबा देऊन अथवा त्यांचे गुणगान गाऊन आपणच आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यात कोणताच अर्थ. " जे अशक्य होते त्याचा जर ध्यास मनुष्याने वारंवार घेतला नसता, तर त्याच्या बाबतीत आज जे शक्य कोटीत उतरलेले दिसत आहे ते तसे कधीही दिसले नसते, हे सत्य इतिहासाने पूर्णपणे सिद्ध केले आहे, " हे मॅक्स वेबर ह्या प्रसिद्ध समाजशास्त्रज्ञाचे उद्गार शंभर टक्के खरे असले तरी त्याजबरोबर हेही खरे आहे की, " हे जे अशक्य असते " ते आजच्या जमान्यात थोड्या अधिक संयत शब्दात मांडले जावे. युटोपिया, त्या युटोपियांचा युटोपियी आवेश थोडा सौम्य व्हावा. त्याच्यातील अशक्य चिकित्सेच्या आणि नैतिक विचाराच्या थोडे अधिक कक्षेत असावे किंवा अधिक वेगळ्या शब्दात हेच सत्य सांगायचे तर असे सांगता येईल की युटोपिया कार्यान्वित करताना जे काही घडून येते त्याचा समग्र विचार डोळ्यांसमोर ठेवून युटोपियांचे संकल्पन केले जावे. म्हणजे युटोपियाची व्याख्या मूलभूत नव्या प्रकारे केली जावी. तथापि आमच्या प्रतिपादनाचा अर्थ असा नाही की वास्तवाच्या नादात वा प्रेमात आदर्शाचा संपूर्ण त्याग करावयाचा आहे. वास्तवासाठी आदर्श टाकून द्यावा असा अर्थ त्यातून निघतो काय ? छे, छे, आमच्या म्हणण्याचा रोख तसा मुळीच नाही. तसे घडलेच पाहिजे असे नाही. वास्तव आणि आदर्श यांचा उत्तम प्रकारचा समन्वय करता येण्यासारखा असतो. मानवजातीमध्ये

काल्पनिक आदर्शात रमणारे कल्पनावादी डॉन क्विक्झोट आहेत व असतील; तशाच प्रकारे रोकड व्यवहाराला धरून जगणारे सांको पांझाही आहेत व असतील. जग असे कल्पनावादी आदर्शवादी आणि व्यवहारी या दोघांचे बनलेले आहे व पुढेही ते तसेच असेल. म्हणून जी राजकीय तत्त्वज्ञाने आणि वाङ्मयीन उदात्त स्वप्ने या दोघांपैकी एकाला वगळून आपला कारभार चालवू पाहतात ती तेवढ्या प्रमाणात कल्पनावादी म्हणजे काल्पनिक आदर्शात गुंगून राहणारी असतात. ती तितक्या प्रमाणात युटोपियाच्या जातीची आहेत. अर्थात प्रत्येक प्रकारच्या तत्त्वज्ञानांचा आणि भव्य वाङ्मयीन स्वप्नांचा स्वतःचा असा काळ असतो. कधी हे स्वप्न व मानवी जीवनाचे हे चित्रण मानवी कल्पना-शक्ती आपणाकडे ओढून घेतात, तर कधी ते स्वप्न व ते चित्रण तसे करते. निरनिराळ्या काळात निरनिराळ्या प्रकारच्या भव्य कल्पनांना निरनिराळ्या प्रमाणातील स्फूर्तिदायक प्रेरक शक्ती आणि विश्वासार्हता होती. पहिला युटोपिया लिहिणाऱ्या **टॉमस मोरच्या** काळात राजकीय स्वर्गांच्या कल्पना-चित्रांना भाव होता. त्या काळी मनुष्याची राजकीय बुद्धी आजच्याइतकी प्रगल्भ झालेली नव्हती. आजच्याइतकी राजकीय जाण त्याला प्राप्त झाली नव्हती. त्यामुळे राजकारणाच्या किंवा राज्यव्यवहाराच्याच मार्गे मनुष्याचा मोक्षोद्धार आहे असे मनुष्याला वाटत असे. आजचा मनुष्य या बाबतीत किती-तरी मोठ्या प्रमाणात सुजाण व सुबुद्ध बनला आहे. राजकारणातल्या लटपटी-खटपटी व उद्योगांचे परिणाम कसे विनाशकारक होतात हे त्याने अनुभविले आहे. त्यामुळे राजकीय कल्पनाचित्रे रंगविणारे राज्यव्यवहारविषयक युटोपिया त्यांच्या दृष्टीने श्रद्धार्ह असत नाहीत. ते लोकांच्या विश्वासाला व भरंवशाला पात्र नसतात; नव्हे ज्यांना राजकीय शहाणपणा आला आहे त्यांनी युटोपिया-सारख्या राजकीय विचारसरणी टाळाव्यातच ! काम्पानेल्ला ह्या तत्त्वज्ञाने आदर्श राज्याचे जे कल्पनाचित्र रेखाटले आहे त्यात तो म्हणतो की " सगळे जग भ्रमिष्ट बनले आहे. " मारक्यूज काम्पानेल्लाच्याच पावलावर पाऊल टाकून " आधुनिक जीवनातल्या पागलपणाच्या प्रस्फोटाच्या " गोष्टी करतात. काम्पानेल्लाने सुचविलेल्या आदर्शनगरातील City of the Sun या नगरीला सात भिंतींचे कुंपण आहे. सात भिंतींच्या आत नागरिक राहिले तरच त्यांचे सद्‌गुण भ्रष्टविले जाण्यापासून वाचणार असतात. सद्‌गुणांचे रक्षण व्हावे म्हणून काम्पानेल्ला सात भिंतींचा उपाय सांगतो.

(बर्लिनमधल्या नागरिकांचे मन (साम्यवादाविरुद्ध) बिघडू नये म्हणून बर्लिनभोवती फक्त एकच भिंत आहे.) तर मारक्यूज त्यांच्या आदर्श राज्याच्या बाबतीत " मानसिक दडपशाहीच्या शेवटाच्या " आणि " पूर्ण

मुक्तीच्या " गोष्टी करतात. आम्ही वर म्हटले की आज परिस्थिती पूर्णतः पालटलेली असल्याने युटोपियाची स्पष्ट व नवीन प्रकारची व्याख्या केली जाणे आवश्यक आहे. काम्पानेल्ला आणि मारक्यूज यांच्या परस्परांना विरुद्ध असणाऱ्या आदर्श राज्यांच्या योजना पाहिल्या व त्या राज्यांचे स्वरूप ध्यानात घेतले की एवढे तरी पटेल की काम्पानेल्ला, मारक्यूज वा आर. डी. लॉईंग यानी " डोक्याच्या शाबूतपणाची " जी व्याख्या दिली आहे तिच्यापेक्षा सर्वस्वी वेगळी व्याख्या युटोपियाच्या नव–संकल्पनचित्रासाठी दिली जाणे आवश्यक आहे. कमीत कमी एवढे तरी झालेच पाहिजे.

कधीकधी कोणी असेही म्हणताना आढळतात की युटोपियाची संकल्पना टिकवून धरायची असेल तर मनुष्यजातीचे भ्रम व कल्पनाजालही टिकवून धरावयास हवीत. उदा., सॉरेल हा फ्रेंच राजकीय तत्त्वज्ञ असे लिहितो की " ज्यांनी आपली स्वप्ने व आपले भ्रम गमावलेले नाहीत त्यांनाच फक्त भविष्य आहे. " सॉरेलच्या म्हणण्याचा मथितार्थ असा की जर भविष्याविषयी तुमच्या मनात आशावाद असेल, एवढेच नव्हे तर जर भविष्याविषयी उत्तुंग कल्पनाशक्ती तुम्ही स्वतःशी रंगवू शकत असाल तरच भविष्यात तुमच्या पदरी काहीतरी चांगले पडेल. पण येथून-तेथून जमा केलेल्या माल-मसाल्यावर,प्रयोगशाळेत मुद्दाम रचलेली स्वप्ने ही तशाच प्रकारे इकडून-तिकडून गोळा केलेल्या तुकड्यांवर बनविलेल्या मिथ्स वा कल्पितासारखीच शेवटी निरर्थक ठरत असतात. सॉरेल यांनी तो अनुभव स्वतःच घेतलेला आहे. तेव्हा निदान त्यांना हे पटावयास हरकत नाही. या प्रकारच्या बनविलेल्या मिथ्स विश्वासार्ह ठरत नसतात. कोठलीही आशा, पण ती जर कृतीला प्रेरक व प्रोत्साहक व्हावी असे वाटत असेल तर ती खरीखुरी, जिवंत आशा हवी. कसेतरी सजविलेले आशेचे मढे ते नसावे. कृत्रिम मार्गांनी उत्तेजित केल्या गेलेल्या आशावादावर उभी केलेली आशा ती नसावी किंवा प्रत्यक्ष ऐतिहासिक वस्तुस्थिती दडवून ठेवून आणि परिस्थितीचा विपर्यास करून प्रोत्साहित केली गेलेली ती आशा नसावी. काही एका विशिष्ट अर्थाने आणि काही एका विशिष्ट काळपर्यंत, स्वतःचे भ्रम ज्यांनी टाकून दिले नव्हते व कल्पितांकडून स्फूर्ती घेत होते म्हणून सॉरेल ज्यांची फुशारकी मारतात त्या कम्युनिस्टांचा व फॅसिस्टांचा भविष्यकाळ खरोखर होता ही गोष्ट शंभर टक्के खरी आहे. परंतु आभासात्मक स्वप्नाच्या आणि भ्रमाच्या नादी लागलेल्या या लोकांचे पुढे काय झाले तो इतिहास आपणा सर्वांच्या अगदी नजरेसमोरच आहे. त्यामुळेच ज्यांना कोठल्याही भ्रामक स्वप्नांवर आपली राजकीय आशा



अनुक्रमणिका

आधारित असू नये असे वाटते, त्यांना या प्रकारच्या भविष्याची भीती वाळगण्याला सर्व प्रकारची कारणे असतात. लेखक वगैरे मंडळींचा मागील अनुभव जर आपण पाहिला तर असे दिसून येईल की त्यांच्यामध्ये दोन प्रवृत्ती एकत्रित कार्य करीत असतात. उदा., राजकारण आणि त्याचे तंत्र याविषयी ही मंडळी शुद्ध वालकसदृश भोळी असतात आणि त्याच वेळी कल्पितांच्या नादात हरखून जाण्याची तीव्र अशी प्रवृत्ती त्यांच्यामध्ये असते. आजवर ज्या अनेक क्रांत्या होऊन गेल्या त्यात भाग घेतलेल्या लेखकमंडळींच्या एकूण वर्तनावरून हे दोन निष्कर्ष निघतात व ते अगदी खरे आहेत. तेव्हा भविष्यवाचक कोठल्याही भव्य स्वप्नाने हरखून जाणाऱ्या व राजकारणात अज्ञ असणाऱ्या या मंडळींनी, वर ज्या भूल घालणाऱ्या युक्तिवादाची आपण चर्चा केली त्या युक्तिवादापासून स्वतःला सांभाळावयास शिकले पाहिजे. या प्रकारच्या फसव्या राजकीय प्रचारापासून स्वतःला दूर राखावयास शिकावयास हवे. सामान्य मनुष्याच्या बाबतीत हा प्रचार मोहक असतोच, पण लेखक वगैरे बुद्धिजीवींच्या बाबतीत तो अधिकच मोहक असतो. कारण मुळातच ते वर्तमान—स्थितीविषयी मनाने असंतुष्ट असतात व कल्पनाशक्ती असल्यामुळे स्वतःच्या मनाशी उद्याची भव्य चित्रे रंगवीत असतात. क्रांतिवादाचे कल्पित पत्करणाऱ्या आपल्या समव्यावसायिकांच्या आयुष्याचे काय झाले हे जाणून व ते नित्य स्मरणात ठेवून क्रांतिवादाच्या कल्पिताचे खोटे समर्थन करण्यापासून व त्याला बुद्धिवादाची अकारण बैठक अदा करण्यापासून त्यांनी दूर राहावे. या प्रकारच्या चळवळीत आपल्या व्यवसायबंधूंचे जे-जे काही झाले त्याच्यापासून त्यांनी धोक्याची सूचना घ्यावी आणि स्वतःच निर्माण केलेल्या मायावादात फसून जाऊ नये.

आता कोणी असे म्हणेल की लेखकमंडळी जर या प्रकारच्या घडामोडीत भाग घेणार नाहीत तर त्याचा परिणाम त्यांचे वाङ्मयाच्या गुणवत्तेवर होईल व त्यांचे वाङ्मय कनिष्ठ दर्जाचे बनेल. या म्हणण्यात काहीही तथ्य नाही. वाङ्मयाच्या भवितव्यावर या उणीवेचा काहीही परिणाम होणारा नाही. वाङ्मयाचा वृक्ष तसा चांगला दणकट व कणखर आहे. तेव्हा असल्या अभावामुळे त्याच्यावर कसलाही वाईट परिणाम होण्यासारखा नाही. वाङ्मयसेवकांनी क्रांतिवादात भाग घेतला नाही तर, झाला तर चांगला परिणाम वाङ्मयसेवकांच्या नियतीवर होण्यासारखा आहे. अर्थात वाङ्मयसेवकांनी क्रांतिकार्यात भाग न घ्यावयास हेही काही कमी कारण नव्हे. त्याच्यामुळे मानवजातीचा फायदाच होणार आहे. थोर आणि महान साहित्य महान

यातनातून आणि मानसिक व्यथातून जन्म पावते ही गोष्ट खरी असली आणि सोल्झेनित्सिन ह्या रशियन साहित्यिकाच्या साहित्याला जी धार व सखोलता आली आहे ती तो ज्या मानसिक यातनातून आणि वेदनातून गेला त्या यातनांनी आणि वेदनांनी आली आहे हीही गोष्ट खरी असली, तरी सोल्झेनित्सिन हा बंदी–शिबिरांच्या बाजूचा युक्तिवाद नव्हे. सोल्झेनित्सिनला बंदी–शिबिरांच्या यातनातून जावे लागले म्हणून त्याच्या वाङ्मयाला सखोलता व परास्पर्श आला एवढ्या कारणासाठी अशा बंदी–शिबिरांच्या अस्तित्वाचे समर्थन होत नाही. ज्या लेखकांनी अनावश्यक आभासात्मक भ्रम आणि क्रांतिवादाच्या बाजूने केला जाणारा खोटा वाक्छल व पोकळ युक्तिवाद टाळला, नव्हे तशा प्रकारच्या आत्मवंचनेत जे पडले नाहीत, त्यांनी जॉर्ज ऑरवेलसूचित १९८४ हे भयानक दुःस्वप्न वास्तव बनण्यापासून जगाला वाचविले असेच म्हणावे लागेल !

---

## ड्यूकद् ला रॉशफोकूची सुभाषितें

नुसतं मलंबुरं विसरून माणसं थांबत नाहीत. ज्यानी मदत केली त्या सोबत्यांचा ते द्वेष करू लागतात आणि ज्यानी दगाफटका केला त्या शत्रूबाबतचा त्यांचा कडवटपणा कमी कमी होऊ लागतो. चांगल्याची पाठराखण करून वाईटाचं निर्दलन करण्याचं धोरण कायम ठेवणं ही मानवी मनाला जणू गुलामगिरीच वाटते.

• • • •

चतुर माणसाची मनःशांती म्हणजे अनेक वादळं आतल्या आत कोंडून ठेवण्याची त्याला साध्य झालेली कलाच असते.

• • • •

येऊन गेलेल्या आणि येऊ घातलेल्या दुर्दैवावर तत्त्वज्ञान मात करतं. चालू दुर्दैव तत्त्वज्ञानावर मात करतं.

मृत्यूचं यथार्थ स्वरूप फारच थोड्याना कळतं. म्हणून मृत्यूकडे धीरोदात्तपणे न जाता आपण आपले बापजादे गेले तसेच वेडगळपणाने जातो. मरण्याशिवाय दुसरी कुठली दिशाच उरत नाही म्हणून आपल्यापैकी बहुतेकजण मरतात.

• • • •

दुर्दैव निभावून नेण्यापेक्षा सुदैवात तरून जाण्याला अधिक बळ लागतं.

• • • •

सूर्य आणि मरण ह्यांच्या डोळ्याला डोळा भिडवता येत नाही.

• • • •

दुष्कृत्यामुळे जागृत होणाऱ्या द्वेषमत्सरापेक्षा सद्‌गुणामुळे अधिक द्वेषमत्सर जागृत होतो.

# नवकला – एक प्रदीर्घ प्रतीक (२)

• संकलन – **विश्वास पाटील**

मला वाटते की थोडे थवकून येथवर जे काही आपण अभ्यासले त्याचा गोषवारा थोडक्यात येथे आपण घ्यावा.

आपल्या अभ्यासात पहिली गोष्ट आपण अभ्यासली ती प्रतिक आणि खुणा किंवा चिन्ह या दोन सूत्रांच्या कार्यातील फरकासंबंधी. त्यात आपणास असे दिसून आले की खुणा फक्त असलेल्या स्थितीचा नामनिर्देश करतात. असे असे आहे एवढे सांगितले की खुणांचे कार्य संपते. प्रतिके समोरील वस्तु-स्थितीच्या कितीतरी पलीकडे जातात. प्रतीक आणि खूण यात वापरले जाणारे चिन्ह वा आकृति कदाचित एकच असेल पण प्रतिकाचे कार्य करताना त्या चिन्हाची कार्यक्षमता फार व्यापक बनते. समजा घर ही जेव्हा केवळ एक खूण असते तेव्हा त्या खुणेतून चार भितीनी बंदिस्त केलेल्या जागेचा आशय आपणास प्रतीत होतो. पण घराची खूण जेव्हा प्रतीक म्हणून कार्य करीत असते तेव्हा तिचा आशय आणखी कितीतरी पटीनी व कितीतरी दिशानी विस्तारलेला असतो. आता ते कदाचित तुमच्या देहाचे चित्र असेल. कदाचित वात्सल्य, ममलता यांचे ते चित्र असेल. कदाचित सगळ्या त्रासापासून निवारा देणाऱ्या आश्रयस्थानाचे ते चित्र असेल. अनेक विविध अर्थ आता त्याला आलेले असतील. या ठिकाणी तुमच्या मनातील अनेक भावनासमुच्चयासाठी तुमच्या मनाने पत्करलेली ती सामुच्चयिक खूण आहे. पहिल्या ठिकाणी घर ही केवळ खूण होती. तिला फक्त एकच अर्थ होता. दुसऱ्यात ते प्रतीक आहे. म्हणून केवळ दृश्य वस्तुस्थितीशी न थांबता त्याचा अर्थप्रत्यय अनेक वेगवेगळ्या दिशानी पसरत आहे. खूण ही केवळ बौद्धिक चिन्हागत असते. बौद्धिक आशयापलीकडे त्याचा आशय जात नाही. प्रतिकाचा आशय ज्ञात आणि अज्ञात, मूर्त आणि अमूर्त या दोहीकडे जातो. प्रतिक बौद्धिकापलीकडील प्रकट–अप्रकट भावनाना स्पर्शू पाहते. खूण फक्त तर्कापाशी थांबू पाहते. प्रतीक तर्कापलीकडील अतार्किकाकडे जाऊ पाहते. मात्र चिन्ह किंवा खूण आणि प्रतीक यांच्यात अबाधित फरक नाही. एकच आकृती कोणाला चिन्ह असेल तर



अनुक्रमणिका

कोणाला प्रतीक. कोठली आकृती केव्हा प्रतीक असावी आणि केव्हा चिन्ह याचा निश्चित कायदा नसतो. पिंडी हे हिंदूंसाठी परमेश्वराच्या अस्तित्वाचे दर्शनी चित्र आहे. अहिंदूंना तेथे दगडावाचून अधिक काहीच दिसणार नाही. म्हणजे केवळ एक चिन्ह. एक बौद्धिक खूण. पण हिंदूंसाठी भय, आदर, प्रेम, अद्भुतता यातील कितीतरी गोष्टी त्यातून सूचित होतात. हिंदूसाठी ते प्रतीक असल्याने प्रतिकाच्या कायद्याप्रमाणे ते त्यांच्या मनावर व भावनावर परिणाम करीत असते. अहिंदूंवर तसा कोठलाच परिणाम त्याच्या दर्शनाने होत नाही.

चिन्हामध्ये एक वा दोन असे ठामच अर्थ ग्रथित असतात. प्रतिमामध्ये अनेक अर्थ सुप्तावस्थेत असतात. म्हणून मानवी भावना उत्तेजित करण्याची प्रतिकाची शक्ती अमर्याद असते. प्रतिकातील एक अर्थ हा सामान्य अर्थ असतो. या सामान्य अर्थाशिवाय प्रत्येक प्रतिकाला काही विशिष्ट अर्थही असतात. हे विशिष्ट अर्थ व्यक्तिगणिक बदलतात. कारण तो ते प्रतिक अनुभविणाऱ्या व्यक्तिइतकाच मर्यादित असतो. व्यक्तिच्या आयुष्यक्रमाच्या धाटणीनुरूप हा अर्थप्रत्यय तयार होतो. जनरल हा शब्द उच्चारताच शहरातील सामान्य मनुष्याच्या डोळ्यासमोर एकदम अक्कडबाज मिशावाल्या रुबाबदार माणसाचे चित्र उभे राहील. लष्करात आयुष्य काढलेल्या मनुष्याच्या डोळ्यासमोर कडक शिस्तीच्या अधिकाऱ्याचे चित्र उभे राहील. जहाल अहिंसावाद्याच्या डोळ्यासमोर क्रूरपणे लोकांची हत्या करावयास कारणीभूत होणाऱ्या क्रूरकर्म्याचे चित्र उभे राहील. शब्द आणि ध्वनी एकच. पण तीन प्रकारच्या माणसामध्ये त्याची तीन प्रकारची प्रतिक्रिया उमटली. याचे कारण त्या प्रत्येकाचे वैयक्तिक अनुभव. एखाद्याला स्वप्नात जनरलची आकृती दिसली. येथे त्याचा आणखी चवथाच अर्थबोध असेल. हा माणूस कदाचित अदृश्य भीतीच्या छायेखाली वावरत असेल, कदाचित प्रत्यक्ष जीवनात भेकड आणि बुजरा असेल आणि स्वप्नात जनरल बनून आपण बेदरकार, रुबाबदार असामी आहोत ही सुप्त इच्छा तो पुरी करून घेत असेल. सारांश येथे जनरल म्हणजे रुबाब, सत्ता, मानप्रतिष्ठा यांचे चिन्ह असेल, कोठल्याही प्रतिकाचा आवाका त्या प्रतिकाच्या ज्ञात अर्थबोधापेक्षा फारच मोठा असतो.

प्रतिक हे भावनाना स्पर्श करून तेथून बाहेर पसरते. प्रत्येक चिन्हामध्ये एकापेक्षा अधिक भावनात्मक अर्थप्रत्यय ग्रथित झालेले असतात. जितके हे अर्थप्रत्यय अधिक तितकी त्या चिन्हाची प्रतीक म्हणून प्रतीत होण्याची शक्ती अधिक असा प्रतिकाचा कायदा आहे. एखाद्या प्रतिमेमध्ये किती भावगंड गुंतून



अनुक्रमणिका

आहे यावर ती प्रतिमा किती परिणामकारक प्रतिक होईल हे ठरत असते. भगव्या झेंड्याच्या ठिकाणी प्रत्येक मराठी माणसाची भावना गुंतलेली आहे. भगवा म्हणताच प्रत्येक सच्चा मराठ्याच्या भावना उचंबळून येतील. पण अमराठ्याला त्याचे फारसे काही वाटणार नाही. क्रूस पाहताच भाविक ख्रिस्त्याला ख्रिस्ताची सर्व कहाणी आठवून धन्यधन्य वाटेल. पण ख्रिस्तेतरावर त्याचा काहीच परिणाम होणार नाही. या ठिकाणी विशिष्ट प्रतिमा पाहताच मनात जो भावनांचा कल्लोळ उठतो त्याचा उगम वाहेरील त्या प्रतिमेच्या ठिकाणी नसून तो पाहणाराच्या अंतर्यामी, त्याच्या मनाच्या ठिकाणी असतो. पाहणारा अनुभवितो त्या सगळ्या भावना तो आतून त्या प्रतिमेच्या ठिकाणी प्रक्षेपित करीत असतो. त्या प्रतिमेच्या, चिन्हाच्या वा वस्तूच्या ठिकाणी अनुभविलेल्या भावना त्या प्रतिमेत, चिन्हात वा वस्तूत नसतात तर अनुभविणाराच्या ठिकाणी त्या असतात व तेथून वाहेर प्रक्षेपित करून तो त्या वाहेर आहेत अशा प्रकारे अनुभवित असतो. जी गोष्ट भगव्या ध्वजाची किंवा ख्रिस्ती क्रूसाची तीच इतर अनेक चिन्हांची—काव्य, गीत इत्यादींची होय. येथेही रसास्वादाचा जो आनंद आपण मिळवित असतो तो त्यातील चिन्हाना प्रतिकांची पातळी आलेली असते म्हणून. कथा, काव्य वा कादंवरीतील लिखित शव्दाला जो शव्दकोशीय अर्थ असतो त्यातून त्या परिणामकारक ठरत नसतात. त्या परिणामकारक ठरतात कारण त्या चिन्हांच्या वा शव्दांच्या प्रभावामुळे आपल्या मनातील अनेक प्रकारच्या सुप्त भावना जागवल्या जातात. या जागवल्या गेलेल्या भावनांमुळे ती ती कविता वा कथा आपणास प्रभावी झाल्यासारखे वाटते. काव्य वा कथेच्या रसास्वादात शव्दाच्या केवळ वरकरणी अर्थाला महत्व नसते. महत्व त्या शव्दानी सूचित होणाऱ्या प्रतिमाना व त्या प्रतिमांमुळे उत्तेजित होणाऱ्या भावप्रत्ययाना आहे. त्या प्रतिमानी जागृत केलेल्या वाचकाच्या जुन्या आठवणीना आहे. म्हणून जो लेखक अथवा कवी आपल्या प्रतिमासृष्टीने वाचकाच्या मनातील जास्तीतजास्त भावना आपल्या शव्दमाध्यमात गुंगवून ठेवू शकतो तो तेथील लोकांच्या दृष्टीने अधिक प्रतिभावान ठरतो.

जगात वावरताना विविध प्रकारचे अनुभव आपण घेतो. हे वस्तुनिष्ठ अनुभव चिन्हे व प्रतिकांच्या साहाय्याने आपल्या मनात आपण लावून ठेवतो. साम्य-भेदाच्या तत्त्वावर त्यांची साखळी गुंफतो. म्हणजेच एक प्रकारे मनातील तितक्या विविध भावगंडांशी त्यांची जोडणूक करतो. ही जोडणूक म्हणजेच प्रतीकवाद. प्रतीकवाद म्हणजे वस्तुनिष्ठ जगाविषयीची संवेदने अंतर्मनातील भावगंडांशी जोडून घेणे. ही संवेदने (Perceptions)

आपणाकडून जर आपल्या भावगंडांशी अशा प्रकारे जोडून घेतली गेली नाहीत तर जीवनविषयक आपले सगळे अनुभव अत्यंत शुष्क बनतील. अर्थात आपल्या शरिरव्यापारात त्यामुळे कोठल्याही प्रकारचा व्यत्यय यावयाचा नाही. पण जगण्यातील आनंद व मौजही आपणास मिळणार नाही. आपल्या संवेदना आपल्या मनातील भावनाप्रत्यय उत्तेजित करतात म्हणून जीवन जगण्यालायक वाटते. हा भावप्रत्यय प्रतिकांच्या माध्यमातून उत्तेजित होतो. कारण प्रतिके संवेदन आणि भावगंड यांची जोडणी करतात. सारांश प्रतिकांच्या अस्तित्वामुळे जग आणि जगणे अर्थमय व मनोवेधक बनते. प्रतीक तंत्र नसते तर ते अत्यंत कंटाळवाणे बनले असते. प्रतिकात्मक प्रतिमाश्रेणी हा अनुभव साठवून आणि सुसंगत लावून ठेवण्याचा आमचा एक मार्ग असतो. या प्रतिमाश्रेणी विविध प्रकारच्या असतात त्यातील काही स्पर्शाच्या असतात. काही दृष्टीच्या तर काही गंधाच्या वा नादाच्या असतात. थोडक्यात असे म्हणता येईल की आपल्या भावना व शरीरविषयक अनुभव यांच्यातून प्रतीकतंत्र तयार होत असते. सामान्यतः स्वप्नात दिसणाऱ्या प्रतिमांच्या स्वरूपात प्रतिके आपणावर परिणाम करतात. मात्र या प्रतिमा केवळ दृक्संवेदनस्वरूपाच्या नसतात. त्यांच्यामध्ये आपल्या भावना व विकार हीही असतात. म्हणूनच ही प्रतिमारूपी प्रतिके अत्यंत शक्तिशाली ठरून आपल्या जागृत आयुष्यावर आपला प्रभाव गाजवितात. दुसरी गोष्ट अशी की प्रतिमांचा समुच्चयच नव्हे तर एकेकटी प्रतिमादेखिल पृथक् भावनेसाठी येथे अस्तित्वात असते.

प्रतीके स्वप्नातून व्यक्त होतात तशीच ती दृष्टांत, कला, काव्य इत्यादी मानवी मनाच्या इतरही आविष्कारातून व्यक्त होतात. प्रतिकाना अर्थांचे वेगवेगळे स्तर असतात आणि ते एकातएक मिसळलेले असतात. प्रतिक उलगडताना हे स्तर अलग करता येतात. एका स्त्रीला एक स्वप्न पडले. स्वप्नात ती भल्या मोठ्या आकाराची गाडी एका निरुंद वळणावरून आत घेऊ पाहात असते. हे स्वप्न तीन प्रकारे उलगडले गेले. या स्वप्नाचा एक अर्थ असा होता की गाडी चालविण्याचे चांगले कौशल्य आत्मसात होण्यापूर्वीच ती सार्वजनिक रस्त्यावर एकट्याने गाडी काढण्याचे धाडस करीत होती. स्वप्नात तिच्या मनाने तिला तू अधिक कौशल्य कमावले पाहिजे अशी सूचना दिली होती. नंबर दोन, ही स्त्री अत्यंत उधळी होती. तिच्या कमाईपेक्षा तिचा खर्च अधिक होता. तिच्या अंतर्मनाने स्वप्नातील प्रसंगाच्या रूपाने तिला मावधगिरीची सूचना दिली होती. नंबर तीन, ही स्त्री अत्यंत भावविवश असते. त्या स्वभावावर ते स्वप्न हे भाष्य होते. कारण तिच्या त्या विशिष्ट स्वभावा-

मुळे तिला न पेलणाऱ्या जबाबदाऱ्या स्वतःसाठी तिने तिच्या आयुष्यात निर्माण करून ठेवल्या होत्या. तेव्हा प्रतिकाला अर्थाचे वेगवेगळे स्तर असतात आणि ते सर्व स्तर एकाच वेळी जाणवू शकतात ही गोष्ट ध्यानात ठेवावयास हवी.

यानंतर प्रतिकांचा आणखी एक विशेष आपण पाहिला. आपण असे पाहिले की एकच प्रतिक होकारात्मक किंवा नकारात्मक अशा कोठल्याही आशयात कार्य करू शकते. उदा० स्वप्नात दिसलेला पेटाऱ्यासारखा आकार हे मातृ-गर्भाशयाचे संरक्षक प्रतिक असते किंवा उलट अर्थाने पाहणाऱ्याच्या ' इगोचा ' किंवा अहंगंडचा ग्रास करावयास प्रवृत्त झालेल्या मनातील हिंसक अबोध प्रवृत्तींचे प्रतीक असते. प्रतिकांचा उलगडा करताना म्हणूनच Conitrary च्या किंवा विरुद्धकाच्या तत्वाचा आश्रय करावा लागतो. म्हणजेच प्रतीक अनुभविणाऱ्याच्या परिस्थितीचे एकूण तानमान पाहून पाहिलेल्या प्रतिकाचा उलगडा करावा लागतो; केवळ ढोवळ ठोकताळे वापरायचे नसतात.

प्रतिकतंत्राच्या बाबतीत तिसरा मुद्दा आपण पाहिला तो असा की ज्या संस्कृतीतील ते प्रतिक असते त्या संस्कृतीत त्या विशिष्ट प्रतिकाला जेवढ्या अर्थछटा असतील तेवढेच अर्थ त्या प्रतिकाला असू शकतील. त्यापेक्षा आधिक अर्थ त्या संस्कृतीत त्या प्रतिकाला असू शकणार नाहीत. प्रतिकाचा उलगडा करताना प्रतिक जिला जाणवले त्या व्यक्तीचे वय, तिचे बौद्धिक शिक्षण, सांस्कृतिक पातळी तिच्या आयुष्यक्रमाचा एकूण कल इत्यादी गोष्टी विचारात घ्यावयाच्या असतात. उदा० अग्नी हे सामान्यतः सर्व प्रकारच्या उबाऱ्याचे (त्यात भावनिक उबाराही आला) प्रतीक आहे. पण ज्या प्रदेशात बारंवार आगी लागतात तेथे ते धोक्याच्या पूर्व सूचनेचे प्रतिक असते.

या नंतर आपण असे पाहिले की प्रतीके " व्यक्तिक " आणि " सार्वत्रिक " अशी दोन प्रकारची असतात. उदा० आकाशगमनाचे प्रतीक हे सार्वत्रिक प्रतीक आहे. कारण सर्व काळी व सर्व स्थळी त्यातून खालच्या स्थितीतून वरच्या स्थितीत प्रवेश केल्याचा आशय व्यक्त होतो.

यानंतर आपण मानवी मनाच्या फँटसी–रचण्याच्या सवयीचा अभ्यास केला. त्यात आपण असे पाहिले की विशिष्ट मर्यादेपर्यंत फॅन्टसी रचण्याची क्रिया मानसिक आरोग्यासाठी माणसाला अत्यंत आवश्यक असते. बाह्य वास्तव परिस्थिती कठीण बनून मनावरचा ताण असह्य बनला की माणूस मनातल्या मनात कल्पनाचित्रे रंगवून ती परिस्थिती स्वतःच्या सोयीप्रमाणे



अनुक्रमणिका

मनात जमवून घेतो. कल्पनाचित्रे रंगविण्याच्या या क्रियेसंबंधी आपण पुढील गोष्टी पाहिल्या :—

१) तार्किक कार्यपद्धती आणि फॅन्टसीची कार्यपद्धती या दोन्ही पद्धती अत्यंत भिन्न असून दोघींच्या पद्धतीचे कायदे स्वतंत्र आहेत. कल्पनाचित्रे रंगविताना नेहमीच्या विचारपद्धतीतील तार्किक कायदे जवळजवळ लटके बनलेले असतात. तार्किक कार्यपद्धतीत वास्तव प्रत्यक्षात जसे असेल तसे ते पाहण्याचा प्रयत्न होत असतो. तर कल्पनारंजनात वास्तव आपणास हवे असेल त्याप्रमाणे ते रंगविण्याचा प्रयत्न होत असतो. फॅन्टसीचे जग हे बालविश्व आहे. किंवा आदिम मानवाचे भावविश्व आहे. तार्किक विचार-पद्धतीशी तुलना करता ते अधिक चित्रविचित्र, रंगतदार आणि बालिशही आहे. कधीकधी अधिक भयावहही असते. कल्पनारंजन आपल्या मनात एकसारखे चालूच असते. बाह्य घडामोडींवरील आपले लक्ष थोडे का होईना पण विकेंद्रित झाले की मनाचे सारथ्य कल्पनारंजनाकडे जाते किंवा बाह्य परिस्थिती असह्य वा कठीण वाटू लागली तरीही तसे होते. फॅन्टसीचा अनुभव हा अत्यंत खाजगी आणि व्यक्तिनिष्ठ अनुभव असला तरी परिणामाच्या दृष्टीने पाहता तो वस्तुनिष्ठ अनुभवाइतकाच किंवा कदाचित त्याच्याहीपेक्षा अधिक प्रभावी असतो. जागेपणी व्यक्तीला जे–जे करता येत नसते किंवा करायची शरम वाटते ते–ते व्यक्ती स्वप्नरंजनात करून घेऊ शकते. आपण स्वप्नरंजनात दंग आहोत याचे बऱ्याचदा आपणास भानही नसते.

२) प्रत्येक मानवी आयुष्याचा काही भाग तर्कविचारात तर काही स्वप्नरंजनात जातो. ज्यांचे जागृत आयुष्य ऋजु, सरळ आणि विशेष गुंतागुंती-विरहित असते त्यांचे स्वप्नरंजनही तितकेच साधे असते. त्याउलट ज्यांचे मानसिक जीवन अत्यंत विकट व समस्यापूर्ण असते त्यांचे स्वप्नरंजनही तितकेच गुंतागुंतीचे असते. काही लोकांचे मानसिक जीवन तर इतके कष्टप्रद बनते की ती माणसे वास्तवापासून पळ काढून सर्वच वेळ स्वप्नरंजनात रममाण होऊ पाहतात. या ठिकाणी महत्वाचा मुद्दा असा की ज्यांच्या अंतर्गत व बाह्य मानसिक जीवनात जाणवण्याइतकी प्रखर तफावत नसते त्यांच्या फॅन्टसी साध्या असतात व त्यांचे मानसिक आरोग्य ठिकाणावर असते. अंतर्गत फॅन्टसीविश्व हा एका अर्थी बाह्य वास्तव अनुभव–विश्वाचाच एक पूरक भाग असून मानसिक आरोग्याच्या सुरक्षिततेसाठी त्याची फार आवश्यकता आहे.

३) आयुष्यात विविध प्रकारच्या अनुभवांशी जुळवून कसे घ्यायचे याचे प्राथमिक शिक्षण आपण कल्पनारंजनाच्याच मार्गे घेत असतो. लहान



अनुक्रमणिका

मुलांची बरीचशी मानसिक वाढ आणि वास्तवाबरोबरचा प्रारंभिक सराव कल्पनारंजनाच्याच मदतीने होतो. प्रत्येक मुलापाशी मूलभूत अशा ज्या काही आठवणी असतात त्यांचीच उलटसुलट जुळणी करून ते भावी आयुष्याची तालिम करत असते.

४) स्वप्नरंजन हे जीवनाबरोबर जुळवून घ्यावयास मदत करणारा एक मानसिक व्यापार आहे. परंतु त्याचे रूपांतर काही वेळा विकृतीतसुद्धा होऊ शकते. स्वप्नरंजनात दंग राहून माणसे आयुष्यातील प्रत्यक्ष जबाबदारी चुकवू पाहतात.

५) परिस्थिती इतक्या थराला गेली की त्या व्यक्तीला वास्तव कुठे संपले आणि स्वप्नरंजन कुठे सुरू झालें हेच समजेनासे होते. या व्यक्ती मग सतत कल्पनाविश्वात दंग राहतात.

६) कल्पनारंजनातल्या प्रतिमा प्रतिकात्मक असतात. त्यांचा शब्दशः अर्थ घ्यावयाचा नसतो.

फॅन्टसी व फॅन्टसी रंगविण्याच्या मानवी प्रवृत्ती यांचा अभ्यास केल्या-नंतर आपण युंग यांच्या मानसशास्त्रीय विचारांचा परिचय करून घेतला. त्यात आपण असे पाहिले की मानवी मनात विचार करण्याची बुद्धी व भावना (तर्क आणि फॅन्टसी) हीं दोनच केंद्रे नसतात. तर मानवी मनाच्या आत अत्यंत खोलवर अशा जागी आणखी तिसरेही एक केंद्र आहे. हे केंद्र शरीर आणि मनाचा गेलेला तोल सांभाळण्यासाठी झटत असते. थोडक्यात मानवीं मन हे मानवी शरिराप्रमाणेच एक self-regulatory असे यंत्र आहे. न्यूरॉसिस हा या अर्थाने मनाची बिघडलेली स्थिती पूर्वपदावर आणण्यासाठी मानवी मनाने केलेला प्रयत्न असतो.

तर्क आणि शाब्दिक संकल्पनांच्या साहाय्याने केला जाणारा विचार हा विचार करण्याचा एक प्रकार. तसेच भावना आणि फॅन्टसीच्या साहाय्याने केला जाणारा विचार हा विचाराचा दुसरा प्रकार. विचाराच्या या दोन प्रकारांव्यतिरिक्त तिसराही एक प्रकार अस्तित्वात असावा. कारण याही प्रकारच्या 'विचाराच्या अस्तित्वाचा पुरावा स्वप्नांच्या, एल्एस्डीसारख्या (LSD 25– Lysergic acid diethylamide) इंद्रजालकारक (hallucinogens) औषधी द्रव्यांच्या प्रयोगांच्या अभ्यासातून शास्त्रज्ञाना मिळाला आहे. ही औषधे घेतल्यावर अनेक प्रकारचे चित्तभ्रमकारक अनुभव ती घेणाराना आले. त्या अनुभवांचा विशेष हा होता की त्यात मनाच्या जाणिवेच्या कक्षा रुंदावल्या जात होत्या. एल्एस्डी घेतल्यावर

अनेकाना विविध प्रकारचे स्वाद, स्पर्श, नाद जाणवले. संगीत ऐक आले. या सर्व संवेदनांची तीव्रता अगदी एकांतिक होती. तसेच या सर्व संवेदना कोठल्याही बाह्य चालनांवाचून त्याना आल्या. याचाच अर्थ असा होता की केव्हा ना केव्हा अनुभविलेल्या व मनाच्या आठवणशक्तीत साठवून ठेवल्या गेलेल्या या संवेदना या द्रव्याच्या सेवनाबरोबर उत्तेजित केल्या गेल्या होत्या. याचाच अर्थ हे औषधी द्रव्य जाणीव रुंद करीत होते. या द्रव्याचा आणखीही एक परिणाम निदर्शनास आला तो असा की हे द्रव्य घेणाऱ्याच्या मनाचे विभाजन घडून मनाचे उघड उघड दोन भाग होतात. यातील एक भाग दुसऱ्या भागातील हालचालींचे त्रयस्थाच्या दृष्टीने निरिक्षण करीत असतो. एक भाग भयभीती आनंद शोककारुण्य आदि तीव्र प्रकारच्या अनुभवातून जातो. दुसरा भाग या सर्व प्रकारचे निर्विकार विश्लेषण करीत असतो. या द्रव्यांच्या अंमलाखालील अनुभविणे नेहमीसारखे नसते. ते शब्दातीत समोरासमोर अनुभविणे असते. सामान्यतः आपण सर्व अनुभव शाब्दिक संकल्पनांच्या मध्यस्तीत घेतो. येथे सर्व अनुभव direct असतात. कारण संकल्पनांची शक्ती लटकी पडलेली असते. येथे प्रत्येक अनुभव अगदी raw असतो. त्याला शब्दाची चाळण लागलेली नसते. तसेच हे अनुभविणे कल्पनासाहचर्यात्मक असते. कारण नेहमीची तर्कनिष्ट बुद्धी येथे लटकी पडलेली असते. येथे Thought Forms विचारबंध किंवा नेहमीच्या विचारठेवणी रद्द होतात आणि चित्रांच्या व भावनांच्या साहचर्यावर चालणारी विचारठेवण कार्यान्वित होते. या विचारठेवणी अत्यंत जुनाट–जेव्हा शाब्दिक विचार-ठेवणींचा जन्महो झालेला नव्हता तेव्हाच्या काळातल्या ठेवणी आहेत. तार्किक विचारपद्धत आणि ही विचारपद्धत यात मूलभूत फरक आहे. तार्किक विचार-पद्धतीत भावनांपासून व्यक्ती जवळजवळ अलिप्त असते. या विचारपद्धतीत सर्व विचार भावनांच्याच तंत्रावर होतो. या विचारठेवणी भावनानी उत्तेजित असतात. या ठेवणी प्रायः दृष्टीवाचक असल्या तरी गंध, नाद, स्वाद, स्पर्श हे विकार त्याना वर्ज नाहीत. गंध, नाद, स्वाद इत्यादीपैकी कोठलाही आकार त्या घेऊ शकतात. त्या एकमेकात मिसळू शकतात. किंवा एकातून दुसऱ्यात परिणत होऊ शकतात. कारण त्यांची हालचाल कल्पनासाहचर्याच्या कायद्याप्रमाणे किंवा त्यातील साम्यभेदास अनुसरून होते.

Dr. Mckellar या गृहस्थानी विचार करण्याच्या या प्रकाराला A–Thinking (autistic thinking) असे नाव दिले आहे. autistic म्हणजे उलटया गतीने चालणारे विचार. विचारांची चालना

नेहमी बाहेरून आता असते. या प्रकाराला मॅककेलर R–thinking (Reality adjusted thinking) म्हणतात. ही आपली नेहमीच्या तर्काची पद्धती. A–thinking भावनांवर चालते. R–thinking हे जागेपणाचे विचार करणे होय. झोपेत वा अशाच काही कारणाने जागेपणातल्या मेंदूवरच्या व्यापारांवरील आपले नियंत्रण ढिले झाले की मेंदू लगेच A–thinking कडे वळतो. A–thinking ची तुलना विल्हेम स्टेकेल हा मानसचिकित्सक वाद्यवृंदातील वाद्यांच्या सुरावटीशी करतो. तो म्हणतो की " वाद्यवृंदात एकाच वेळी अनेक हत्यारे अनेक प्रकारचे आवाज काढीत असतात. त्या सर्वांचा एक मिलाफ होऊन सूर आपणास ऐकू येतात. संगीताचे पृथक आवाज आपणास ऐकू येत नाहीत पण ते तेथे असतात. तशीच गत मानवी विचारव्यापाराची आहे. " आपल्या मनातील विविध स्तरांवर विविध प्रकारचे विचारप्रवाह सुरू असतात. त्यातील जे आपल्या जाणिवेत येतात तेच तेवढे आपल्या बुद्धीला समजतात. पण याचा अर्थ बाकीचे विचारप्रवाह नाहीत असे नाही. तेही आहेत. संगीतातील कर्णमधुर सुरावट म्हणजे R–thinking त्याच्या आतील अनेकविध आवाज म्हणजे A–thinking. स्वप्ने, मनाची भ्रमिष्ट अवस्था, मादक द्रव्याच्या अंमलाखालची अवस्था यात जे thinking आपल्या अनुभवास येते ते A–thinking असते.

अर्थात मन-प्रसारक औषधे आणि शामक औषधे (Sedatives) यात फरक आहे. शामक औषधांमुळे विचार मंद होतात. मनाचा प्रक्षोभितपणा कमी होतो. कधी झोपही येते. धास्तीची वर चढलेली पातळी खाली येते. थोडया वेळासाठी. कायम नव्हे. मन-प्रसारक द्रव्यांचा परिणाम सर्वस्वी याच्या उलटा असतो. येथे मुळातील धास्ती अधिकच तीक्ष्ण बनते. मनात एका-पाठोपाठ एक कल्पानाविलासाच्या लाटा उमटू लागतात. व्यक्ती धास्तावून जाते. धास्तीकारक विचार मनात फार जोराने उसळी मारू लागतात. मन दुभंगून एक अनुभविणारा व दुसरा ते पाहणारा असे मनाचे दोन भाग होतात. परिणामतः मनाच्या आत खोल खाली काय चालले आहे याची त्या व्यक्तीला स्वतःलाच जाणीव येऊ लागते. मनातील संघर्ष व तणाव उघडयावर येतात. मनाच्या आतील हालचाल ही औषधे उघड करीत असल्यामुळे मनुष्याला त्याचा खरा " मी " त्याची ठाम ओळख (Identity) शोधून काढावयास ही द्रव्ये मदतगार होऊ शकतात. क्वचित घेणाराचे आत्मपरिवर्तनही ती घडवू शकतात. कमीत कमी घेणाराच्या जाणीवेची पातळी तरी ती निश्चित उंचावतात. उदा० एका स्त्रीचे तिच्या नवऱ्यावरोबर पटेनासे झालेले असते.



अनुक्रमणिका

ती घटस्फोट घेण्याच्या विचारात असते. तत्पूर्वी ती या द्रव्यांचा प्रयोग करून पाहते. प्रयोगात एलएसडीचे इंजेक्शन घेतल्यावर तिला पुढील दृश्ये क्रमाक्रमाने दिसतात. प्रथम तिला दिसते ते आपण एका गर्दीच्या ठिकाणी उभे आहोत आणि आपल्या समोर बळीची वेदी असून मागे तोंडावर काळा बुरखा घातलेला मांग उभा आहे. थोडयाच वेळात तिला कोणाचे तरी मुंडके उडविल्याचे दृश्य दिसते. तिच्याच पायाजवळ ते मुंडके पडते. ते मुंडके आपलेच असे ती ओळखते. लगेच तिला आपण तेथून वेगाने पळून जात असल्याचे दृश्य दिसते. पळताना तिला वाटते की आपण खूप दमलो आहोत. ती थांबते. तेथे तिला एक तरुण पुरुष भेटतो. तिला तो फार आवडतो. ती त्याला आपण दमल्याचे सांगते. त्यावर तो तिला शेजारच्या पडक्या किल्लयात नेतो व तिच्या पुढयात द्राक्षांची बशी ठेवतो. ती त्यातील द्राक्षे उचलून तोंडात घालणार एवढयात त्या द्राक्षांचे रूपांतर मानवी डोळयात झालेले तिला दिसते. लगेच ती तेथून पळून जाते. एका मोठया जंगलातून ती बाहेर येते. येथेही तिला एक तरुण पुरुष भेटतो. हा तिला पहिल्याही तरुणापेक्षा अधिक आवडतो. आपणाला अत्यंत भूक लागल्याचें तिला जाणवते. तसे ती त्या तरुणाला सांगते. पुन्हा एकदा तिच्या पुढयात द्राक्षांची बशी ठेवण्यात येते. ती द्राक्षे उचलून तोंडात घालू पाहते. तत्क्षणी ती द्राक्षे नेत्र बनतात. परत ती तेथून पळ काढते. आता ती फारच थकते. काही अंतर धावल्यावर तिला आणखी एक तरुण भेटतो. याच्याही चेहऱ्यावर तिला बुरखा दिसतो. तोही तिला द्राक्षे देतो. ती त्याला सांगते की तोंडावरचा बुरखा काढ. तो म्हणतो की आपल्या तोंडावर बुरखा वगैरे काही नाही. तू ती द्राक्षे खा. म्हणजे तुझी दृष्टी स्वच्छ होईल, तुला नवी दृष्टि येईल. व माझा चेहरा दिसेल. या ठिकाणी ती स्त्री अत्यंत उमाळयाने रडू लागते व तिच्यावरचा एलएसडीचा प्रभाव संपुष्टात येतो. चिकित्सक तिला तिची समस्या समजावून सांगतो व तिला घटस्फोट घेण्यातील तिची चूक समजते. (The Varieties of Psychedelic Experience – R. E. L. Masters & Jean Houston).

वरील उदाहरणातील स्त्री एलएसडी घेताच अत्यंत धास्तीग्रस्त झाली. या धास्तीग्रस्त बनण्याला एक कारण आहे. मनुष्याच्या 'इगोला' जेव्हा खरा वा खोटा धोका उत्पन्न होतो तेव्हा मनुष्य धास्तीग्रस्त बनतो. आता प्रश्न असा आहे की मनुष्याच्या व्यक्तित्वात राहून कार्य करणारा हा 'इगो' घडतो कसा?

जन्मानंतर काहीच दिवसांच्या अवधित माणसाच्या 'इगो'ची जडणघडण सुरू होते. बालकाच्या अवतीभवती ज्या घटना घडतात, इतर

लोकांच्या हालचाली सुरू असतात त्या हालचालींना व घटनांना प्रतिसाद देण्याच्या प्रक्रियेतून बालकाचा इगो घडत जातो. आई त्याला कशी वागवते. भूक लागताच दुधाला घेते की नाही. अंग ओले होताच कपडे बदलते की नाही ? वडील कसे वागतात ? या सर्व गोष्टींवर मुलाचा ' इगो घडत असतो. भूक लागली, कपडे ओले झाले. लगेच काळजी घेतली गेली. मन निर्धास्त बनते. दुर्लक्ष केले गेले. मन धास्तीयुक्त झाले. सभोवतीं घडणाऱ्या प्रत्येक घटनेचा अर्थ मूल त्याच्या परीने लावित असते. या अर्थ लावण्यातून कणाकणानें त्याचा इगो घडत असतो. अगदी लहानपणापासूनच शारिरीक अनुभूती आणि त्याचा समान भावनिक घटक याची सांगड घालण्याचे त्याचे काम सुरू असते. शारिरीक अनुभव आणि त्यांचा मानसिक जोड यांचे गुंडाळे म्हणजे माणसाचा इगो. वेगवेगळ्या मानसिक प्रसंगात वागण्याचे जे साचे मूल लहानपणी तयार करते तेच पुढे मोठेपणातही ते वापरते. त्यात काय तपशीलाचा बदल असेल तो. पण त्याचा मुख्य तोंडावळा बालपणातल्यासारखाच असतो. साधारणतः वयाच्या सातव्या वर्षी मुलाला त्याचा पृथक् स्वत्वाची जाणीव येते. मी-तू यातला फरक प्रकर्षाने जाणवू लागतो. स्वतःची वेगळी ओळख समजू लागते. मी म्हणजे उल्हास. मी शिरीष. हे सतत वाटू लागते.

या पायरीवर मुलाला स्वविषयक जाणीव येत असली तरी मनातल्या मनात वास्तव स्वतःच्या इच्छेबरहुकूम adjust करण्यासाठी कल्पनाचित्रे रंगवायची त्याची सवय कमी झालेली नसते. या पायरीवर वास्तव आणि कल्पनाविलास या दोन्हीत ते वावरत असते. प्रौढत्व आल्यावर हा प्रकार कमी होतो. कारण मनातल्या विकारावर व भावनांवर आता एक नियंत्रण आलेले असते. त्यामुळे एखादी घटना मनाविरुद्ध घडली तरी लगेच वास्तवाची कास सोडून स्वप्नरंजनाकडे धाव घेण्याची गरज आता राहिलेली नसते. मात्र काही प्रमाणात स्वप्नरंजनाची सवय प्रत्येक माणसाच्या आयुष्यात शेवटपर्यंत उरतेच.

तथापि काही मनुष्ये इतका समतोल इगो त्यांच्या मनात तयार व्हावा इतक्या भाग्याची नसतात. त्यांच्या बालपणीच त्याना अशा काही विकट प्रसंगातून वा आयुष्यक्रमातून जावे लागते की त्या अल्पवयातच त्यांचा इगो मार खाऊन दुखावला जातो. हा इगो बाह्य वास्तवाच्या तुलनेत ठामपणा धारण करू शकत नाही. तो बराच दुबळा राहतो. अशी माणसे मोठेपणी न्यूरॉटिक बनू शकतात. त्यांच्यापाशीं खंबीर इगो नसल्याने जेव्हा-जेव्हा

अबोध मनातून त्यांच्या बोध मनावर अबोध आशयाचे आक्रमण होऊ लागते तेव्हा-तेव्हा ती भयग्रस्त बनतात. बावचळतात. अबोधाच्या मागणीप्रमाणे बोध इगोला वाकवू पाहतात. संपूर्णपणे परिस्थितीला शरण जातात किंवा भेदरलेले जीवन जगू पाहतात. इच्छाशक्ती वापरायचे थांबतात. जीवनात पराभूत होतात. स्वतःचे स्वतंत्र 'मीत्व' मिळविण्याचा प्रयत्न करण्याएवजी त्यांच्या आयुष्यात जी जी जबरदस्त संस्था येईल तिच्याशी मनाने एकरूप होऊन मानसिक वाढीची जबाबदारी टाकून देऊ पाहतात. उदा., चिरेबंदी राजकीय संघटनेचे घट्ट अनुयायी बनतात. अंमली पदार्थ घेऊन स्वतःच्या आयुष्यातली व्यथा व जबाबदारी टाळतात. दिवसातला बराच काळ कष्टदायक कामात व्यग्र राहून मनातली धास्ती दूर ठेवतात. हे लोक स्वतःच्या स्वत्वापासून दुरावलेले असतात. कारण त्यानी ते स्वत्वच कधी मिळविलेलें नसते. त्यांचा 'इगो' अत्यंत दुर्बल असतो. ही माणसे विचारात दुराग्रही आणि वर्तनात अलवचिक असतात. इगोची दुर्बलता सामर्थ्याच्या प्रदर्शनाने ती भरून काढू पाहतात. स्वतःचे कोठलेही मत ती सहसा सोडू इच्छित नाहीत. ते मत हा त्यांना त्यांच्या इगोचाच भाग वाटतो. बुद्धीवाद हा त्यांच्या बाबतीत मानसिक निरोगीपणा न राहता मासिक आजार बनलेला असतो. कारण स्वतःच्या वागणुकीचे खोटे समर्थन देण्याचे ते हत्यार बनलेले असते. न्यूरॉटिक व्यक्तिच्या इगोपेक्षा सायकोटिक व्यक्तिचा इगो अधिकच दुर्बल असतो. अबोध मनाकडून येणाऱ्या प्रेरणा या व्यक्तीना बिलकूलच प्रतिकारता येत नाहीत.

इगोची माहिती घेतल्यानंतर, मनप्रसारक द्रव्याच्या वापरात हा इगो कसा वागतो हे पाहण्यासारखे आहे. कारण व्यक्तीत्वाचे मार्गदर्शन नेहमी व्यक्तित्वातील इगोकडून घडत असते. असो. तर एलएसडीसारखे मनप्रसारक द्रव्य घेतले की पहिली प्रतिक्रिया होऊन ती मनातील धास्तीचे प्रमाण प्रमाणाबाहेर वाढते. जणू काही व्यक्तित्वात साचून असलेली सगळी धास्ती एकत्रित होऊन आतून बाहेर येऊ पाहते. अनेक अपरिचित प्रेरणा, भावना, विकार, वासना आकस्मिकपणे इगोवर आक्रमण करू लागतात. हा इगो जर व्यवस्थित प्रकारे समतोल अशा प्रकारचा असेल तर काही ना काही करून धास्तीचें हे आक्रमण तो थोपवून धरील. धास्ती असह्य झाली तर डॉक्टरला बोलावील. गाणे वगैरे गुणगुणून मन कोठल्यातरी व्यवधानात गुंतवू पाहील. चित्रे रंगविण्याचा प्रयत्न करील. मनात काय चालले आहे त्याची नोंद घेऊ पाहील. थोडक्यात, दैनंदिन जीवनात ज्या प्रकारे तो धास्ती वगैरे नकारात्मक भावना जाणिवेपासून दूर ठेवू पाहतो तो ते करील. धास्ती दूर ठेवणे त्याला जमले

नाही तर तो एलएसडीच्या प्रवाहावरोवर घरंगळत जाऊ पाहील. त्याच्या मनात जे विचित्र भावप्रत्यय उमटत असतील त्यांच्या जाद्गुत अडकेल किंवा त्यांचाच पाठलाग करीत राहील. बचाव आणि पराभूती यांच्या कात्रीत अडकलेला इगो मग अधिकच धास्तीग्रस्त बनेल. या झगड्यात कदाचित शेवटी इगो संपूर्ण विघटित होईल. इगोचे विघटन होऊ लागताच नाना प्रकारचे शारिरीक भास होऊ लागतात. कधी अस्थिवरचे मांस गळून पडत असल्याचा भास होतो. कधी इंद्रिये शारिरापासून सुटू लागल्याचा भास होतो. या क्षणी काळ आणि दिग् यांचे भान नष्ट होते. शरिराचेही भान नाहीसे होते. कधी आपण केवळ ध्वनीची एक लांबचलांब ओळ आहोत असे वाटते. कधी प्रकाशाची केवळ तिरीप आहोतसे वाटते. कधी फक्त एखाद्या विकारापुरतेच भान उरते. नाना प्रकारचे भास यावेळीं होतात. यालाच या प्रयोगामध्य व्यक्तित्वाचे निराकरण Depersonalization घडते असे म्हणतात. कधी प्रयोगकास आपण मरण पावलो आहोत किंवा भ्रमिष्ट झालो आहोत असेही वाटते. (योगाभ्यासातील उन्मनी अवस्थेशी या अवस्थेची तुलना करण्यासारखी आहे. तेथेही योगाभ्यासकाचे पहिले व्यस्तिमत्व विघटित होत असते.)

एकीकडे व्यक्तित्वाचे विघटन घडत असते तर दुसरीकडे त्याच व्यक्तित्वात एक नवीनच हालचाल सुरू होते. एकीकडे एलएसडीच्या वाढत्या परिणामाखाली व्यक्तित्वाचा तोल गमावला जात असल्याचे आपल्या निदर्शनास येते तर दुसरीकडे कोठून तरी तिसऱ्याच केन्द्राकडून तो तोल सावरण्याचा प्रयत्न होत असल्याचे दिसू लागते. या वेळी असे जाणवते की व्यक्तित्वाच्या केन्द्रस्थानाचे नियंत्रण करू पाहणारी ही शक्ती सारा वेळ व्यक्तीत्वात घडत असलेले सर्व बारिकसारिक फेरफार काळजीपूर्वक पाहत होती व आता तोल संपूर्ण जाणार अशा वेळी पुढे येऊन व्यक्तित्वाच्या नियंत्रणाचे सुकाणू स्वतःच्या हाती ती घेत आहे. इगोवरील भीतीचे आवरण पराकोटीला पोचते तेवढे काही क्षण या शक्तीची हालचाल किंचितमात्र थांबते असे वाटते. पण नाहीतर निरिक्षणाचे व निरिक्षणानंतरच्या मूल्यमापनाचे तिचे कार्य अव्याहत चालू असल्यासारखे दिसते. मानवी विचारपद्धतीचे R–thinking आणि A–thinking हे दोन प्रकार आपण अभ्यासले त्यापेक्षा हा प्रकार सर्वस्वी भिन्न असतो आणि हा तिसरा प्रकार मनाच्या अगदी तळाशी सुप्तावस्थेत राहात असावा आणि जागृतविचारक्रिया व स्वप्नरंजनात्मक विचारक्रिया याना जेव्हा परस्पराशी विचारविनिमय करण्याची गरज उत्पन्न होते तेव्हा हे केंद्र जागृत होत असावे. विचारक्रियेचा हा तिसरा प्रकार अनुभवांचा साकल्याचा विचार

करून आपली दिशा ठरवित असावा. कारण त्याच्याकडून आलेलें मार्गदर्शन व्यक्तिला नेहमीच हितावह ठरल्याचे दिसते. झोपेत किंवा एलएसडीसारख्या द्रव्यांच्या गुंगीत बिकट समस्यांवर जे समंजस तोडगे सुचल्याचे कित्येकांच्या बाबतीत आढळते त्याला कारण ही शक्ती असावी.

× × × ×

एव्हाना आपल्या चर्चेचा मुख्य प्रबंध सुस्पष्ट बनला आहे. मानवी जीवन-व्यापारात कलेला अत्यंत महत्वाचे स्थान आहे. कला जीवनाबरोबरचे मनुष्याचे समायोजन शक्य करते. स्वतःशी आणि स्वतःबाहेरील वास्तवाशी जमवून घ्यावयास त्याला साह्य करते. वास्तवाविषयीचे त्याचे भान अधिक विस्तृत आणि सखोल बनविते. त्याची वृत्ती तीक्ष्ण करते. त्याला अधिक संवेदनाशील करते.

माणसाच्या भावविश्वाला दोन स्तर आहेत. एक बाहेरचा, एक आतला. प्रत्येकाला या दोन स्तरांशी जमवून घ्यायचे असते. कलावंतही या नियमाला अपवाद नाही. ज्या प्रकारे कलावंत हे जमवून घेतो त्या प्रकारे त्याची कला घडते. तो बाह्यसंवेदनानाच अधिक महत्व देत असेल तर त्याची कला ऐंद्रियवादी (Sensual) मूर्त अशा प्रकारची होईल. परंतु बाह्य संवेदनांच्या आंतरिक प्रतिक्रियाना तो आपल्या कलेत अधिक महत्वाचे स्थान देणार असेल तर त्याची कला मुक्तकल्पनसौष्ठव आणि अमूर्तवादी होईल. येथे कलावंत त्याला बाहेरील सृष्टीत दिसलेल्या आकाररेखांशी एकनिष्ठ न राहता त्या आकाररेखानी त्याच्या अंतर्मनात निर्माण केलेल्या खळबळीशी एकनिष्ठ राहात असतो. ही खळबळ व त्या खळबळीतून प्रतीत होणारा आशय अर्थातच अत्यंत व्यक्तिगत व खाजगी स्वरूपाचा असल्याने त्यावर आधारलेली कलाभिव्यक्ती-सुद्धा व्यक्तिगतच असते. बऱ्याचदा त्यामुळे ती अमूर्तवादी abstract बनते. तसेच अनाकलनीयही. यातच पुन्हा ज्या प्रकारचा घाट कलावंताने आपला आशय व्यक्त करण्यासाठी निवडला असेल त्याचाही परिणाम होत असतो. घाट संपूर्ण अमूर्तवादी किंवा भौमितिकवादी असेल तर कला अधिकच अनाक-लनीय बनेल. कारण घाट आणि आशय (विषय नव्हे) परस्परांवर परिणाम करीत असतात. घाट सेन्स्युअल प्रकारचा असल्यास कला थोडी कमी गूढ बनेल. कला गूढ बनण्यात विषयाला फारसा भाग नसतो. विषय कोठलाही असो. विषयाला जो आशय प्राप्त होतो तो तो विषय कलाकाराच्या माध्यमातून कलेचे रूप घेऊन बाहेर पडत असताना येत असतो. म्हणजे आशयावर चित्र-काराच्या विशिष्ट मानसिक-भावनिक ठेवणीची छाप पडते.

आजची चित्रकला व शिल्पकला बऱ्याच प्रमाणात अमूर्तवादी असून बऱ्याच प्रमाणात ती प्रतिकात्मक आहे. एका पातळीवर ही प्रतिके अत्यंत खाजगी आहेत कारण चित्रकार स्वतःचा अगदी व्यक्तिगत अनुभव व्यक्त करण्यासाठी ती निर्माण करीत आहे. पण दुसऱ्या एका पतळीवर हीच प्रतिके सामूहिकही आहेत. कारण सगळ मानवी मन एका सूक्ष्म थरावर एकसारखे व सामुच्चयिक बनत असते.

× × × ×

आमचे प्रमेय हे आहे की नवकला ही आधुनिक माणसाच्या अबोध मनाने नियंत्रित व मार्गदर्शित केलेली हालचाल आहे. त्यामुळे मानवी मनातील सामूहिक अबोध आशय त्यातून प्रकटत असतो. म्हणून एका अर्थी ही कला सामूहिक आहे. त्यात व्यक्तिक असे काही असेलच तर ते चित्रकाराची वैयक्तिक घाटणी व शैली. या व्यतिरिक्त या कलेतील बाकी सर्व–त्यातील प्रतिके, आशय वगैरे सामूहिक आहे. त्यातील मनुष्यसंबंधीचें दर्शन किंवा Vision सामूहिक आहे, कल्पनाबंधही सामूहिकच आहेत. त्यातील आकृत्या अनेकदा वेड्याविद्र्या, भयानक, विद्रूप असतात की ज्या पाहताच पाहणाऱ्याला असे वाटावे की अशी वेडीविद्री चित्रे काढून कलाकार आपले पायच ओढीत आहे. या कलेतील रेखाटने आणि रंगांची संगतीसुद्धा अशी असते की वारंवार ती पाहून त्यांची सवय केल्यावाचून त्यांचा उलगडाच होऊ नये. एखादी परकी भाषा शिकण्यासाठी जशी सवय करावी लागते तशीच सवय ही चित्रे समजून घेण्यासाठीही करावी लागते.

तथापी असे असले आणि ही चित्रे दुर्बोध वाटत असली तरी चित्र-काराच्या वतीने सांगण्यासारखी गोष्ट ही आहे की सर्वसामान्य दृष्टीने त्यांची कला दुर्बोध आहे याची त्यांची त्यानाही जाणीव आहे. कारण या कलावंतां इतक्या मोठ्या संख्येने आजवरच्या कोठल्याच कलावंतानी स्वतःच्या कलेच्या स्पष्टी-करणाचे व समर्थनाचे जाहीर लेखन केलेले नाही. प्रत्येक नवकलावंताने स्वतःची भूमिका लोकांसमोर मांडली आहे. कधी मुलाखतीच्या स्वरूपात कधी जाहीर फतव्यांच्या स्वरूपात. पण भूमिका मांडल्यावाचून कोणीही राहिलेला नाही. अर्थात हे जाहिरनामे, मुलाखती व फतवे केवळ अज्ञ प्रेक्षक-मंडळींसाठीच नसतात. त्यांचा एक हेतू स्वतःची कलात्मक भूमिका स्वतःसाठी स्पष्ट करून घ्यावी हाही असतो. मानसशास्त्राच्या दृष्टीतून नवकलेचा अभ्यास करू पाहणाराला म्हणूनच ही सार्वजनिक निवेदने कलावंतांच्या चित्रांइतकीच महत्वाची वाटत असतात.



अनुक्रमणिका

१९०० साल हे नवकलेचे प्रारंभवर्ष मानता येईल. कारण त्या साली कान्डीन्स्की (Kandinsky) या चित्रकाराने नवकलेच्या वैचारिक भूमिकेचे पहिले सूतोवाच केले आहे. कान्डिन्स्की नवकलेच्या आद्यसंस्थापकांपैकी एक आहे. Concerning Form या आपल्या लेखात तो म्हणतो की, " मानवी मनामध्ये जे आध्यात्मिक तत्व नेहमी वास करीत आले आहे ते आज परिपक्वतेस पोचून स्वाभाविकपणे स्वतः होऊन प्रकट पाहत आहे असे आजच्या या नवकलेकडे पाहताच जाणवू लागते. मानवी हृदयामध्ये वास करीत असलेले हे अध्यात्म आज अगदी आत्मप्रकटीकरणाच्या बिंदूला पोचले आहे. हे अध्यात्म दोन वेगवेगळचा मार्गानी कलाभिव्यक्तीतून व्यक्त होत असते. मानवी हृदयातल्या अध्यात्माच्या आत्मप्रकटीकरणाची ही दोन परस्परविरोधी टोकेच होत. त्यातील एक टोक मूर्तवादी किंवा आकारवादी कलेचे आहे तर दुसरे सर्वांगीण अमूर्तवादाचे किंवा अनाकारवादाचे आहे. नेहमी या दोन टोकात मानवी कलाव्यापार फिरत असतो. कधी ती मूर्ताकडे अधिक झुकते. तर कधी अमूर्ताकडे. तथापी कला यातील कोणत्याही मार्गाने जावो तिचा शेवटचा मुक्काम मात्र एकच आहे. कारण या दोन्ही मार्गांचे अंतिम लक्ष्य एकच आहे. मूर्तवादी आणि अमूर्तवादी ( किंवा आकृतिक आणि अनाकृतिक ) हे दोन्ही घटक चित्रकलेत चित्रकलेच्या प्रारंभापासून आढळत आले आहेत. आजवर मूर्ताच्या आधारे अमूर्त प्रकटत असे आज या दोघानी सवते सुभे स्थापन केले आहेत. आणि यापुढे त्याना स्वतःची स्वतंत्र अस्तित्वे येणार आहेत हे जाणवू लागले आहे. पूर्वी मूर्ताला अमूर्ताच्या आणि अमूर्ताला मूर्ताच्या आधारे पूर्णत्व येत असे. मूर्तामूर्ताची एक संयुक्त प्रेरणा कलाभिव्यक्तीच्या ठायी पूर्वी आढळत असे. आज या संयुक्तपणाला पूर्णविराम मिळाला असून या दोन्ही प्रेरणा स्वतंत्र झाल्या आहेत."

कान्डिन्स्की यांच्या म्हणण्याचा गर्भितार्थ असा की कलाभिव्यक्तीमध्ये मूर्त आणि अमूर्त हे दोन्ही घटक येत असतात. आजपर्यंत मूर्ताच्या साहाय्याने म्हणजे आकारवादी चित्ररेखाटनाच्या साहाय्याने अमूर्तवादी आशय व्यक्त होत असे. आता कलाभिव्यक्तीतील प्रवृत्ती वदलत आहेत. यापुढेही मूर्तवादी किंवा आकारवादी चित्रण अधिकात अधिक मूर्तवादी (Realistic) बनू पाहील तर अनाकारवादी किंवा अमूर्तवादी चित्रणही अधिकात अधिक अनाकारवादी (Abstract) बनू पाहील. आजपर्यंत कलावंत त्याला व्यक्त करावासा वाटलेला अमूर्त आशय मूर्तवादी आकारघाटांच्या साहाय्याने व्यक्त करीत असत. आता Trends बदलताहेत. यापुढे मूर्तवादी कलाघाट आपल्या

मार्गाने जाईल आणि अमूर्तवादी आपल्या वाटेने जाईल. यापुढे मूर्त हे सर्वांगाने मूर्त असेल आणि अमूर्त सर्वांगाने अमूर्त असेल. मात्र या दोन्ही प्रवृत्ती शेवटी एकाच टप्प्यावर येणार असून त्यांचा अंतिम संदेशही एकच असेल.

कलाप्रवृत्तीमध्ये अनुस्यूत असणाऱ्या मूर्तवादी आणि अमूर्तवादी या संयुक्तप्रेरणा अलग झाल्या असून त्यातील प्रत्येक प्रेरणा स्वतःचा स्वतंत्र मार्ग आक्रमू लागली आहे हे कान्डिन्स्कीचे मत जणू सिद्ध करण्यासाठीच की काय मालेविच या चित्रकाराने १९१३ त एक पूर्णत्वाने अमूर्तवादी ठरेल असे चित्र रंगविले. " पांढऱ्या चौकटीवर काढलेला काळा छोटा चौकोन " हा त्या चित्राचा विषय. या प्रकारचे चित्र पूर्णत्वाने अमूर्तवादी असणार हे खास सांगण्याची गरज नाही. चित्राला खुद्द मालेविच यानेच स्वतःचे निवेदन जोडले आहे. तो लिहितो की, " घन वस्तुजगताच्या दडपणातून कलाशास्त्राची सुटका करावी यासाठी माझी धडपड चालली होती. पांढऱ्या चौकटीतील काळा चौकोन हे त्या धडपडीचे फलित. माझ्या प्रयत्नांचा एक भाग. मूर्ताच्या दबावातून कलाप्रवृत्तींची मुक्तता करण्यासाठी मी चौकोनाकृतीचा आसरा घेतला होता. "

कलाप्रवृत्तीमधील अमूर्तवादी प्रवृत्तीच्या दिशेचा हा इतिहास. असाच इतिहास मूर्तवादी प्रवृत्तीचाही आहे. मालेविचच्या चित्राच्या प्रदर्शनानंतर बरोबर एकाच वर्षाने मार्से द्युशां (Marcel Duchamp) या चित्रकाराने एक कलाप्रदर्शन आयोजित केलें. प्रदर्शनातील चित्राचा विषय होता Object Trouve' (अशाच कोठेतरी अपातत: गवसलेल्या वस्तू). प्रदर्शनात एका सुबक बैठकीवर बाटल्या ठेवण्याचा Rack मांडून ठेवलेला होता. द्युशांचे चित्र ते हेच. बाटल्यांची ही उतरंड त्याला तो फिरायला गेला असता समुद्रकिनाऱ्यावर गवसली होती. तेथून उचलून आणून प्रदर्शनाच्या हॉलमध्ये तीच त्याने मांडून ठवली. बस्स. पण द्युशांच्या या विचित्र प्रदर्शनाने रसिक प्रेक्षकात मोठी धमाल उडवून दिली. एका दृष्टीने पाहिल्यास शोभेच्या वस्तूंच्या दिमाखाने उभी असलेली कोणीतरी फेकून दिलेली आणि समुद्राच्या लाटांनी किनाऱ्यावर आणून टाकलेली व सहजगत्या गवसलेली ती उतरंड म्हणजे वास्तवाच्या वास्तविकपणाचा शंभर नंबरी नमुना होता. यापेक्षा अधिक वास्तव आणखी काहीही असू शकणार नव्हते. Realisticतेचे हे अंतिम टोक होते. कारण जगातील प्रत्येक वस्तू उपयोगाची असते आणि नसतेही. तिचा उपयोग हा तिचा प्राथमिक गुणधर्म नव्हे. तिचा प्राथमिक

गुणधर्म अस्तित्वात असणे. अस्तित्वात असल्यानंतर माणसाच्या संदर्भात ती उपयोगाची वा निरुपयोगी हे ठरते. येथे ती उतरंड ही प्रथम आहे. व मागाहून ही किंवा ती उपयोगी वस्तू आहे. हेच अस्तित्वाच्या चमत्कारिकपणाचे अंतिम सत्य सुशोभित बैठकीवर दिमाखाने उभी केली गेलेली ती उतरंड पाहणाऱ्या प्रेक्षकाला दाखवित होती. एका अर्थाने सुबक बैठकीवर विराजमान झालेली ती उतरंड हा वास्तविकतेचा कळस होता. कारण त्या उतरंडीइतकी अधिक वास्तव गोष्ट ती कोठली ? कारण ते फक्त घन, मूर्त अस्तित्व होते. पण दुसऱ्या अर्थाने ते दृश्य हा अमूर्तवादाचाही कळस होता. कारण मानवी व्यवहारातील सगळ्या संदर्भांचे निराकरण करून ती उतरंड तेथे उभी होती. तिचे सगळे प्रतिकत्वच तेथे काढून घेण्यात येत होते आणि आपल्या केवळ अस्तित्वाने ती तेथे होती. म्हणजेच ती अमूर्ताच्या पातळीला पोचली होती. ती तेथे केवळ "असणे" या प्राथमिक गुणधर्मात होती. प्रत्येक वस्तू एका पातळीवर केवळ तिच्या परिने म्हणून असते तर दुसऱ्या पातळीवर माणसाच्या उपयोगाची वस्तू म्हणून प्रतिकत्वाने असते. एकीकडे हे व्यक्तिगत प्रतीकत्व नष्ट झाल्याने ते केवळ मूर्तत्व (Great Realism) झाले होते. तर त्याच वेळी तिला एक विसृत प्रतिकत्व आल्याने कारण तिचा कोठलाही उपयोग आता होऊं शकता तिला सर्वांगीण अमूर्तत्व (Great abstraction) आले होते. केवळ वास्तविकत्व आणि केवल अमूर्तत्व या दोहोंचा तेथे मिलाफ झाला होता. केवल असतेपणाच्या स्वरूपात उभी असलेली ती उतरंड म्हणजे मानवी जीवनाच्या मूलभूत निराधारित्वाचे एक महान रूपक होते. तितकेच निराधार. तितकेच एकाकी. तसेच आगापिछा नगणारे. (Great abstraction & great realism both lead to **one** goal in the end. पराकोटीचे मूर्तत्व आणि पराकोटीचे अमूर्तत्व या दोघांचा अंतिम संदेश शेवटी एकच असतो आणि दोघे एकाच बिंदूवर भेटतात हे कान्डिन्स्कीचे भाकित अशा प्रकारे खरे झाले. जें बाझेन हा कलासमीक्षक या प्रदर्शनाच्या निमित्ताने लिहितो की, "वाटल्या टवण्याच्या त्या उतरंडीचा नेहमीचा परिचित संदर्भ तेथे तुटला होता. समुद्राच्या लाटांनी कोठून तरी वाहून आणून किनाऱ्यावर फेकून दिलेली अशीच कसली तरी एक वस्तू ती बनली होती. पण त्याच वेळी वाऱ्यावर सोडून दिली गेलेली एक वस्तू, स्वतःच्या हक्काने अस्तित्वात असलेले एक अस्तित्व म्हणून तिला वेगळाच दिमाख प्राप्त होत होता. म्हटले तर ती उतरंड संपूर्ण निरुपयोगी होती. पण म्हटले तर तिचा उपयोग कोणीही करावा अशा थाटात ती तेथे

उभी होती. जिवंतपणानें सळसळती वस्तू अशा दिमाखात पाहाणाराला अस्वस्थ करणारे स्वत:चे ॲवसर्ड अस्तित्व घेऊन ती तेंथे उभी आहे–पाहणाराला अस्वस्थ बनविणारा विषय–कलेच्या मार्गावरचे हेच पहिले पाऊल होय. "

कोणीतरी टाकून दिलेली आणि कोठेही भरकटत जाऊ शकणारी एक सामान्य निराधार वस्तू. पण आता प्रदर्शनातील उत्तमातील उत्तम बैठकीवर विराजमान झाली असल्याने अस्तित्वाचा वेगळाच दिमाख तिला प्राप्त होत होता. म्हणून " अस्वस्थ करणारे तिचे ॲवसर्ड अस्तित्व. " एका बाजूला ती उतरंड हे अस्तित्वाच्या किंवा वास्तविकतेच्या पूर्णस्वरूपाचे सर्वांगीण दर्शन होते. पण दुसऱ्या बाजूला त्याचीच ती चेष्टा आणि विडंबनही होते. कारण ज्या स्थितीत ती उतरंड तेथे उभी होती त्या स्थितीत तिचा उतरंड हा अन्वयार्थच लुप्त होत होता.

पांढऱ्या चौकटीवरची काळी चौकोनाकृती आणि सुशोभित बैठकीवर मांडून ठेवली गेलेली बाटल्या ठेवण्याची उतरंड खऱ्या अर्थाने कलाप्रकारच नव्हे. परंतु कलाभिव्यक्तीत सुप्तरूपात असणाऱ्या पूर्ण मूर्तवादाकडच्या आणि पूर्ण अमूर्तवादाकडच्या प्रवृत्तींचे दिग्दर्शन करण्याच्या दृष्टीने ती दोन्ही दृश्ये अत्यंत अर्थपूर्ण होती. नंतरच्या कालखंडातील सर्वच्या सर्व मुक्तकल्पन सौष्ठवशैली कला (Imaginative art) या दोन विशिष्ट कल्पनाबंधांतून समजून घेता येईल.

केवळ शारीर (जड वा भौतिक) आणि केवळ मानसिक (अशारिर, अजड वा चेतन) यांच्याकडे पाहणाऱ्या या एकांतिक दृष्टीकोनाचे विश्लेषण जर आपण केले तर असे आढळते की आधुनिक माणसाच्या मनातील शरीर आणि आत्मा हे द्वैत पूर्णावस्थेला पोचले होते व तो या दोन कॅटेगरीतून आपल्या सगळ्या जीवनविषय अनुभूतींचा अन्वयार्थ लावित होता. माणूस आत्म-विभाजित बनला होता. त्याला पूर्णार्थाने जीवन अनुभविता येत नव्हते. तो केवळ Fragmented विभाजित अनुभव घेऊ शकत होता. म्हणून कलेच्या बाबतीत हे असमतोल दृष्टीकोन. वास्तविक शरीर आणि मानस यांच्या मिलाफातून पूर्णाकृती मानवी व्यक्तित्व तयार होत असते. पण त्यांच्यात जेव्हा भेद पाहिला जातो तेव्हा माणसाच्या आंतरिक जीवनात अनेक प्रकारचे संघर्ष व तणाव उत्पन्न होऊन ते त्याच्या जीवनानुभिव्यक्तीतून बाहेर पडतात. कोठलाही एकांगी आणि असमतोल दृष्टीकोन शेवटी मानसिक सुखाला मारक ठरत असतो. केवळ कलेतच व्यक्त होत असलेले कल्पनाबंध अभ्यासले तरी मानवी मनाची ही विभाजित अवस्था एकट्यादुकट्या व्यक्तिपुरती मर्यादित

नव्हती; ती मानवजातीची सार्वत्रिक अवस्था होती हे दिसते. कारण एकतर ही कला कलावंताच्या अवोध मनाकडून घडविली जात होती व दुसरे ती बहुसंख्येच्या मनावर मोहिनी घालीत होती. होकारात्मक वा नकारात्मक रितीने त्याना स्वत:कडे ओढून घेत होती.

तथापी बुद्धी आणि भावना किंवा विकार (Feelings) यांच्यातील झगडा नवीन नव्हता. हा एक सनातन झगडा आहे. त्याची सुरवात प्रवोधन-काळापासून आहे. ज्या क्षणी जीवनानुभवात भावनेपेक्षा चिकित्सक वृत्तीला अधिक महत्व दिले गेले त्याच क्षणी या झगडयाला सुरवात केली गेली. विसाव्या शतकात या झगडयाचे स्वरूप तीव्र झाले इतकेच ! प्रवोधनकाळात या कलहाचे स्वरूप बुद्धी आणि आध्यात्मिक श्रद्धा यातील कलह या प्रकारचे होते. जसजशी मनुष्याच्या बौद्धिक, सांस्कृतिक, शास्त्रीय प्रगतीत सुधारणा होत गेली तसतसे या कलहाचे वाह्य स्वरूप वदलत गेले. पुढे काही काळ हा कलह प्रकृति आणि बुद्धी किंवा मनुष्याच्या सहजप्रवृत्ती आणि त्याची विचार-शक्ती यांच्यातील कलह बनला. आज शेवटी तो मानवी वोध मन आणि त्याचे अबोध मन यातील तणावाचा कलह बनला किंवा वास्तव आणि त्या वास्तवा-विषयीची मानवी आंतरिक प्रतिक्रिया यांच्या स्वरूपातील बनला. आधुनिक कलाव्यापारात याच कलहाचे पडसाद प्रतीकरूपाने उमटत आहेत.

× × × ×

[ क्रमश : ]

---

## ड्यूकद ला रॉशफोकूची सुभाषितें

आपण निर्दोष असतो तर दुस-यांच्या दोषाकडे इतक्या चवीनं पाहीलं नसतं.

• • • •

आपण निगर्वी असतो तर दुस-यांच्या गर्विष्ठपणावद्दल आपण तक्रार केली नसती.

• • • •

सर्व मानवी मनात गर्वाचं प्रमाण समान आहे. त्या भावनेचं कृतीतलं रूपांतर मात्र प्रत्येकाचं वेगवेगळं असतं.

• • • •

स्वार्थ अनेक भाषा वोलतो, अनेक मुखवटे धारण करतो—नि:स्वार्थ-पणाचा सुद्धा.

• • • •



अनुक्रमणिका

# The fine art of making steel



It is thought processes, new ideas and experiments that help transform iron ore into different steels for different uses.

High tensile steel for bridges, non-corrosive steel that welds easily for ships, freight cars and trolley buses.

Bullet-proof armour-plate and high speed steels for defence.

Chrome-molybdenum steels for aircraft.

Quality tool steel for saws and razor blades.

And bars, specially rolled to American specifications that have been sent to the United States.

For over thirty years now, Tata Steel's Research and Development Laboratories have been poineering the development of special steels in India.

TN. 2274

**TATA STEEL**

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका






ही मुले आणि झाडाचे रोप हे दोन्ही
राष्ट्राचे उद्याचे आधार आहेत.

मुलामधून कर्तृत्व फुलणार आहे
झाडामधून समृद्धी उगवणार आहे

॥ वृक्ष म्हणजे साक्षी। वृक्ष म्हणजे सोबती। वृक्ष म्हणजे जीवन। वृक्ष म्हणजे समृद्धी ॥

माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई

अनुक्रमणिका

नवी क्षितिजेच्या

## पुढील अंकात वाचा —

१) **गोष्ट 'मोरण्या' च्या पुस्तकाची – श्रीमती दुर्गा भागवत.**
दुर्गाबाईंनी लिहिलेली एक मनोज्ञ आठवण.

२) **नेपोलियन – एक नवे मूल्यमापन – श्री. स. ह. मोडक.**
नेपोलियनच्या व्यक्तित्वाचा आणि कर्तृत्वाचा एका वेगळ्याच दृष्टीकोनातून घेतलेला आढावा.

३) **नवकला – एक प्रदीर्घ प्रतीक – श्री. विश्वास पाटील.**
कलावंत न्यूरॉटिक असतो काय ?
अणुविज्ञानातील प्रमेये आणि त्यांचा कलात्मक अभिव्यक्तिवरील परिणाम.
जागतिक वातावरण जेव्हा धास्तीग्रस्त बनते
तेव्हा कलाभिव्यक्तींचे रूप कसे असते.
इत्यादि, इत्यादि.

अनुक्रमणिका